[ काव्येतिहास-संग्रह. ]

( २६ )

चित्रगुप्तविरचित

# शिवाजी महाराजांची बखर.

ही

यथामति शुद्ध करून अर्थनिर्णायक आणि अवांतर

माहितीच्या टीपांसह

काशिनाथ नाराय ाने, बी. ए.

यांणी

प्रकाशित केली.

शिवराजास आठवावें । जीवित्व तृणासम मानावें ।
इहपरलोकीं तरावें । कीर्तिरूपें ॥
शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा साक्षेप ।
शिवराजाचा आठवावा प्रताप । भूमंडळीं ॥

रामदास.

महाराष्ट्राच्या भाषेचा व इतिहासाचा

आस्थापूर्वक अभ्यास करूं पाहणाऱ्या

सज्जनांस

हा ग्रंथ

परम प्रीतीने अर्पण करितों.

ग्रंथ-प्रकाशक.

श्री.

श्रीमन्महाराज आदिअनादि प्रगल्भ परंतप श्रीजगत्कारण प्रतिमा क्षितिपति शतक्रतु सार्वभौम अभिनवभाविकसित ज हु व सी[1] द्युमणिसमान द्विषत्संहारक धर्म विषयाचेठायीं जवोत्थे[2] अभिमुख कर्ण नृपतिप्राय समरशौर्यत्वास गांडीवधर-तुल्य त्रिभुवनाचे ठायीं विख्यात राजराजश्री छत्रपति नरदेवचूडामणि स्वामी[3] यांचे सेवेशीं.

सेवेशीं विनंति सेवक कृष्णाजी अनंत सभासद समस्त राजमंडल करद्वय[4] जोडून कृतानेक विज्ञापना सेवेशीं सेवकाची त्रिकर्णचित्तें[5] ऐशीजे. स्वामी परम कृपाळू होऊन सेवकास स्वमुखें आज्ञा दिधली जे, थोरले शककर्ते महाराज[6] यांणीं अभिनव विक्रमोपराक्रम[7] करून संपूर्ण शत्रूचा पराजय केला. कर्नाटक वगैरे किती एक देश मुलूख व कोट व पहाडी किल्ले काबीज केले. हा वृत्तांत तपशिलवार, तुम्हीं पुरातन राज्यांतील माहितगार आहां, तरि इस्तेकबील पासून[8] चरित्र सांगणें म्हणोन. त्याजवरून पूर्वील जहाले वर्तमान महाराजांस नि-वेदन व्हावयाकरितां ऐसीजे.

श्रीमन्महाराज अवतारी ॥ नाविष्णुः पृथिवीपतिः ॥ राजश्री शिवछत्रपति स्वामींचे तीर्थरूप शहाजीराजे. त्यांचे वडील मालोजीराजे व त्यांचे कनिष्ठ बंधु विठो-जीराजे हे निजामशाहींत वजीरी करून तोलदारीनें[9] होते. त्यांची निष्ठा परम नवविधाभक्तीनें, श्रीशंभुमहादेव व श्रीतुळजाभवानी कुलदैवत, त्यांचे भजनीं तत्पर होती. त्यास श्रीशंभुशिखरीं[10] यात्रा चैत्रमासीं भरत असून तेथें पाण्याचें दुर्भिक्ष. तेणें मनुष्यमात्रास पीडा. यास्तव मालोजीराजे यांनीं अगाध पुण्यप्राप्तीचा हेतु धरून, श्रीचरणासन्निध जाऊन, जागा उत्तम विलोकून, तत्र स्थळीं उदकास्तव

---

१. " जे हु व वि " असेंही होईल. पण अर्थ नीट बसत नाहीं.

२. जवोत्थ=सत्वर.

३. राजाराम साहेब थोरले.

४. मूळांत ' द्वयकर ' असें आहे.

५. त्रिकर्णचित्तें ( त्रि + कर्ण + चित्त ) दोन कर्ण व चित्त यां तिहींसह, अति लक्ष-पूर्वक.

६. शककर्ते महाराज=शिवाजी महाराज.

७. गीर्वाण पद्धतींवर लिहिण्याची हौस ह्या ग्रंथकारास फार होती असें दिसतें. " विक्रमोपराक्रम " हें अशुद्ध आहे. हें सांगणें नको. ' विशेष पराक्रम ' ' अतिश-य पराक्रम ' एवढाच ह्या शब्दांचा अर्थ समजावयाचा.

८. इस्तकबील पासून=आरंभापासून.

९. तोलदारी—वजन, प्रतिष्ठा.

१०. शंभुशिखर=शंभुमहादेवाचा डोंगर. सातारा जिल्ह्यांत.

तळें विस्तीर्ण बांधावें म्हणजे सर्व यात्राजनांस उदक कार्यास येईल असा कृतसंकल्प चित्तांत करून, अपरिमित द्रव्य खर्च करून तळें संपूर्ण बांधविलें. तें परिपूर्ण उदकेंकरून पाहिलें. तदनंतर ब्राह्मणभोजन करवून दक्षणा अर्पण केली. भिक्षुक फकिरादि यांस खैरात देवविली. रात्रीं श्रीशंभुमहादेव प्रसन्न होऊन अभयोत्तर माधुर्यवचनें मालोजीराजे यांस गौरविलें जे, " तुझिया वंशांत आपण मानवरूपें अवतार धारण करून, या कलिधर्मांत यजन याजनमखादि अंनुपदें श्रीदेव ब्राह्मणादिक यथाशास्त्रें धर्मरक्षणता करून, दुष्टजन पादाक्रांत प्रतापतवकें अशेष करीन. शत्रूंचा पराजय करून तदनंतर दक्षिण देश संपूर्ण व उत्तर व पश्चिम प्राची नैर्ऋत्य आग्नेय वायव्य ईशान्य अष्ट दिशा स्वसेनावशें पंडुपुत्रातुल्य जिंकोन राज्याधिकार संपादीन. भूमंडळाचे ठायीं अमानुषी कौतुक सर्व जनांस गोचर करवीन. ऐसा उत्कंठित हेतु उदयातें पावला आहे. " म्हणून राजे यासि श्रीनें वर अर्पिला. यावरून परम संतोष राजे यांस जाहला. प्रातःकाल झाल्यानंतर महान् पंडित पौराणिक ज्योतिषी गणक सिद्धांत वेदांतवक्ते महानुभव यति शास्त्रज्ञ यांस बोलावून आणून त्यांजपाशीं रात्रीचे ठायीं जहालेला वृत्तांत निवेदन केला. तेव्हां समस्तांनीं अमृतोत्तरें गौरविलें जे, यथार्थनिश्चय संतोषरूप असावें. तदनंतर मालोजीराजे यांनीं श्रीप्रसन्न जहाल्याचें स्नानादि सत्कर्म धर्म उरकून संपूर्ण ब्राह्मणांस व यति दंडधारी फकीर वगैरे गरीब लोकांस दानधर्म अपरमित केला. आणि चित्तांत परम कौतुकता मानून असते जहाले.

पुढें कांहीं दिवसांनीं मालोजी राजे यांस पुत्र शहाजी राजे होऊन अदलशाही वजीर जेंहाले. " महाराज " किताब पादशाहानीं दिल्हा. बारा हजार स्वारांची फौज समागमें चालवूं लागले. दुसरे पुत्र शरफजी मोंगलाईत वजिरी करूं लागले. शहाजी राजे यांस स्त्रिया दोन. ज्येष्ठ सौभाग्यवती जिजाऊ साहेब. यांचे उदरीं प्रथम संभाजीराजे जहाले. तदुत्तर राजश्री शिवाजीराजे जहाले. तेव्हां पुन्हा श्री शंभुमहादेव प्रसन्न होऊन दृष्टांत जहाला कीं, " आपणच स्वयें मानवरूपें अवतार घेतला आहे. बहुत प्रताप शौर्यकर्में व दानधर्में त्रिभुवनाचे ठायीं जगविख्यात कीर्ति करणें. स्वामींस बारा वर्षेंपर्यंत आपणासन्निध ठेवणें. तदनंतर पुढें न ठेवणें. " म्हणोन जागृती प्रखर जहाली. कनिष्ठ स्त्री सौभाग्यवती तुकाबाई साहेब यांचे उदरीं व्यंकाजीराजे

---

११. अनुपदें=तसेंच, त्याच प्रमाणें, ह्या अर्थी.

१२. शाहजीस " शफरजी " म्हणून भाऊ होता. दोघेही निझामशाहींत सरदारी केली. पुढें निझामशाहीचा लय झाल्यावर अदिलशाही म्ह० विजापूरवाले यांचे राज्यांत शाहजीनें सरदारी पतकरली.

१३. वैशाख शुद्ध २ शके १५४९.

जहाले. विजापूरचे पादशाहानीं शहाजीराजे यांस कर्नाटक प्रांतीं बंदोबस्तास पाठविलें तिकडे कनकगिरीचे लढाईंत संभाजीराजे वारले. शहाजीराजे बेंगरूळप्रांतीं होते. जवळ सर्वभ्य कारभारी नारोपंत दीक्षित होते, त्यांचे पुत्र रघुनाथपंत व जनार्दनपंत हे उभयतां बहुत शहाणे जहाले. शहाजीराजे यांजकडे सरंजामांत पुणें व इंदापूर हे दोन परगणे असोन तेथें दादाजी कोंडदेव म्हणोन कारकून शहाणे चौकस ठेविले होते, ते महाराजांचे भेटीस येऊन परगणेचा हिशेब रुजू करून निरोप घेतेसमयीं, समागमें शिवाजी राजे व सौभाग्यवती जिजाऊ साहेब यांजबराबर संक्रोजी[१४] निळकंठ पेशवे व बाळकृष्णपंत हे नारोपंत दीक्षित यांचे चुलते व बाबूराव मुजुमदार व सोनोपंत डबीर व रघुनाथपंत बोकील सबनिस असे देऊन रवाना केले ते पुण्यास आले.

येतांच बारा मावळें काबीज करून देशमुखीबद्दल जेथें मॅरूतसर[१५] होते त्यांस दरस्त[१६] करून जिवे मारिलें. नंतर कालवशें दादाजी कोंडदेव वारले. पुढें शिवाजी महाराज स्वतां राज्यकारभार युक्तिबुद्धीनें करीत चालले. सुपे महालीं संभाजी मोहिते सावत्र मामा होते, त्यांजकडे शिमगेचें पोस्त मागावयाचे निमित्तें भेटीस गेले. तेचसमयीं त्यांस कैद केलें. आणि तीनशें घोडीं पागा व द्रव्य उदंड व वस्तभाव व कापड जडजवाहीर सांपडलें. सुपे प्रांताचा देशाधिकारी तुकोजी चोर मराठा म्हणोन सरलष्कर याचा सरनौबत केला. संक्राजी निळकंठ पेशवे व बाळकृष्णपंत मुजुमदार व सोनोपंत डबीर व रघुनाथपंत सबनीस असे कारभारी [ करून ] बहुत सावधपणें चाकशीनें वर्तणूक करीत चालले.

नंतर जुन्नर शहर मारून तीनशें घोडीं पाडाव केलीं. तीन लक्ष होनांचा माल, खेरीज हर जिन्नस कापड भरजरी जडजवाहीर, हस्तगत करून पुण्यास विजयी होऊन आले. त्याजवर नगर शहर मारिलें. मोठी सीमा केली. तेथें तुंबळ युद्ध जहालें. तेवेळीं शत्रु पराभव पावोन सातशें घोडीं व हत्ती पाडाव केले. द्रव्यही उदंड सांपडलें. साडे तीन हजार स्वारांचा जमाव झाला. ते समयीं माणकोजी दातवंडा[१७] सरनौबत केला. मग किल्ले कोंडाणा[१८] अदलशाही भेद करून घेतला. सवेंच पुरंदर येथें निळकंठराव बहुत सावधगिरीनें होते ते कालवशें मृत्यु पावले. त्यांचे पुत्र दोन होते ते एकमेकांत स्वार्थासाठीं

१४. " शामराव निळकंठ " असें अन्यत्र आढळतें.

१५. मरूतसर=हक्कदार किंवा कामगार नव्हत असे कांहीं गांवांत जुने वतनदार " मरूतसर " या हुद्यानें मोडत असत ते.

१६. दस्त=हस्तगत, कैद.

१७. माणकोजीचें आडनांव " दाहातोंडे " " दुतोंडे " असें अन्यत्र आढळतें.

१८. कोंढाणा=सिंहगड.

अतिशयेशीं भांडूं लागले. त्यांचा निवाडा करावयास परस्परें सख्य करून द्यावयासि मित्रभाव दाखवून पुरंदरास गेले आणि दोघांसही कैद करून युक्तिमार्गें किल्ला घेतला.

तदनंतर कल्याण भिंवडी मारली. अदलशाही माहुली किल्ला घेतला. मावळे लोकांचा संचय करीत चालले. मुद्रोदेव[19] म्हणोन देव डोंगर होता तेथें किल्ला बांधून नांव राजगड ठेविलें. आणि चार माच्या बसविल्या. कोंकणांत जावळी येथें चंद्रराव जबरदस्त हशम-गड-कोट-युक्त दौलत करीत असतां त्यांस मारिल्या खेरीज राज्य साधत नाहीं, यास्तव त्याजकडे हेजिबीसें[20] रघुनाथराव सबनीस यांस जाणेस सांगितलें. आणि त्यांजबरावर निवडक धारकरी पंचवीस मर्दाने नामांकित असकऱ्याचे[21] शिपाई दिधले. ते स्वार होऊन नजीक जाऊन चंद्रराव यास सांगून पाठविलें कीं, आपण हेजिबीस महाराजांकडून आलों. कित्येक कर्तव्यता तुमचे विचारें करणें आहे. असा ममताभाव दर्शविला. याजवरून त्यांणीं बोलावून भेटीस आणिलें. भेटी जहाली. बोलणें होऊन बिऱ्हाड दिधलें तेथें जाऊन राहिले. दुसरे दिवशीं एकांतीं भेटी होऊन बोलणें जहालें. प्रसंग पाहून चंद्रराव व सुरेराव[22] हे उभयतां बंधु यांसि कटारीचा वार चालवून जिवें मारिलें. तदनंतर रघुनाथपंत पंचवीस लोकांनिशीं चालिले. मालक पडलेमुळें कोणी चालून आलें नाहीं. हें वर्तमान महाराजांस समजतांच जमावानिशीं चालोन जाऊन जावळी काबीज केली. मावळे लोकांस कौलें[23] अभयवचनें देऊन आपलेसें केलें. तदुत्तर प्रतापगड किल्ला वसविला. चंद्रराव यांचा दुसरा भाऊ हणमंतराव म्हणोन होता त्याणें जावळी नजीक बांकी जांगा[24] गड होता तेथें बळ धरून राहिला. त्याचा उपमर्द जाहलिया विरहित जावळीचा बचाव होत नाहीं. दगा करून पुन्हा जावळी घेईल, इतका अर्थ मनांत महाराजांनीं आणून संभाजी कावजी शहाणा मनुष्य यांस मामलेदार योजून कार्यसिद्धीस्तव शरीरसंबंधाचे नातें लावून एकांतीं बोलीचाली दृढ करावी म्हणोन त्यास हणमंतराव याजकडे पाठविलें. जाऊन ममताभाव दाखवून विश्वास बहुतच दाखविला. "होणार तें घडोन आलें. त्याजवर तुम्हीं न जावें, तुमचें सर्व प्रकारें ऊर्जित करावें हें महाराजांचे चित्तीं आलें. खांसा शरीरसंबंध संपादायास्तव महाराजांनीं अभय उत्तर देऊन तुम्हांकडे आम्हांस पाठविलें आहे. तरि तुम्हीं अणुमात्र

१९. "मुरबाद" असें अन्यत्र आढळतें.

२०. हेजिबी=वकिली.

२१. अस्करा=लौकिक, कीर्ति.

२२. सुरेराव=सूर्यराव.

२३. कौल=लेख, पत्रें.

२४. ह्या जागेचें नांव "चतुर्बेट" असें अन्यत्र आढळतें.

जहाले कर्माचा वसैवसा न धरितां समयीं महाराजांचा मनोरथ सिद्धीस नेणें. तेणेंकरून तुम्हांवरि राव परम संतोषी होतील." असें एकांतीं बोलणें कृत्रिम भाव न दाखवितां परम लोभयुक्त बोलत बोलत दगाबाजीनें तीन वार कटारीचे पोटांत चालवून, हणमंतराव यास जिवें मारून, वसवसा तोडून, विजय पावोन मर्दुमीची सीमा केली. हणमंतराव कांहीं सामान्य नव्हे. चंद्रराव याचा भाऊ तळकोकणांत राजे म्हणवीत होता. पादशाहासही जुमानीत नव्हता. या समयीं श्रीअंबेनें महाराजांस यश अर्पण करून युक्तिमार्गें पराभवातें पावले. आणि संभाजी कावजी जलदीनें जाऊन जावळीस महाराजांस वर्तमान श्रुत केलें. तदुत्तर सिवैंतर खोरी परम कठीण बांका जागा तेथें बाँबाजी कोंडदेव ‡हमतमाचा पुंड भारी होता. तोही बहुतां विचारें मर्दुमी करून होता. त्यास खालीं घालून कैद केला. ब्राह्मणांस जिवें मारतां नय, हत्या लागती, यास्तव महराजांनीं त्याचे डोळे काढविले. सिवतर खोरी हस्तगत केली. तैसाच शृंगारपूरचे पुंड सुर्वे राज्य करीत होते. त्यांजवरि फौजेनिशीं चालून जाऊन, परम पराक्रमें दारुण युद्ध करून, शृंगारपूर घेतलें. तेथें बलिष्ट सुर्वे होते त्यांणीं पलायन संपादून देशांतरास गेले. त्याचे कारभारी शिर्के होते त्यांसि बोध करून दौलत हस्तगत केली. शिर्के यांशीं स्नेह संपादून कृपाळू होऊन गांव व महाल *मुबारक करून त्यांची कन्या महाराजांनीं आपले पुत्रास केली. तेणेंकरून उभयपक्षीं ममता अभिवृद्धि पावली. याप्रमाणें जावळी व शृंगारपूर हीं दोन्ही राज्यें काबीज केलीं. तेव्हां मोरो त्रिमल पिंगळे यांणीं बहुत मर्दुमीनें व बुद्धिवैभवें मेहनत केली त्याजवरून महाराज परम संतोष पावोन संक्राजीपंत पेशवे यांजकडील पद दूर करून मोरो त्रिमल यांस पेशवाई पद देऊन सन्मान करून गौरविलें. पांच वस्त्रें पैठणी तिवैट, भरजरी चादर, किनखापी विजार, बादली झगा व पटका व मुक्ताफळांचा चौकडा व हस्तमोत्रा व सुवर्णाचीं कडीं व मोत्यांचा तुरा व कलगी व घोडा आरबी व गज पलखदंती, असें दिलें. निळो सोनदेव यांणीं खस्त मेहनत करून मर्दुमी भारी केली याजवरून बाळकृष्णपंत यांजकडील मजमू काढून निळोपंत यांस सांगितली. पेशवे यांप्रमाणें बहुमान केला. तैसेंच अण्णाजीपंत याणीं मोठी मशागत केली यास्तव त्यांजवरि कृपाळू होऊन

---

२५. वसवसा—भीति, संशय.
२६. "सिवांतर" असें मूळांत आहे.
* मुबारक=धर्मदाय इनाम या अर्थी.
२७. मूळांत "दादाजी" असें आहे पण अन्यत्र "बाबाजी" असें आढळतें.
‡ हमतमाचा=महत्वाकांक्षी.
२८. तिवट-पागोटें.
२९. हस्तमात्रा=हस्तमुद्रा, आंगठ्या.

सुरानिशी पद देऊन यथारीति सन्मान केला. गंगाजी मंगाजी[30] बहुत कल्पक शहाणे होते त्यांस महाराजांनीं वांकनिशी सांगितली. वेदशास्त्र संपन्न राजश्री प्रभाकरभट उपाध्ये यांचे पुत्र बाळंभट व गोविंदभट हे उभयतां बंधु उपाध्येपणाचें काम चालवीत होते. लष्करचे सरनौबत नेताजी असतां दोन हजार पागा व तीन हजार शिलेदार अशी पांच हजार फौज झाली. मावळे लोक त्यांची संचणी दहा हजारपर्यंत जाहली. त्यांचे सरनोबतीस येसाजी निकम[31] नेमून देऊन बंदोबस्त दिवसेंदिवस करून राज्यवृद्धीची उमेद भारी चढली. कोणाचाही विश्वास न धरितां रात्रंदिवस सावध राहून शत्रु प्रतापें करून पराभवातें पाववून जगतीतळाचें राज्य संपादावें, शक चालवावा, या विचाराचीं साधनें चालविलीं.

या अवसरीं महाराजांची स्त्री, निंबाळकर यांची कन्या, सौभाग्यादि संपन्न सौभाग्यवती सईबाई प्रसूत होऊन पुत्र जाहला. हें वृत्त ऐकून महाराज शिवनरेंद्र परम समाधान पावोन नांव संभाजी राजे ठेविलें. परम तेजस्वी सुकुमार सुलक्षण राज्यपदायोग्य पाहून त्या आनंदास पारावार नाहीं [ असें झालें.] ते समयीं शिष्ट वेदपाठक अग्निहोत्री ज्योतिषी शास्त्रज्ञ मुनीश्वर यति तपस्वी अशा ब्राह्मणांस पाचारून, सुपुत्र राजकुमारास आणोन, दृष्टिगोचर करून, त्यांनीं मंत्राक्षता आशीर्वादयुक्त राजपुत्राचे मस्तकीं अर्पण करून जयजयकार केला. सभास्थानीं नृत्यादि वाद्यांचे घोषें सर्व जन आनंदातें पावले. तोफेची सरबती जाहली तेणेंकरून संपूर्ण जनांचे कर्ण बधिरता पावले. बंदीजन कीर्ति वाखाणूं लागले. संपूर्ण जनांस गजावरून शर्करा दिधली. ब्राह्मणांस दानें व फकीर वगैरेस होन मोहोरा वस्त्रें देऊन गौरविलें. तदुत्तर महाराजांस सुवर्णाभिषेक होऊन ब्राह्मणांस मिष्टान्न भोजन दक्षिणा देऊन बोळविलें. असा पुत्रोत्सव यथासांग संपादिला.

महाराज राजगडीं[32] असतां प्रतापकीर्ति जगीं प्रसर जाहाली. हें वृत्त दिल्लीपति व अदिलशाह व कुतुबशाह व बेदर व भागानगरवासी वगैरेंस सविस्तारें समजलें. नंतर अदिलशाही दौलत हस्तगत करून महाराज करूं लागले, हें वर्तमान बडे साहेबीण सुलतान महंमद अदिलशाह याची वडील स्त्री कारभार करीत असतां ऐकून बहुत श्रमातें पावली. आणि विचारीं पडली जे, "पादशाही किल्ले शहाजीचे बेटे शिवाजी यांनीं बलात्कारें आश्रित होऊन तमाम

---

३०. मूळांत " नागोजी " असें आहे. पण पुढें एकदा " भंगाजी " असेंही आहे. अन्यत्र " मंगाजी " असेंच आढळतें.

३१. " कदम " असें मूळांत आहे. पण पुढें " निकम " असें आढळतें.

३२. मूळांत " गयगडीं " असें आहे पण तें बरोबर नाहीं.

सरहद्दीचे घेतले आणि पुढेंही घेत चालले. सर्व मुलूख काबीज केला. एक दोन राज्यें पराक्रमें घेतलीं. चंद्रराव जावळीकर यांसी शिक्षास्पद करून सर्व कोंकण व घाटमाथां अंमल बसविला. शृंगारपूरकर सुर्वे राजे यांचें राज्य बळजोरीनें येऊन घेतलें. बारा मावळें येथें ठाणीं घातलीं. बाबाजी[३३] कोंडदेव यांस कैद केलें. पादशाही सत्ता बुडविली. ऐसा भारी पुंड झाला. अशा बलिष्ठाचें पारिपत्य करून गर्दीस कसें मिळ्वावें ?" ते समयीं दिवाण मुत्सद्दी यांस आणून विचारिलें जे, याचें पारिपत्य जाहाल्या शिवाय पातशाही कायम राहत नाहीं. तेव्हां सर्वांनीं अर्ज केला जे, शाहाजी राजे पादशाही अमीर असतां त्यांचे पुत्र शिवाजी राजे बदराहा[३४] वर्तणूक करितात हा कोण विचार ! हरामखोरास शासन करावें. ये-विशीं शाहाजी यांस जलदीनें हुजूर आणवावें. असें मुकरर केलें. आणि शाहा-जीराजे आपले जहागिरीचे सरहद्दीस होते त्यांस पत्र लिहून पाठविलें कीं, "तुम्ही पादशाही वजीर असतां तुमचे पुत्र तुम्हीं पुणे प्रांतीं पाठविले त्यांनीं बदलून ह-रामखोरी करून पादशाही किल्ले सर्व घेतले. देश काबीज केला. कितीएक पादशाही चाकर जिवें मारिले. एक दोन राजे राज्य घेऊन मारिले. ही गोष्ट बरी कीं काय ? यांत स्वहित काय पाहिलें ! याजकरितां हुकूम सादर जाहाला आहे तो पाहून गाफील न राहतां, हुकुमांत राहून, मेहरबानी संपादून घेणें. यास ते खुषी नसतील तर इतराजी होऊन पारिपत्य होईल. यास्तव सक्त ताकीद त्यांस करून बंदोबस्त करावा." म्हणून तो परवाना पाहून शाहाजी राजे घाबरे होऊन यास विचार काय ! इतराजी जाहालियावरि आपणांस पादशाहींत अणुमात्र जागा नाहीं. असें बोलोन अर्जदाष्त[३५] लिहिली जे, "शिवाजी राजे मेरे बेटे खरे. परंतु आपणांस बिघडून मेरी बात सुनता नही. बेदिल होकर गया. मेरे हुकूममे नही. इसवास्ते हमारा कुच इलाज चलता नही. हम हजरत पादशाही बंदा हूं. मेरी तकसीर बिलकूल नही. मेरा गुन्हा अछेगा तो दिलोज्यानसे हजर पादशाही जेनाबमें होता हूं इस बातमे मेरे तरफसे कुच देर नही है. हुकूम हुवा तो हजर होता हूं. हजरतेनें शिवाजीकू जित पकड लाना. मै नाहक दरम्यान आया तो मेरा मुलाहिजा मत रखना. मेरी तकसीर हजरतके पावसे हरगीज नही. शिवाजीकू तंबीह देकर हुकूममें लाना. ही मेरी अर्ज सुनना. दुसरी बात जानता नहि." अशी लिहून शाहाजी राजे यानीं पातशाहाचे हुजूर पाठविली.

ती पोहोंचून सर्व हकीकत बडे साहेबिणीस मालूम जाहली. ते समयीं तमाम

---

३३. येथेंही मूळांत " दादाजी " असेंच आहे.

३४. बदराहा—दुर्मार्गी.

३५. अर्जदाष्त=विनति-पत्र.

वजीर व अमीर यांस बोलावून आणोन त्यास हुकूम फर्माविला जे " हरामखार शिवाजी पादशाहीमध्यें पुंड झाला. त्यावर चालून जाऊन जिवंत धरून आणावा" म्हणून फौज देऊन वजिराची रवानगी करीत असतां ही गोष्ट कोणीही कबूल करीत नाहींत [ सें झालें. ] भयाभीत जाहाले. नामर्दुमी वांटियांस आली. कोणीही सामना घेईना तें पाहून खामतमीनें अफजुलखान वजीर तेचक्षणीं उठोन कुरनिशा§ करून अर्ज केला जे, "मजला हुकूम जाहला असतां जाऊन शिवाजीस कैद करून जिवंत आणितों त्याची तमा धरीत नाहीं. मेरे डरसे शिवा बिल्ली‡ होता है. " ऐसें बोलतांच पादशाहजादी परम खुष होऊन खानास शिरपाव दिधला. पांच भरजरी कपडे और मोतनका तुरा दुजी कलगी शिरपेंच जडित कंगण और कंठी व बडा हत्ती पलखदंती एक, ताजी तुरकी घोडे सुमार ५ पांच व शाहगोष† व चित्ते सुमार २ दोन व बा ज जोडी सुमार ५ पांच व भारी मरामतके हत्यार सुमार १० दहा, खेरीज खजाना नाणें होन ३००००० तीन लक्ष व मोहोरा नाणें एक शिक्का अकबरी ७०००० सत्तर हजार पादशाही मातबर हुजरात वगैरे जमादार फौज सुमारें बारा हजार देऊन मोहिमेवर रवाना करून पाठविले.

तदनंतर अफजुलखान परममत्त होऊन, मजल दरमजल हमतमीनें[३६] श्रीकृष्णानदी पार होऊन, कूच दर कूच बालेघांट चढून, शिवाजी महाराजांचे कुलदेवत श्रीतुळजापूर निवासिनी तेथें जाऊन मुक्काम केला. त्या संस्थानची तारांजी[३७] केली. तेथील श्रीची गंडकीमूर्ति होती ती पुजारी यांनीं जळांत गुप्त ठेविली. आणि अन्य नूतन पीठस्थानीं ठेवून पूजा केली. खानानें परम क्रोधें मूर्ति फोडून टाकिली. आणि संपूर्ण मुलूख खराब करून पंढरीस आला. तों पूर्वींच पांडुरंगाची मूर्ति दुष्टाचे भयें पुजारी यांनीं गुप्त ठेवून गांव ओस केला खानानें क्रोध करून मुलूख खराब करून वांईस येऊन कृष्णातीरीं फौजेनिशीं डेरे देऊन अफजुलखान खबरदारीनें राहिले.

आणि तेथें विचार केला जे, शिवाजी यास बहुत विचारें ममता लावून मोह घालून अकस्मात् आणून आपला मतलब साधावा. येविशीं शाहणा चौकस बोलणार प्रसंगोपात्त दक्ष आणि आपणावर शब्द न आणी व दरम्यान दर्द जाणता आपलें स्वरूप राखून योजिलें कार्य करणार असा मनुष्य एक

---

* खामतमा=( कोंवळी, हिरवी महत्वाकांक्षा ) ईर्ष्या.

§ कुरनिशात्=गुढगे टेकून सलाम.

‡ बिल्ली=मांजर.

† शाहगोष=सियाहगोष=कोल्ह्यासारखें काळ्या कानाचें एक जनावर. हें वाघ सिंह यांची पारध करण्यांत उपयोगीं पडतें.

३६. हमतमा=खामतमा वर टीप *पहा.

३७. तारांजी=नासधूस.

दत्ताजीपंत प्रसिद्ध आहे. हा अर्थ अफजुलखान यानें चित्तांत आणोन तदनंतर त्यास बोलावून आणोन उभयतां एकांत करीत बसले. तिसरियाचा प्रवेश नाहीं. खानांनीं चित्तांतील सर्व मनोगत दत्ताजीपंत यांस सांगितला. आणि "तुम्ही राजे यांजकडे जाऊन बहुत ममता. वचनीं बोध करून राजे यांस मोह ममतेस गुंतवून विश्वास दाखवून कैद करून जीवंत धरून विजापुरास हुजूर न्यावा अशी तुम्ही जाऊन तजवीज कृत्रिम चित्तें करणें." हा अर्थ दुर्योधनाचा अविचारकर्म सांगोन रवाना केलें. आणि राजे यांसि बोलावें जे; "तुमचें तीर्थरूप शहाजी व आम्ही कांहीं निराळे नाहीं. घरोबियाचा भाऊपणा चालला आहे. याजमुळें तुम्ही कांहीं आपणांस इतर नाहीं. ही चिंता चित्तावर न असों देणें. तुमचें वडील शहाजी राजे यांनीं महत्कार्यें करून; मुलुख काबीज करून; पादशाहास संतोषित केलें. याजकारितां तुमचें सर्वोपरि ऊर्जित करून; नांवाजून तुम्हांस तळ कोंकणचें संपूर्ण राज्य कायम करून जहांगिरींत देववितो. तुम्हीं किल्ले घेतलले तुम्हांकडे देववितो. तुमचे मर्दुमीची नावाजिशी करून पादशाहाची भेट करून गौरव करवितो. अशा कित्येक प्रकारच्या गोष्टी सांगोन वचनामृतें संतोषातें पाववोन भगीरथप्रयत्नें राजे यांस भेटीस घेऊन यावें. अंदेशामुळें येत नसल्यास आम्हीच येतों असा मनोभाव दाखवून बरकरारीचीं वचनें शिवाजी महाराजांस सांगावीं." म्हणून खानानीं दत्ताजीपंत यासि हेजिबीस परम आदरें पाठविलें.

तदनंतर ही बातमी गुप्तरूपें बातमीचे वार्तिक यांणीं वरचेवर येऊन महाराजांस कळविल्यावरि महाराज सावध होऊन अमित्रांचा विश्वास यासमयीं अणुमात्र धरितां येत नाहीं. विजापुराहून अफजलखान पादशाहजादी जवळ प्रतिज्ञा करून, पैजेचे विडे घेऊन, आम्हांस जीवंत धरून नेण्यास बारा हजार निवडक फौजेनिशीं आला आहे. याचें हितशत्रुत्व कांहीं उपयोगाचें नाहीं. घातक आहे. म्हणून महाराजांनीं आपले मातबर कारकून अष्टप्रधान व सरदार समस्त लोकांस वृत्त सांगितलें कीं; खान वांई मुक्कामीं आला आहे. तेव्हां सर्वांनीं अर्ज केला जे, याशीं युद्ध करणेस अडचणीची जागा जावळी आहे. ते वेळीं महाराज बोलिले जे; ही गोष्ट प्रमाण. म्हणोन प्रतापगडीं जाणेचा सिद्धांत केला. तेसमयीं सेवक लोकांनीं विनंति केली जे, अमित्रास युद्ध न देतां सख्य करावें. तेव्हां महाराज बोलिले जे, यवन बेमान यांशीं सख्य करणें ही अनुचित गोष्ट. घात करतील. पूर्वीं पादशाहानें ममताभाव दर्शवून आपले बंधु संभाजी राजे यांस मारिलें. असे कपटी अधिक श्वान मूत्रासमान;

३८. नावाजिशी=स्तुति, शिफारस.

त्यांचा सहवास सर्वथा करूं नये. तैसे दुर्बुद्धि विश्वास दाखवून आपणास मारितील. या [३९]गोष्टी त्यांचे स्वप्नींही घडणार नाहींत. तेव्हां जागृतीस घडणें कठीण. मारितां मारितां मर्दुमीची सीमा करून शत्रूचा पराजय करावा, ही महाराजांची भारी उमेद. यवनाशीं सल्लाह करणें नाहीं. असा त्रिकर्णचित्तें[४०] करार.

एतद्विषयीं महाराज परम सचिंत असतां रात्रौ निद्रावसरीं श्री तुळजापुरनिवासिनी जगदंबा सादृश्य दिव्यरूपधारी होऊन संपूर्ण भूषणें सालंकृत येऊन अभय वचनें बोलिली जे, "तूं परम भक्तोत्तम तुझे भक्तीची निःसीमता विलोकून तुझे संकटास्तव मूळ पीठस्थान सोडून अफजल-हननास स्वयें येणें केलें आहे. अणुमात्र चिंता न करणें. तुझ्या हस्तें अफजल म्हैसा मारून [४१]दाणीस देववितों. हा हेतु मला उत्कंठित चित्तें लागला आहे. आणि तुजला यशास पात्र करितों. आणि मला वांछित मनोरथ सिद्धीस नेतों." अशीं सक्रोध वचनें अर्पण करून अदृश्य जाहली. हा अनुभव जागृतींत प्रत्यक्ष आला.

तत्क्षणीं महाराज जागृत होऊन, मुखप्रक्षालन करून जागृत राहिले. ते वेळीं मातुश्रीस बोलावून आणून सकल वृत्त श्रुत केलें. निकटवर्ती गोमाजी नाईक पानसंबळ[४२] व कृष्णाजी नाईक व सुभानजी नाईक; शिवाय मोरोपंत पेशवे व अण्णाजी दत्तो व सोनोपंत व गंगो मंगाजी व नेताजी पालकर सरनोबत व रघुनाथ बल्लाळ व उपाध्येबावा यांस बोलावून आणून वर्तमान सांगितलें. प्रत्यक्ष श्री अंबा प्रसन्न जाहली. आतां अफजल मर्कट तें काय ? समयीं मारून गर्दीस मिळवितों. हें ऐकून समस्तांनीं विचार करून बोलिले जे; महाराज हें कर्म श्रीकृपें सिद्धीस गेल्यास उत्तम. नाहीं तर परम कठीण. ऐसें म्हणोन चिंतासागरीं पडले. हें महाराजांनीं पाहून बोलिले जे, सख्य केलिया प्राणनाश होईल. युद्ध करितां जय जाहलिया उत्तम; किंबहुना प्राण गेलिया उत्तम; त्रिभुवनीं कीर्ति होईल. एतदर्थीं श्लोक—

जितेन लभते लक्ष्मी मृत्योश्चापि सुरांगनाः ।
क्षणविध्वंसिनी काया का चिंता मरणे रणे ॥

टीका ॥ शौर्यत्वाप्रतिलब्धता मघवता दीवौकसादीसदा ।
ऐसा अर्थ समर्थ जाण भुतळीं अन्यत्र नाहीं कदा ।
समरीं प्राणहि गेलिया हित असे सत्कीर्ति ते वर्णिती ॥
ऐसें हे शिव भूपती वदतसे अष्ट प्रधानांप्रती ॥ १ ॥

---

३९. या गोष्टी म्हणजे सख्य करण्याच्या.
४०. त्रिकर्णचित्तें-लक्षपूर्वक, निश्चयपूर्वक, या अर्थी.
४१. दाणीस देणें=बळी देणें.
४२. "पानशे" असें मूळांत आहे तें चुकीचें.

आला अफूजल मस्तखोर कपटी ग्रासावयाला क्षणीं ।
त्यातें दंडिन मी प्रतापतवकें कौतूक पाहें रणीं ।
श्री अंबावरदें गुमान न धरीं, ऐसा असे पातला ।
दाणी देइन नीकरें निजबळें श्री तूळजे तूजला ॥ २ ॥
शिव सर्ज्या वदला सकोप हृदयीं दंडावया पामरा ।
स्मश्रू पीळुनियां करें चमकला कंपीत जाली धरा ॥
मघवादीक समस्त देव गगनीं येवोनियां दाटले ।
पाहा कौतुक आगळें म्हणउनी अभ्यंतरीं तिष्ठले ॥ ३ ॥

ऐसें शास्त्र संमत राजनीतीमध्यें सार विचार सांगितला आहे. तदनुरूप धार्मिक नृपें वर्तावें हाच विहित धर्म. पहुतर पराक्रमाची निःसीमताच करावी ही प्रमाणताच आहे. आतां एक विचार आहे जे, चिरंजीव संभाजी राजे लहान व मातुश्री यांसि राजगडीं[४३] ठेवितों. खान मारून जय संपादिल्यावरि राज्य मीच करितों. जरि येखादेसमयीं लढाईंत मेलों तरि मागें संभाजी राजे यांस राज्य देऊन त्यांचे आज्ञेत तुम्हीं रहावें.

ऐसें निर्वाण सांगोन मातुश्रीचे दर्शनास जाऊन चरणावरि मस्तक ठेविला. मातुश्रीनीं अलायबलाय घेऊन मस्तकीं विजयहस्त ठेविला. ते समयीं उभयपक्षीं परम श्रम वाटोन सावधतेनें सांवरून जय संपादावा, ही महाराजांची उमेद. महाराजांचा मुखचंद्रमा मातुश्री यांनीं विलोकन केला तों महातेजस्वी दैदीप्यमान. तेव्हां मातुश्री यांसि परम संतोषाच्या कोटी होऊन महाराजांस आशीर्वाद दिधला जे, शिवबा! यासमयीं शत्रूचा पराजय करून सहविजय होशील. ऐशीं अमृतवचनें मातुश्रीचे मुखांतून निघालीं. येणेंकरून महाराज परम समाधान पावले.

तदनंतर मातुश्रीची आज्ञा घेऊन निघोन किल्ले प्रतापगडास आले आणि नेताजी पालकर यांस आज्ञा केली जे, "लष्कर घेऊन वर घांटीं येणें. अफजलखान जावळीस बोलावितों. सल्ला करून भेटतों म्हणून विश्वास लावून जवळि आणितों. तेव्हां तुम्हीं घांटमाथा येऊन मार्ग धरणें." ऐसें सांगितलें. आणि त्यांजसमागमें रघुनाथ बल्लाळ सबनीस यांस दिधलें. मोरोपंत पेशवे यांजबराबर त्रिंबक भास्कर व शिवराज पद्माक्षी जमातदार होता त्याजबराबर फौज देऊन त्यांनींही कोंकणांतून यावें असें केलें. आणि आपण निदान करून महाराज हिम्मत धरून राहिले.

---

४३. "रायगडीं" असें मूळांत आहे. पण दोघेंही प्रतापगडींच होतीं असें पुढील संदर्भावरून होतें.

इतकियांत दत्तोपंत हेजीब[४४] अफजलखानाकडून प्रतापगडास आले त्यांस महाराजांनीं गडावरि घेतलें आणि कचेरी करून दत्ताजीपंत यांस दर्शनास येण्यास सांगितलें, नंतर त्यांनीं येऊन दर्शन घेऊन किती एक गोष्टी अफजलखानाकडून सांगितल्याप्रमाणें त्यांणीं महाराजांस विदित केल्या. लौकिकांत बोलावयाचें तें महाराज व दत्ताजीपंत हेजीब बोलले. तदनंतर महाराजांनीं स्वमुखें हेजिबास आज्ञा केली जे, "जैसे तीर्थरूप शहाजी राजे वडील तैसेच खान आपणांस वडील. त्यांचे भेटीस परमप्रीतीनें सहस्रप्रकारें येतों." ऐसें सांगून दत्ताजीपंतास बिऱ्हाडास स्थळ दिधलें. तेथें बिऱ्हाडास जावयास महाराजांनीं आज्ञा केली. ते जाऊन बिऱ्हाडीं उतरले. तेथील सर्व व्यवस्था पूर्वींच झाली होती.

तदनंतर अस्तमान होतांच भोजनें जाहल्यानंतर रात्रौ एकांतीं दत्ताजीपंत यांस महाराजांनीं बोलावून आणून महाराज व हेजीब एकांतास बसोन मन खुलाशानें, कृत्रिमभाव अणुमात्र न धरतां उभयपक्षीं क्रियापूर्वक शफती जाहल्या. तदनंतर महाराजांनीं दत्ताजीपंतास शफत घालून साद्यंत वर्तमान विचारिलें कीं, "यथार्थ सत्य सांगणें. अफजलखानाचा अंतर्यामापासून मनोगत कसा आहे हें सत्यक्रियापूर्वक सांगणें. आम्ही तुम्हां वेगळे अणुमात्र कदापि नाहीं. तुम्हांस मखतसर* करून सर्वांभ्य कारभार देतों. यदर्थीं अणुमात्र अन्यथा नाहीं." ऐसें सांगून श्री तुळजा भवानीची शफत देऊन तत्वार्थ अफजलखानांचें वृत्त आम्हांस सांगणें ऐसें ममतापूर्वक घरोब्यांत घेऊन वर्तमान पुशिलें, तेव्हां दत्ताजीपंतानें महाराजांचे अमृतवचनावरून अमित्राची ममता लोभ न धरितां निव्हाळ्यानें महाराजांस सविशदें[४५] वर्तमान विदित केलें जे, "खानाचा मनोभाव कृत्रिमाचार अवघा असा प्रकार आहे. तो असा कीं, महाराजांस भेटीस नेऊन, परम विश्वास दाखवून, कैद करून, विजापुरास पादशाहाकडे घेऊन जावें. असा निश्चय दृढतर आहे. करितां यासमयीं महाराजांचें ठायीं हिम्मत आणि करामत असलिया आपण खानास ममता मोह घालून व नानाप्रकारें बोध करून सामावेशींत येण्यासारखे येथें जावळीस आणितों. महाराजांनीं असावध न राहतां सावधपणें खानाचे भेटीस येऊन हिम्मत धरून भेटी घेऊन एकांतस्थळीं योजिलें कार्य संपादावें व त्याजकडील लष्करही हिय्या करून बुडवून नेस्तनाबूद[४६] करणें आणि या जयाची ध्वजा अचल लावून

---

४४. हेजीब—वकील.

* मखतसर—वतनदार.

४५. सविशदें—विशदपणें, स्पष्टपणें, मोकळेपणें.

४६. नेस्तनाबूद—नष्ट, नाहींसें.

राज्य संपूर्ण अनुभवून द्रव्यसंचय करून, सर्व पादशाहांस तंबी पोंहचविणें, ऐसा विचार आहे तो अंतःकरणपूर्वक महाराजांस सांगतों." ही गोष्ट महाराजांचे चित्तास दृढतर आली. ते समयीं दत्ताजीपंत यांस, महाराज कृपाळु, भरजरी वस्त्र व मोतियांचा चौकडा व सुवर्णाचीं कडीं व पदकें व आरबी घोडा एक व नख्तनाणें होन ५००० पांच हजार बक्षीस दिले. आणि खानास बहुतां प्रकारें मनोभावें सांगणें जे, "राजे तुम्हांस फार भितात. वांईस भेटीस यावयास धैर्य होत नाहीं. खान आम्हांस वडील आहेत, यास्तव मेहेरबानगी करून येथें जावळीसच येऊन भेटतील तर आपण भेटीस येऊं. आपल्यास धीर भरंवसा देऊन पादशाहाचे मुलाकतीस घेऊन जाऊन ऊर्जित करतील तर खानांचें थोरपण. विश्वास आहे तरि ऐसें घडावें." असें सांगून रवाना केले.

ते वांईस जाऊन खानास भेटले आणि सर्व करीणा जाहीर केला. राजे यांणीं फार लांच दिधला यास्तव महाराजांकडील माया धरून रदबदली केली. "राजे येथें भेटीस यावयास शंका धरतात, आपणच जावळीस जाऊन भेट घ्यावी आणि दीलदिलासा[४७] देऊन राजे यांस बरोबर विजापुरास घेऊन जावें," ऐसा महाराजांचा मनोभावार्थ सविशदें निवेदन केला. तो ऐकून घेऊन पंतावर परम समाधान पावोन वस्त्रें भूषणें दिधलीं. आणि दत्ताजीपंत यांच्या गोष्टी खानाचे चित्तास येऊन हर्षेंकरून लष्कारासहित कूच करून रडतोंडीचा घांट उतरून गेले. घांट कुँबल[४८] कांहीं सामान्य नव्हे, अगदीं झाडी नानाप्रकारचे कंटक वृक्ष आणि पाषाण पर्वताकार, अडचणीची जागा, लष्कर फार हैराण झालें. सुखवासी मोंगल लोक शेंबी करवंदी तोरणीच्या जाळ्या लागून कितीएकांचे आंगांचीं रुधिरें निघालीं. कांटे लागोन वस्त्रें फाटून जर्जर झाले. तेव्हां पठाण व मोंगल लोक विचारीं पडले. तोबा! तकशीर! म्हणूं लागले. अफजल बेनवें[४९] हुवा. शिवा बडा हरामखोर, उसकी करामत व हिकमत इनशा अल्ला हुत आला जानताहे. इस वखत अफजल जानी जमियतसे बचता नही. यहि बात सच्ची. याप्रमाणें लहानथोरांपासून लष्करचे लोक बोलों लागले. तितक्यांसही निराकरण करून कोणाचेंही न ऐकतां भ्रम भास पडोन पुढील अर्थ चित्तांत न आणितां उन्मत्त होऊन प्रतापगडाखालीं जावळीनजीक शिबिरें पर्वताकार सफेत लाल भगवीं बहुत उभविलीं. नगारे व कर्णे वाजंत्रें माठूं[५०] व पादशाही साहेब नौबती वाजों लागल्या. अफजलखान आलियाचें वर्तमान

---

४७. दीलदिलासा=भरंवसा, आश्वासन.
४८. कुबल, कुब्बल–फार मोठा, अतिकठिण.
४९. बेनवा–गरीब लाचार.
५०. "माळू" असेंही होईल.

गड किल्यास लहानापासून येरास लागोन चहूंकडे आसपास बारापंधरा हजार स्वार व वीस पंचवीस हजार रजपूत व रांगडे कायम प्यादे व बरखंदाज तोफखाना बाण सुमार १०००० दहा हजार व थोर तोफा ७० वगैरे मिळोन १०० शंभर व जंबुरे २५ पंचवीस हातनाळा १०० शंभर व सुतरनाळा ७५ पाऊणशें व गरनाळा २५ पंचवीस ह्याप्रमाणें सामान व फौजेची गणती पठाण लाहुरी निजामशाही ३००० तीन हजार व मोंगल अदलशाही २००० दोन हजार व रोहिले १००० एक हजार, धनगर जातीचे मर्दाने २००० दोन हजार, मराठे नामांकित हेटले बिरदाई[51] शहाणव कुळीचे[52] ४००० चार हजार ही नेहमी फौज बरकसराची तैनात[53] याखेरीज गैराद[54] हशाम व भवास याची फौज ४००० चार हजार याप्रमाणें फौजेचा कटा. सामान पुरें. हमतमाचे लोक व बारबरदारीचे उंट सुमारे १५०० दीड हजार व हत्ती सुमारें ७५ पाऊणशें इतकें संगिनात अफजलखानाचे जागजागां हवा पाहून चहूंतर्फा सावधतेनें लष्कर उतरलें.

तदनंतर अफजलखान यास बहुत उत्कंठा महाराजांची भेटी घ्यावयाविशीं लागली. तेणेंकरून कांहीं सुचेना. तेसमयीं दत्ताजीपंत हेजीब यांस महाराजांकडे किल्ले प्रतापगडास पाठविलें कीं, भेटीस विलंब न लावितां सत्वर यावें म्हणून. त्याप्रमाणें दत्ताजीपंत महाराजांस येऊन भेटले आणि लौकिकार्य उभयतांचें बोलणें होण्याचें होऊन तदुत्तर महाराज व दत्ताजीपंत एकांत स्थळीं जाऊन स्वहित स्वार्थाचीं सदृढ भाषणें होऊन खानाचें सर्व वर्तमान महाराजांस निवेदन केलें. "आम्ही जें स्वामीसन्निध बोलिलों त्याप्रमाणें खानास घेऊन जावळीस आलों. आतां महाराजांची व खानाची भेटी खाशाखाशांची एकांतीं करवितों. तेथें महाराजांनीं निर्भयता चित्तांत कल्पून हरफाई करून भय न धरितां क्षात्रधर्मास प्रवर्तोन धैर्य धरून इहपरलोकीं सत्कीर्ति होई तो अर्थ साध्य केलिया शत्रूचा पराजय होतो." हें ऐकून महाराज जीवित्व तृणप्राय मानून यासमयीं ही वेळ साधलिया शत्रुपराभव होतो, भय धरलिया प्राणार्पण होतें, यास्तव या काळीं शौर्यत्वाची सीमा करून योजिला कार्यभाग सिद्धीस न्यावा तरच पुरुषार्थ आणि पराक्रम शौर्य कर्माचरण. अरिजनास शिक्षास्पद करावें हा नीतिधर्म, यदर्थी श्लोक—

शीवाजी नृपती समर्थ गरिमा प्रौढ प्रतापें अती ।

---

५१. बिरदाईत=बिरदें वागवणारे.

५२. शहाणवकुळीचे—ब्रह्मवंश, शेषवंश, सूर्यवंश, चंद्रवंश असे चार वंश. प्रत्येक वंशांत २४|२४ कुळें मिळून शहाण्णव.

५३. ताबिनात=खुद ताब्यांतील.

५४. गैराद—दुसरे कडून आलेली.

दावी शस्त्र धरूनियां हि चपळें त्या आफजल्लाप्रती ॥
मागा तूं सरल्या हिनत्व अगळें शोधून पाहें मना ।
दंडी पामर एकदां निजकरें ऐशी किजे साधना ॥ १ ॥
जैसा रावण मारिला निजकरें श्रीरामचंद्रे कसा ।
राजा अफ्जल दंडिजेच निकरें आणा रिपू हो तसा ॥
येताहे मुढ चालुनीच निकटीं ठेऊं नको ये घडी ।
व्हावें सावध सावधान प्रभुजी घाली त्वरें तूं उडी ॥ २ ॥
भ्रमभासें भुललाच खान कुमती मारावया तूजला ।
भेटीतें प्रभु येतसे इसघडी म्हैसा असे पातला ॥
साक्षी त्या करणें जयासि वरणें श्री अंबिका तुष्टवीं ।
भीमें कीचक ताडिला तदुपरी येमालया पाठवीं ॥ ३ ॥
खानाची मिठि सोडवूनि चपळें दावीं तया कौतुका ।
शिवसर्जा नढळे कदापि नृपती देई बळें त्या धका ॥
उदरीं मारुनि बीचवाच निकरें घेईच प्राणा क्षणीं ।
आहे प्राण वुतें विलंब न लवीं दुष्टासि दंडीं रणीं ॥ ४ ॥
दत्ताजीपंत-वाक्य श्रवणहि करुनी भुपती तुष्ट झाला ।
सन्मानें गौरवूनी निजहित विषया मागुती पाठवीला ॥
यावें घेऊनि खाना म्हणवुनि चपळें गुह्य हें जाणवीलें ॥

\+ + + + + +

आतां याप्रमाणें हरफाई करणें तैशी करून योजिलें कार्य सिद्धीस नेगें म्हणोन पंतानीं बहुतां प्रकारें सांगोन महाराजांची व खानाची भेटी तिसरे दिवशीं करावयाचा सिद्धांत केला. महाराज प्रतापगडाहूनं[५५] उतरून खालीं यावे खानानीं गोटांतून पुढें चालून यावें आणि खाशाखाशांनींच भेटावें. समागमें कोणी नसावें. दूर असावें.

असा निश्चय करून महाराजांचा निरोप घेऊन दत्ताजीपंत हेजीब जावळीस जाऊन सविस्तर महाराजांचा मनोगत खानांस सांगितला. तो एकून घेऊन महाराजांच्या गोष्टी अत्यादरें मान्य केल्या. दुसरे दिवशीं महाराजांनीं किल्लेखालीं डेरे देववून त्यांत सात सदरा एकापरीस एक अधिक; इंद्रभुवनातुल्य भिन्न भिन्नप्रकारच्या [ केल्या. ] त्यांचा तपशील:—प्रथम सदर साधी सफेत वस्त्रांची चौफेर अस्मानगिऱ्या[५६] सफेत लोड बालिस्ते शुभ्र स्तंभ आदीकरून

५५. मूळांत " राजगडाहून " असें आहे तें चुकीचें आहे. कारण राजगडाहून शिवाजी पूर्वीच प्रतापगडास आला होता.
५६. अस्मानगिरी=छत.

सफेत वस्त्रांनीं मढविले. बैठकाही सफेत. तदनंतर दुसरी सदर रमणीक निर्मिली ती हिरवी. अस्मानगिऱ्या लोड गाद्या गिरद्या. पडदे बैठका स्तंभ हिरवे वस्त्रांनीं मढविले. तोरणेंही हिरवीं पर्णाचीं. कंदील हिरवे. तदुत्तर तिसरी सदर लाल कुसुंबी, सदरप्रमाणें. चौथी सदर कैंठस्पाकी सदरहूप्रमाणें निर्मिली. पांचवी सदर पिवळी तऱ्हेदार सदर अन्वयें खासास प्रिय अशी निर्मिली. सहावी सदर मनोविश्रांतियोग्य भरगच्ची किनखापी वर लिहिले अन्वयें करविली. सातवी सदर खुद्द महाराजांचे बैठकीची. नाविष्णुः पृथ्वीपतिः शिवराजेंद्र कलियुगीं धर्म स्थापणार ती श्रवण गोचर केली पाहिजे. अफजलखानास विलोकनास परम शूरत्वें निर्मिली असे. श्रीविष्णुसभा व श्रीशंकरसभा व ब्रह्मसभा व इंद्रसभा व यमधर्मसभा व अनुपदें अष्टदिक्पालसभा, मृत्युलोकींचे नृपांच्या सभा हरिश्चंद्र व श्रीरामचंद्र व श्रीकृष्ण व पांडव व भोजभूपति व परोपकारी विक्रम [यांच्या] सभा [तशी] प्रस्तुत या युगीं शहाजीसुत शिवछत्रपती महाराजाची देदीप्यमान सभा विराजली. अष्टस्तंभ प्रचंड परम शोभायमान भरजरी बादली वस्त्रें कडून वेष्टिले. बादली अस्मानगिऱ्या. सभोंवते पडदे लोड बालिस्ते गिर्द्या पडगाद्या बिछाईत गुच्छ ठायीं ठायीं तुईदार विराजली. चौफेर चौकटी साधून बैठका परम रमणीक शोभायमान. भिंती सुवर्णपाणी ढाळलेले नानाप्रकारचे रंग चतुर चित्रगाराकडून श्रीरामायण भारत चित्ररचना रावण कुंभकर्णादि तैसेच पांडव दुर्योधनादि युद्ध पराक्रम अद्वितीय असाधारण मनोरंजन विश्रांती सकलांस अशी कौशल्यता दाखविली. अनुपदें श्री त्रिदशादि गणगंधर्व यक्ष किन्नर सिद्धचारण असुरादि अष्टदिक्पाल व पवनभक्षक व तपोतेजस्वी ऋषेश्वरादि नर धार्मिक नृपतींच्या सभा सांगोपांग ठायीं ठायीं सुरेख मूर्तिमंत रेखिल्या. सभोंवते आरसे श्रेष्ठ सान खणोखणीं जडिले. भिंगे तऱ्हेदार बंदरोबंदरींचीं पंचरंगी हरित, पीत, आरक्त नीलवर्ण शुभ्र समसमान भिंती भागीं खिळिलीं. तेणें करून अधिकोत्तरता प्रभा विराजली. तदुत्तर सभासदनीं अभिनव कौतुकप्रदता विश्वकर्म्यातुल्य केली. चंद्रसूर्य तारांगणें अंतरिक्ष श्यामवर्ण आकाश निर्मोन आचोजता करून दाखविली. जनास नयनगोचर करितांच मानसें आनंदोत्कलित होत आहेत. तदनंतर सभासदनीं मुक्तघोस, तदुत्तर वाळ्याचे तटीदार पडदे, त्यांजवरि गुलाबी अत्तर शिडकावलेलें. सुवर्ण तबकीं गंगेरी पीतपर्णें व पूगीफळें वेला लवंग संयुक्त जायफळ व पत्री सुवासिक कातगोळ्या भरलेले चौफुले गुलाबी अत्तर व चंदनी अरगजा अबीर केशर कस्तुरी

---

५७. कळसपाकी=सर्पाकार रेघा किंवा मीडी आहेत ज्यांत असें कापड. हें बहुधा केसरी किंवा रक्तपीत मिश्रित असें असतें.

५८. तुईदार–तुई=तोय, कलाबूत.

येऊन पोहोंचले. नंतर पुण्यतिथीचा उत्साह करून दुसरे दिवशीं श्रीकृष्णा- प्पास्वामींच्या पादुका रथांत घालून पश्चिम दिशेस नेऊन तेथून रथ माघारा आणिला. असो.

काहीं एक दिवस झाल्यानंतर तिसरे पुण्यतिथीचे उत्साहाचे दिवशीं ब्राह्मण भोजनास बसवून रामदासस्वामी व केशवस्वामी यांस [ जयरामस्वामी ] बोलले कीं, आज आमचा रंगोबा हा येणार आहे त्यास तो आला म्हणजे तुम्ही व आम्ही भोजन करूं. असें म्हणून वाट पाहत बसले. तों इकडे हैदराबाद येथें रंगनायस्वामी दोन प्रहरचे वेळेस स्नान करून संकल्प करूं लागले तों त्यांस स्मरण झालें कीं, कृष्णाप्पास्वामींची आज पुण्यतीथ आहे. नंतर संध्या करून देवाची पूजा करून नैवेद्य दाखवून खिजमतगारास सांगितलें कीं, घोडा तयार करून घेऊन यावा आम्हांस जाण्याची फार नड आहे. मग घोडा त- यार करून स्वामीसन्मुख उभा केला. नंतर रंगनाय स्वामींनीं घोड्यावर बसून खिजमतगारास सांगितलें कीं, तूं आज आमच्या बरोबर येऊं नको. असें म्हणू- न निघाले ते दोन घटकारात्रीचे सुमारें दिल्लीच्या खिंडींत आले. तों ५० चोरटे तेथें बसलें होते ते श्रीरंगनायस्वामी यांस पाहून आडवे आले आणि म्हणूं लागले कीं, तूं बऱ्या गोष्टीनें घोडा व आंगावरील पोषाख काढून आम्हांस द्यावा नाहीं पेक्षां आम्ही तुला मारूं. असें चोर बोलतांच श्रीरंगनायस्वामींनीं आपल्या मनांत विचार केला कीं, येथें भांडत रहावें तर जाण्यास फार रात्र व्हावयाची. मग रंगनायस्वामींपाशीं धनुष्य होतें त्यास एक तीर लावून खैरा- च्या खुंटास तीर मारून [ते] चोरट्यांस म्हणूं लागले कीं, तो तीर उपटून मग आमचे आंगावर यावें. मग चोरटे खुंटापाशीं जाऊन तीर उपटूं लागले तों तो तीर कांहीं केल्या निघेना. मग त्यांनीं विचार केला कीं, हें कर्म मनुष्याचें नाहीं हा केवळ ईश्वरच आहे असें म्हणून चोरांनीं साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना केली. [ नंतर ] तेथून वडगांवास येतात तों जयरामस्वामी व रामदास- स्वामी यांनीं अस्तमान पर्यंत वाट पाहिली आणि कीर्तनास आरंभ केला होता. तों इतक्यामध्यें श्रीरंगनायस्वामींचा घोडा हिंसला. तो शब्द ऐकून आपा गोसा- वी यांनीं जयरामस्वामींस सांगितलें कीं, रंगोबा आला आहे. मग स्वामींनीं शिष्यास सांगितलें कीं, आम्ही भोजन करूं तों पर्यंत कीर्तन करावें. तों इतक्यामध्यें श्रीरंगनायस्वामी घोड्यावरून उतरून श्रीकृष्णाप्पास्वामी यांचे समाधीचें दर्शन घेऊन रामदासस्वामी यांची भेट घेऊन बसले. मग जयरामस्वामी

---

११. येथें " निगडी " असें असावें.

व रामदासस्वामी हे रंगनाथस्वामी यांचे हातास धरून मठाकडे भोजनास गेले आणि खिजमतगारास सांगितलें कीं, रंगनाथस्वामींचे घोड्यास आज श्रम फार झाले आहेत तर त्याचा बंदोबस्त नीट ठेवावा. असें सांगून आपण रंगनाथस्वामी, रामदासस्वामी, केशवस्वामी आणि आनंदमूर्तिस्वामी असे सर्वत्र भोजन करून कीर्तनास बसले. नंतर जयरामस्वामी यांचे शिष्य यांनीं येऊन सांगितलें कीं, रंगनाथस्वामी यांचा घोडा मृत्यु पावला. हें वर्तमान रंगनाथस्वामी यांनीं ऐकून फार खेद केला आणि [त्यांचे] नेत्रांस अश्रु ही आले. हें पाहून जयरामस्वामी रंगनाथस्वामी यांस म्हणूं लागले कीं, घोडा कांहीं मरावयाचा नाहीं. त्यास निद्रा लागली आहे तूं कांहीं चिंता करूं नकोस. उदयीक रथोत्साह झाला म्हणजे पाहतां येईल. असें म्हणून कीर्तनसमारंभ चालू केला. नंतर दुसरे दिवशीं रथोत्साह करून श्रीकृष्णप्पास्वामी यांचा तीर्थप्रसाद घेऊन आपाजीगोसावी बोरपळकर जयरामस्वामी यांचे शिष्य यांचे ओट्यांत नारळ घालून त्यांस सांगितलें कीं, उत्साहाचे दिवशीं कीर्तन तुम्ही करीत जावें. असें सांगून आपण रंगनाथस्वामींबरोबर मंडळी घेऊन घोड्यापाशीं आले. तों घोड्याचें पोट फुगून मृत्यु पावला असें पाहून रंगनाथस्वामी धरणीवर आंग टाकून मूर्छित झाले. नंतर जयरामस्वामी रंगनाथस्वामींस उचलून सावध करून म्हणूं लागले कीं, तुझा घोडा निद्रित आहे. तूं [ मात्र ] घोडा मृत्यु पावला असें म्हणतोस. मग श्रीरंगनायस्वामी म्हणूं लागले कीं, घोडा कांहीं निद्रित नाहीं. घोडा खास मेला. असें बोलतां च जयरामस्वामी म्हणूं लागले कीं, मी तुजला सांगतों त्याचा विश्वास धर तुझा घोडा आतां जागृत करून उभा करितों. असें म्हणून जयरामस्वामी सर्वत्र मंडळी पाहात असतां श्रीकृष्णाप्पास्वामी यांचें तीर्थ हातांत घेऊन घोड्यावर टाकून आपले आंगावरील छाटी काढून तीन वेळा फिरवून घोड्यास म्हणूं लागले कीं, तूं आतां सावध हो. अशीं अक्षरें जयरामस्वामी यांचे मुखांतून निघतां च त्या घोड्याचा प्राण गेला होता तो परत माघारा येऊन सर्वत्र मंडळी पहात असतां घोडा उभा राहून आंग झाडून हिंसूं लागला. हा चमत्कार सर्वत्रांनीं पाहून मोठें आश्चर्य करून एकमेकांशीं बोलूं लागले कीं, हें कृत्य मनुष्याचें नव्हे. जयरामस्वामी हे प्रत्यक्ष नारायणाचा अवतार आहेत. मग श्रीजयरास्वामी यांनीं त्या घोड्यास सांगितलें कीं, रंगोबाची प्रीति तुजवर फार आहे तर त्याचा जीवात्मा आहे तोंपर्यंत त्यास अंतर देऊं नकोस. असें सांगून घोडा रंगोबाचे स्वाधीन केला. मग आपण, सर्वत्र मंडळी, व रंगनाथ स्वामी मठांत येऊन स्वामींचे सेवेस लागले.

श्रीकृष्णाप्पास्वामी यांनीं जयरामस्वामींस सांगितले होतें कीं जगदुद्धार करावयासाठीं तुह्मीं अवतार धरला आहे तर तीर्थयात्रेचे मिषानें निघावें म्हणजे सर्व लोकांचा उद्धार होईल. अशी आज्ञा गुरूची होती तिचा विचार करून स्वामी तीर्थयात्रेस निघाले. प्रथमतः रेवणसिद्ध याचे डोंगरावर येऊन तेथें कितीएक दिवस [त्यांनीं] अनुष्ठान केलें. त्या जाग्यावर स्वामींची अनुष्ठान करण्याची वोहरी अद्यापि आहे. मग तेथून निघून श्रीपंढरीस येऊन श्रीपांडुरंगाचें दर्शन घेऊन नंतर पैठणास जाऊन श्रीएकनाथमहाराज यांचें दर्शन घेऊन तेथून निघून यात्रा करीत करीत काशी क्षेत्रास आले आणि तेथील त्रिस्थळी यात्रा करून मग तेथून निघून बदरीनारायणास आले आणि तेथें बदरीनारायणाची पूजा करून रेतोदक नामक तीर्थ आहे तेथें स्वामी गुंफा बांधून स्नानसंध्या करीत राहिले. तों बदरीनारायणापाशीं एक ब्राह्मण अनुष्ठान करीत होता कीं, मजला गुरु मिळावा. रोज अडीच तोळे बचनाग खाऊन बसला होता. त्यास एके दिवशीं रात्रीं श्रीबदरीनारायण यानें स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, रेतोदक तीर्थ आहे त्यापाशीं एक ब्राह्मण अनुष्ठान करीत बसला आहे. तो तुझा गुरु आहे. तर तूं त्यास शरण जावें. गुरु कृपा करील. असें सांगून आपण गुप्त झाले. मग तो ब्राह्मण जागृत होऊन दृष्टांताचा विचार करून बदरीनारायणास साष्टांग नमस्कार करून जेथें जयरामस्वामी अनुष्ठान करीत बसले होते तेथें येऊन पाहातों तों स्वामी नेत्र झांकून ध्यानस्थ बसले आहेत. असें पाहून त्यानें मनांत विचार केला कीं यानपाशीं काय सामर्थ्य आहे तें पाहून त्यास शरण जावें. असा मनांत विचार करून जयरामस्वामी यांस आसनासुद्धां उचलून रेतोदक नांवाचें तीर्थाचें कुंड मोठें होतें त्यांत स्वामींस टाकिलें आणि आपण उभा राहिला. हा मजकूर स्वामींस समाधीचे सुखांत माहीत नाहीं. तें तीर्थ कसें होतें तें सांगतों. कोणी मनुष्यानें उदकांत हात घातला तर गळून पडावा असें उदक गार होतें. कोणास मार्जन करावयाचें असलें तर दर्भाचे काडीनें मार्जन करावें असें असून त्या तीर्थामध्यें स्वामी पहिल्यासारखे आसनाचा कांहीं एक चळ न होतां स्वस्थ बसले आहेत असें पाहून मनांत विचार करून साष्टांग नमस्कार घालून म्हणूं लागला कीं, मजकडून हा अपराध फार झाला आहे आणि मोठा हंबरडा फोडून रडूं लागला. मग स्वामींनीं समाधि विसर्जन करून पाहिलें तों मोठ्यानें रडत आहे आणि दीन झाला आहे. तें पाहून स्वामी त्यास म्हणाले कीं, तूं मजला वरती काढ. तेव्हां तो ब्राह्मण बोलला कीं, मजला आंत यावयास सामर्थ्य नाहीं. आपण मजवर कृपा करून माझा अधिकार न पाहातां आलीकडे

यावें. मग स्वामींनीं आपल्या आसनास सांगितलें कीं, आतां पलीकडे चलावें. असें बोलतां च आसनासुद्धां स्वामी बाहेर निघाले. हें पाहून काळोपंत म्हणूं लागले कीं, बदरीनारायण यांनीं मजला आज्ञा केली ती खरी असें म्हणून दंडवत प्रणिपात केला आणि हात जोडून म्हणूं लागला कीं, मजवर कृपा करून मंत्रोपदेश करावा. अशी विनंति करतां च स्वामींनीं त्याचें अंतःकरण पाहून आपल्या समोर बसवून त्याचे मस्तकीं हात ठेवून षडक्षरी मंत्राचा उपदेश केला, आणि गोपाळस्वामी असें आपल्या त्या शिष्याचें नांव ठेवून तेथें कांहीं एक दिवस राहून काशीयात्रेस निघाले.

वाटेनें जातांना एका अश्वत्या खालीं विश्रांतीस बसले. तों त्या अश्वत्यावर एक ब्रह्मराक्षस बसला आहे असें गोपाळस्वामींनीं पाहिलें आणि आपले विद्येचे सामर्थ्येंकरून बोलण्यास आरंभ केला आणि त्यास खालीं उतरून यावें असें बोलतां च तो ब्रह्मराक्षस म्हणूं लागला कीं, आपणापाशीं आंगावर भगवी छाटी घेऊन निद्रा केली आहे त्याचें मजला फार भय वाटतें. तर आपण त्याजला जागृत करून मजला त्याचे पायाचें दर्शन घेऊं द्यावें. म्हणजे माझे जन्माचा उद्धार होईल. असें बोलतांच स्वामी आंगावरील छाटी काढून गोपाळस्वामी यांस म्हणूं लागले कीं, तूं कोणापाशीं बोलत होतास ? मग गोपाळस्वामी यांनीं सांगितलें कीं, वृक्षावर मोठा ब्रह्मराक्षस आहे त्याजला विद्येचे सामर्थ्यें करून बोलविलें. मग त्यानें सांगितलें कीं, माझा उद्धार करावा. त्यास आपले युक्तीस येईल तसें करावें. आपण जगदुद्धार करावयासाठीं अवतार घेतला हें जगामध्यें प्रसिद्ध होईल. असें सांगून गोपाळस्वामी उगीच राहिले. मग जयरामस्वामी गोपाळस्वामींस बोलले कीं, तूं गोष्ट सांगतोस ही ठीक आहे. परंतु तूं पूर्वीं कोण होतास व येथें कोणते कारणानें राहिलास हें त्याजला विचारून मजपाशीं घेऊन यावें. असें सांगितल्यवर गोपाळस्वामी यांनीं त्या ब्रह्मराक्षसास स्वामींपाशीं आणून उभा केला. मग ब्रह्मराक्षस साष्टांग नमस्कार करून उभा राहिला. हें स्वामींनीं पाहून आपले कमंडलूंतील उदक घेऊन त्याजवर टाकतांच त्याचा उद्धार होऊन त्याचे देहापासून एक पुरुष निघून स्वामी पुढें उभा राहिला. मग त्यास स्वामींनीं सांगितलें कीं, तुम्ही आतां स्वर्गसुख भोगून स्वस्थ असावें. मग त्याजला स्वर्गाहून विमान येऊन त्यांत बसून तो निघून गेला. असा तो ब्रह्मराक्षस होता कीं त्यानें त्या मार्गानें पांच पन्नास वर्षे लोक जाऊं दिले नाहींत. त्याचा उद्धार जयरामस्वामी यांनीं केला.

मग तेथून निघून तीर्थयात्रा करीत करीत वाटेनें किती एक जनांचा

उद्धार केला व गोपाळस्वामी यांस सांगितलें कीं तूं आतां मंत्रविद्या सोडून दे. अशी त्यांची खात्री करून नंतर काशीक्षेत्रास आले. तेथें जयरामस्वामी यांस कांहीं शीत ज्वराची भावना झाली त्यामुळें काशींत राहणें झालें. स्वामी रात्रीं कीर्तन करण्यास उभे राहिले म्हणजे आपल्या आंगावरील छाटी काढून आपणास हींव येत होतें त्या हिंवास सांगावें कीं, कीर्तन होई तों पर्यंत तूं या छाटींत असावें असें म्हणून छाटी आपणा पुढें ठेवावी, मग त्या छाटीनें मनुष्यासारखें उडत असावें. सर्वत्र मंडळी कीर्तनास येत होती त्यांनीं ते पाहून आश्चर्य करावें. असा चमत्कार सर्व क्षेत्रामध्यें समजून कीर्तनाचे समयीं हजारो लोक यांनीं कीर्तन होईपर्यंत आनंदयुक्त असावें व [त्यांचे] नेत्रांतून अश्रुपात व्हावे. असें कांहीं एक दिवस झालें.

नंतर तेथें अनंतदेव म्हणून सत्पुरुष कृष्णभक्त होते त्यांस त्यांचे शिष्यानें सांगितलें कीं, दक्षिणेकडून जयराम नांवाचा गोसावी या क्षेत्रामध्यें आला आहे. तो कीर्तन फारच चांगलें करितो. असें सांगितलें आणि म्हणूं लागले कीं उदयीक जन्माष्टमीचा उत्साह आपल्या येथें आहे तर जन्मकाल त्यांचे हातून व्हावा अशी आमची सर्वत्रांची इच्छा आहे. असें सर्वत्र मंडळी बोलताच अनंतदेव यांनीं फार उत्तम म्हणून बरोबर शिष्य कांहीं ब्राह्मण मंडळी घेऊन जयरामस्वामी यांची भेट घेतली तेव्हां एकमेकांची ऐक्यता होऊन समाधान झालें. नंतर अनंतदेव यांनीं स्वामींस सांगितलें कीं, आजरात्रीं आमचे घरीं कृष्णजन्म आहे तरी आपण येऊन जन्मकाळ करावा. असें बोलून तेथून निघून आल्यानंतर आपले शिष्यास अस्तमानीं कीर्तन करण्यास जयरामस्वामी यांस घेऊन येण्यास सांगितलें. जयरामस्वामींनीं येऊन कीर्तनास आरंभ केला. त्यावेळेस आपल्या गुरूचें चरित्र लाविलें. कीर्तनास मंडळी पुष्कळ बसली होती तितक्यांस समाधि लागून देहभान राहिलें नाहीं. श्रीकृष्ण परमात्मा पांच वर्षांची मूर्ति होऊन स्वामींचे खांद्यावर येऊन बसले होते तें अनंतदेव यांनीं पाहून शिष्यास बोलले कीं, तुम्ही स्वामींपाशीं जाऊन म्हणावें कीं, गृहस्था मला खांद्यावर घेऊन कीर्तन करूं नये. तें शिष्यास सांगतांच तो बोलला कीं, मजला कांहीं दिसत नाहीं म. जाऊन स्वामींस काय म्हणून सांगावें. मग अनंतदेव आपण जातीनें सांगण्यास निघाले. त्या वेळेस त्यांचे मनांत कीं, मजसारखा कृष्णभक्त कोणी नाहीं असा गर्व झाला. नंतर जयरामस्वामींनीं जन्मकाळाचें चरित्र लावून श्रीमथुरेंत बंदीशाळेंत देवकीपाशीं पांच वर्षांचें मूल

१२ ही छाटींत हींव ठेवण्याविषयींची गोष्ट रामदासस्वामींविषयीं ही त्यांच बखरींत लिहिलेली आहे. पृ० १०६ पहा.

होऊन भाषण करीत होते ते निरूपण लाविलें. हजारों मनुष्यें कीर्तनास बसलीं होतीं त्यांचें नेत्रास अश्रुपात होऊन कोणास देहभान राहिलें नाहीं. मग अनंतदेव यांनीं स्वामींकडे जातांना पाहिलें तों चतुर्भुज पीतांबरधारी मूर्ति स्वामींचे खांद्यावर दिसूं लागली. नंतर अनंतदेव यांनीं मनांत विचार केला कीं, हें कांहीं मूल नाहीं प्रत्यक्ष श्रीहरीचें स्वरूप आहे. असें म्हणून जयरामस्वामींपाशीं येऊन साष्टांग नमस्कार घालून विनंति केली कीं मजकडून मोठा अपराध झाला तो आपण क्षमा करावा. असें बोलून स्वामींस म्हणूं लागले कीं, आजपर्यंत आम्हीं जन्मकाळ केला. आज प्रत्यक्ष श्रीकृष्णजन्म झाला. असें म्हणून नेत्रांस अश्रुपात येऊन सद्‌गदित होऊन जयरामस्वामींस म्हणूं लागले कीं, तुमचे खांद्यावर मुरलीधराची मूर्ति दिसत आहे ती खालीं ठेवून कीर्तन करावें. मग स्वामी बोलले कीं, मूल खालीं उतरावयाचें नाहीं. असें म्हणून अनंतदेव यांस समोर बसवून जन्मकाळ करून श्रीकृष्णाची मूर्ति अनंतदेव यांचे ओट्यांत घालून एकमेकांस नमस्कार करून खालीं बसले. मग अनंतदेव यांनीं जयरामस्वामींस सांगितलें कीं, हा जन्माष्टमीचा उत्साह तुम्हीं आजपासून करीत जावा. त्या वेळेपासून परंपरेनें चालत आहे. असा चमत्कार ते समयीं झाला. तो सर्वत्रांनीं पाहिला.

नंतर जयरामस्वामी काशीमध्यें कांहीं दिवस राहून तीर्थयात्रा करीत करीत वडगांवास आले. जयरामस्वामी यांचा नित्य नेम असा होता कीं दररोज सद्‌गुरुनाथ यांची कांकडआरती प्रातःकाळीं करून नंतर स्नान करून नित्यनेम सारून स्वामींची षोडशोपचारें पूजा करून, धूप दीप नैवेद्य दाखवून, बारा घटका दिवस येई तों पर्यंत स्वामींचे चरणारविंदीं लक्ष ठेवून भजन करीत असावें व तेव्हां स्वामींची मुरलीधराची मूर्ति पूजा करावयाची होती त्या मूर्तीनें नृत्य करीत असावें.

असा क्रम चालत असतां एके दिवशीं श्रीशंकराचार्यांची स्वारी वडगांवचे कुसवाजवळ आली आणि मंडळीस विचारलें कीं या गावांत ब्राह्मणांचीं घरें किती आहेत तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं एक ग्रामजोशी यांचें घर आणि एक सत्पुरुषाचा मठ आहे असें सांगितलें. नंतर आपले शिष्यांस त्यांनीं सांगितलें कीं मजपर्यंत त्यांस घेऊन यावें. नंतर शंकराचार्य यांचे आज्ञे प्रमाणें शिष्यांनीं येऊन शोध केला कीं जयरामबावा साधु कोठें आहेत. गांवांतील मंडळींनीं सांगितलें कीं आपले गुरूचे समाधीपाशीं भजन करीत आहेत. मग त्या समाधीपाशीं येऊन पोहोंचले तों भजनाचा समारंभ मोठा चालला आहे आणि आपलेकडे कोणी पाहात नाहीं. असें पाहून

तेथें क्षणभर उभे राहून आपले स्वामींपाशीं येऊन त्यांनीं सांगितलें कीं ते कांहीं न बोलतां भजन करीत आहेत. मग शंकराचार्य स्वामी यांनीं आपले शिष्य चार असामी बोलावून त्यांस सांगितलें कीं आपण जयराम यास जाऊन सांगावें कीं आपले गांवापाशा शंकराचार्य आले आहेत ते जगद्‌-गुरु व तुमचे गुरु आहेत. त्यांचा सत्कार न करितां उगीच ढोंग माजवून समाधीपुढें कीर्तन करितां, तुम्हांस कांहीं समजत नाहीं, तर आपण येऊन आचार्य यांची पूजा करावी नाहीं तर तुम्हांस दंड पडेल. असें जाऊन जयराम गोसावी यांस सांगणें. मग ते शिष्य चार असामी समाधीपाशीं आले तों कीर्तन होऊन सद्‌गुरुनाथ यांची आरती होऊन जयरामस्वामी बसले आहेत. शंकराचार्य यांचे ब्राह्मण येऊन पोहोंचले तेव्हां जयरामस्वामी यांनीं त्यांस पाहून यांचे पायांवर मस्तक ठेविलें आणि आपले जवळ बसविलें आणि त्यांस विचारिलें कीं आपण कोठील ! कोण ! ते म्हणाले कीं श्रीशंकराचार्य येथें आले आहेत ते जगद्‌गुरु व तुमचे ही गुरु आहेत. त्यांचा सत्कार न करितां उगीच ढोंग माजवन समाधीपुढें कीर्तन करितां असें म्हणून जयरामस्वामींचे गुरूची व त्यांची त्यांनीं निंदा केली. तें स्वामींनीं ऐकून ब्राह्मणांस म्हणूं लागले कीं शंकराचार्यांचे आम्हीं काय घेतलें आहे ? आह्मावर दंड कशाबद्दल बसवितात हें कारण आम्हांस सांगावें. मग ते ब्राह्मण स्वामींस म्हणूं लागले कीं आमचे शंकराचार्य यांचें शिखासूत्र व यज्ञोपवीत तुमचे जवळ आहे तें द्यावें म्हणजे आम्हीं जातों. मग स्वामींनीं आपले गळ्यांतील यज्ञोपवीत व शिखा उपटून त्यांच्या पुढें ठेविली आणि आपले गुरूची निंदा केली म्हणून त्यांजबरोबर अगदींच कांहीं पुनः भाषण केलें नाहीं. मग ते चौवे ब्राह्मण यांनीं तें यज्ञोपवीत व शिखा घेऊन श्रीशंकराचार्य यांजपाशीं येऊन तेथील सर्व वर्तमान निवेदन केलें. मग श्रीशंकराचार्य कांहीं एक विचार न करितां संपूर्ण मंडळीसह नदीवर स्नानास उतरले. सर्वत्र मंडळी स्नानास जातांना एकमेकांस म्हणूं लागले कीं जयराम गोसावी हा भ्रष्ट झाला. त्यास कोणीं पंक्तीस घेऊं नये. अशीं पत्रें चोहोंकडे पाठवावीं. असें म्हणत म्हणत कृष्णास्नान करून वरती निघून शेंडी झाडावयास लागले तों सर्वत्रांस शेंड्या नाहींत व यज्ञोपवीतेंही गळ्यांत नाहींत असें झालें तेव्हां ते एकमेकांकडे पाहूं लागले. तों सर्व संन्याशासारखे दिसूं लागले आणि म्हणूं लागले कीं यज्ञोपवीतें दुसरीं मिळतील परंतु शेंडी दुसरी कोठून आणावी. असा विचार करून श्रीशंकराचार्य यांजपाशीं येऊन सर्व मजकूर झाला तो निवेदन केला व हात जोडून उभे राहिले तेव्हां शंकराचार्य म्हणूं लागले कीं एकाएकीं च सर्वांच्या शिखा व यज्ञोपवितें

कशानें गेलीं. मोठें आश्चर्य झालें. असें म्हणून मनामध्यें विचार करून [ जयरामस्वामींचे ] गुरूचें ध्यान करून गुरूस वर्तमान सांगितलें तेव्हां त्यांचे गुरु [ शंकराचार्यांचे ] समाधींत येऊन सांगूं लागले कीं जयराम गोसावी वडगांवकर यांचा व त्यांचे गुरूचा छळ केला म्हणून तुमच्या सर्वत्र मंडळीची अशी दशा झाली. परंतु वडगांवास परत जाऊन त्यांचे चरणावर मस्तक ठेवून त्यांस नानाप्रकारें विनवून त्यांचे मस्तकावर शिखेचा मंत्र स्थापून यज्ञोपवीत आपले हातून त्यांचे गळ्यांत घालावें. मग जयरामस्वामी तुह्मांस सांगतील तसें तुम्हीं करावें. हें तुम्हीं कराल तर तुमचे मंडळीस शेंड्या व जानवीं मिळतील. असें शंकराचार्य यांचे समाधींत सांगून आपण अंतर्धान पावले. मग आचार्य नेत्र उघडून सर्वत्र मंडळीस म्हणूं लागले कीं आज तुमच्या हातून अपराध मोठा झाला. आतां तुम्हीं आम्हीं वडगांवास माघारे जाऊं चला. असें म्हणून सर्वत्र मंडळी बरोबर घेऊन वडगांवास आले आणि जयरामस्वामींस साष्टांग नमस्कार घालून बळकट पाय धरिले. हें स्वामींनीं पाहून आपण शंकराचार्य यांचे पायांवर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार घालून जगद्गुरु शंकराचार्य यांस म्हणूं लागले कीं तुमचा सर्वस्वी मी अपराधी आणि तुमची पदवी मोठी असतां मजला नमस्कार करितां ही गोष्ट चांगली नाहीं. नमस्कार करण्याचें कारण काय हें मजला सविस्तर कळवावें. मग आचार्य यांनीं सांगितलें कीं आम्हीं आपले येथें येऊन श्रीकृष्णाप्पास्वामी तुमचे गुरु यांचा व तुमचा छळ केला त्या योगानें शेंड्या व जानवीं नाहींशीं झालीं म्हणून आम्हीं सर्व मिळून आपलेपाशीं आलों. असें सांगून शिखेचा मंत्र व यज्ञोपविताचा मंत्र म्हणून श्रीशंकराचार्यांनीं आपले हातानें यज्ञोपवीत स्वामींचे गळ्यांत घातलें. मग स्वामींनीं सर्व ब्राह्मणमंडळी पाहून त्यांस सांगितलें कीं तुम्हीं आमच्या गुरूची निंदा केली याजमुळें तुम्हीं सर्व मंडळींनीं गुरूच्या चरणाचें पावन तीर्थ आहे त्यामध्यें स्नान करून यावें म्हणजे गुरुनिंदेपासून मुक्त व्हाल आणि तुमचे तुम्हांस जिन्नस मिळतील. मग सर्वत्रांनीं पावन तीर्थांत जाऊन स्नान केलें आणि बाहेर निघाले तों ज्यांच्या त्यांस शेंड्या व यज्ञोपवीतें प्राप्त झालीं हें सर्वत्र ब्राह्मण मंडळींनीं पाहून जयरामस्वामींस साष्टांग नमस्कार घालून श्रीकृष्णाप्पास्वामी यांचे समाधीस नमस्कार करून म्हणूं लागले कीं जयरामस्वामी हे ईश्वराचे अवतार आहेत. मग शंकराचार्य यांस जयरामस्वामींनीं चार दिवस ठेवून घेतलें. दररोज भोजन झाल्यावर स्वामींनीं कीर्तन करावें. तें आचार्य यांनीं व सर्वत्र मंडळींनीं ऐकून फार आनंद होत असावा. अपरोक्ष अनुभवाचा ग्रंथ स्वामींनीं केला त्याजवर आचार्य यांनीं टीका केली,

श्वानातें नृप वारितो निजमुखें बोलों नको पामरा ।
शीवाजी नृपनायकासि नयनें वीलोकिजे रे बरा ॥
वेगीं रक्षुनि प्राण जाग अपुला ऊठोनि जा येक्षणीं ।
मी देतों जिवदान तू हिनमती मी एक चिंतामणी ॥ ५ ॥

या गोष्टी महाराजांच्या खानानें ऐकून, परम क्रोधायमान होऊन, मित्रभाव टाकून, अद्वातद्वा मनस्वी खावंदगिरी[६८] पेशानें बोलों लागला. यद्यपि सदर्नें[६९] पाहतां येणेंप्रमाणें. यदर्थीं श्लोकः—

शीवा तूं बरजोर क्यौं कर हुवा मै अफ्जला देखयो ।
चलना ईस घडी हुकूम तुजकू है पैरवी रे कियो ॥
मेरी बात सुनो मजाख न कियो जाने बचेगी शिवा ।
पाच्छाहा इतराजिमों मत अयो कीयो बडे की दुवा ॥ १ ॥
शीवा तूं बदमस्त क्यौं कर हुवा तूरा लगाया बडा ।
हाता ले तरवार अफ्जल अया शताब होना खडा ॥
कुणबी होकर तूं मजाख समजूं है बात जानो बुरी ।
चलना ईस घडी डरो मत शिवा कोई न बाजा पुरी ॥ २ ॥
पाच्छाही सब छीन लेकर शिवा बेमान क्यौं रे हुवा ।
दर्या अफ्जल [वो] बडा वजिरमों किस्सान ते रे कुवा ॥
पकडो हिम्मत जांदगी इस घडी मैं जोरसे रे अया ।
कीयो रोषन पैरवी अखनसो यहू सून मेरा कहा ॥ ३ ॥
शीवाकू बरजोर माकुल नही गाफील क्यौं रे हुवा ।
दिखियो अफ्जलका दिदार अखर जानिसे ते रे मुवा ॥
जादा हेतुलबात रोष किय येही बात क्यौं रे करी ।
पाच्छासे बडि जादगीच करिया किस्सान ते रे बुरी ॥ ४ ॥
ऐरे अफ्जल बाग हो कर अया देखो शिवा येह वडी ।
अब तेरे सपडा मजाख न चले कैदेंत होरे दडी ॥
नख्रा ते सब छोड दे मज कियो जाने बचेगी शिवा ।
पाच्छाके दरबंदगीस चलना देखो अछी रे हवा ॥ ५ ॥

ऐसें अफजलखान बोललिया उपरि बहुत क्रोध तवकें खानास महाराजांनीं उत्तर फिरोन दिधलें. यदर्थीं श्लोकः—

मदें उन्मत होउनी मुढमती अफ्जल्ल बोले कसा ।

६८. खावंदगिरी-धनीपणा. पेशानें=नात्यानें.

६९. ह्या शब्दांचा संबंध कळत नाहीं.

जातीचा हिन येवनासि नकळे सिंहापुढें हा ससा ॥
आला काळ समीप जाण घटिका पूर्णत्वता पावली ।
श्रीअंबे प्रति गोंधळासि बकरा दाणी असे दीधली ॥ १ ॥
देखोनी शिवभूपतीस जळला सक्रोध तो अंतरीं ।
घ्यावा प्राण असेचि जाण गमलें आनिष्टता वीवरी ॥
भ्रांतीचें पटलें कसा यवन तो उन्मादता पावला ।
तेंव्हां त्या नरनायकें मुढमती पापिष्ट वीलोकिला ॥ २ ॥
अफ्जल्ला शिवभूपती निजकरें मृत्युप्रती देतसे ।
श्रीअंबा नर नायकासि सदयें येशासि अर्पीतसे ॥
आयुष्यावधि पूर्णताचि भरली अन्यत्र नाहीं कदा ।
महिषासूररूपें असे यवन हा दंडीन या दुर्मदा ॥ ३ ॥
आला अफ्जल बेनवा मुढमती भेटावयातें नृपा ।
शीवाजी सरजा हटेल न ढळे आहे हराची कृपा ॥
देखोनी सदरा अवेश न धरे त्या येवनातें मनीं ।
बोले उन्मत होउनी निजमुखें जाणा अमित्रा खुनी ॥ ४ ॥
कारे बोलसि वाजटा धिटपणें लज्जा न वाटे तुला ।
आतां मी निकरें चि मारिन रणीं हा निश्चयो कल्पिला ॥
केवीं काय तुझाच मर्कट जसें चेष्टा करी आगळी ।
शीवाजी सरजा समर्थ अवनी या भोंसल्याचे कुळीं ॥ ५ ॥
ऐकें रे मतिमंदटा बरळसी सर्जा शिवाजी पुढां ।
सिंहा सन्मुख नाण काय करिसी तूं अफ्जला रे मुढा ॥
हस्तीं हे तुळजा फिरंग चमके घेईल प्राणा झणी ।
नाहीं सोडविता [ तुला ] मज दिसे प्रत्यक्ष तो रे रणीं ॥ ६ ॥
वीजापूरहि बेदरादिक झणी मी जिंकितों येकदां ।
तानाशा सुलतान मारिन करीं अन्यत्र नाहीं कदा ॥
दिल्ली आदि करूनियांच अवघे त्या पादशां दंडितों ।
हंमाऊ बलखासि घेइन बळें कीर्तीस विस्तारितों ॥ ७ ॥
तेथें अफ्जल [ तूं ] किसानें मजला दृष्टी पुढें दीसतें ।
आतां जासिल केउता परतुनी दंडीन आतां तुतें ॥
येईरे शरणागतासि चपळें कां प्राण देसी मुढा ।

७०. केवा–पाड, महत्व.

७१. किसान=कुळंबट, कुचकामाचा माणूस.

शीवाजी सरजा समर्थ अवनीं तूं तृण माझे पुढां ॥ ८ ॥
तूझी माय भटारणी स्मर मनीं या रे क्षणीं पामरा ।
नाहीं अक्कल अल्पही मुढमती त्वां भक्षिलीरे सुरा ॥
शीवाजी सरजा समर्थ भुतळीं वीलोकुनी पाहिजे ॥
जातीचे हिंन येवना अझुनिरे प्राणासि संरक्षिजे ॥ ९ ॥
तूतें मारुनि येथ रक्त टिकला लावीन भाळीं अतां ।
श्री अंबा वरदें प्रताप मजला नाहींच अन्यत्रता ॥
अफ्जल्ला करुणा तुझीच ह्रदयीं आमोघता पातली ।
माझे रे भुवनासि येउनि गती कांरे असी लाविली ॥ १० ॥
वीजापूरपती रडेल ह्रदयीं ऐकूनि तुझ्या वृता ।
ऐसें हे न करीं कदां मुढमती नाहीं मती योग्यता ॥
तुळजा हस्तकिंची फिरंग चमके आतूरता अंतरीं ।
अफ्जल्ला रुधिरांधके प्रिय असे तें प्राशना सत्वरी ॥ ११ ॥
भटारीच्या पोरा परम कपटीया मुढमती ।
शिवाजी सर्जाची तुजसि नकळे आझुनि गती ॥
नको देऊं प्राणा त्वरित फिर मार्गेच सदना ।
न ठाकेरे माझे क्षणभरि [ हि तूं ] जाण कदना ॥ १२ ॥

ऐसे शिवभूपती वदतांच अफजल परम क्रोधित जहाला आणि खानाची नजर बावरी पाहिली तेव्हां दत्ताजीपंतानीं खानाजवळ जाऊन कानीं अर्ज केला जे, तुम्ही परसदनास येऊन अविचारपणें बोलतां हेच प्रतिबंधकता कांहीं जय पावत नाहीं. राजियाचे कावेशींत आलां हा शब्द कांहीं आम्हांवर नाहीं येविशीं बहुतां प्रकारें तुम्हांस सांगितलें असतां तुम्ही आपला स्वभाव गुण टाकीत नाहीं. सावध होऊन पहाणें. तुम्ही व दोघेही खिजमतगार इतक्यानिशीं मरणाच्या गृहास आलां असोन बोलीप्रमाणें संपादावें तो अर्थ न करितां निंद्य गोष्टी आरंभिल्या. शिवाजी तुमची पर्वा धरीत नाहीं. दिल्लीपति औरंगजेबास ठायीं ठेवावें ही नजर शिवाजीची, तेथें विजापूरची कथा ती काय ! या सर्व गोष्टी चित्तांत यासमयीं ठेवून, परस्परें भेटी घेऊन, सारांश महाराजांचें [ सख्य ] संपादावें यांतच स्वहित आहे. तुम्ही तो सर्व गोष्टींनें माकुल, अज्ञानपणें केलियास सध्यां प्राणानिशीं मुकतां यासि संदेह नाहीं. आम्ही जो करार केला तो एकीकडे ठेविला. याजउपरि या गोष्टीचा मजवर शब्द अणुमात्र नाहीं." ऐसें दत्ताजीपंतांनीं निषेध करून खानास चार अर्थ उगवोन सांगित-

७२. माकुल–उचित.

ले. परंतु ध्यानावर खान येत नाहीं. पुढील भविष्य दत्ताजीपंतांनीं चित्तांत आणून खानापासून दहा हातांचे तफावतीनें जाऊन बैसले. तेसमयीं खानास आवेश न धरितां, पुढील मरण चित्तांत न आणितां, खान महाराजाचे भेटीस म्हणोन एकाएकींच उठले. नंतर महाराजांहीं सावधचित्तें उठोन उभे राहिले. खान सरसावोन पुढें आला. यदर्थीं श्लोकः—

क्रोधें शीवनृपावरीच उठला अफ्जल्ल पापी कसा ।
वेष्टूनी उदरांत खंजिर बळें तो मारिला हो घुसा ॥
पोटीं ते अडकाउनीच करिंचा खंजीर लागू नसे ।
शिव सर्जा लघु लाघवी निजबळें कौतूक केलें कसें ॥ १ ॥
डावे हस्तकिंचे चपेट धरणीं पै वाघ्रखें मारिलीं ।
खानाचे हृदयीं प्रवेश करितां आंतें भुई पाडिलीं ॥
तेव्हां विव्हळ होउनी कुमति तो वेडावला अंतरीं ।
शिव सर्जा उडि मारुनी सरकला रोखून पाहे अरी ॥ २ ॥

शिवाजीमहाराज. * * अफजलखान.

आंतें सावरुनी करेंच उदरीं त्या अफ्जलें घातली ।
मूर्छा येउनि चाचरी मुढमती ऐशी दशा लाधली ॥
तुळजा आड करूनियां शिवनृपें तत्काळ सांभाळिला ।
पट्टे घेउनियां सकोप न धरे ऊठोनियां धांवला ॥ ३ ॥
अफ्जल्लें उदरासि देउनि करा सक्रोधता नावरे ।
पट्याची सिग मारिली निजबळें त्या कूमती निष्ठुरें ॥
भूपें मारुनियां उडी चुकविली ते अल्प लागू नसे ।
जीरे टोप विदारुनी जवभरी जाण क्षतू तें दिसे ॥ ४ ॥

वाघ्रखांनीं खानाचें उदर विदारिलें व बिचव्याचा वार चालविला तेणेंकरून मूर्छा येऊन निचेष्टित भूमीवरी पडला. नंतर सावध होऊन सदरेचे चउत्रेवरून उडी टाकून परम भयानें निघाला. शितौबी[७३] करून चालिला. बाहेर पडतांच खानांनीं मोठ्यानें गलवला केला जे, शिवाजीनें मला मारिलें. दगा जहाला. लौकर धांवा. ऐसें बोलतांच भोयांनीं तत्क्षणीं पालखी आणोन त्यांत घालोन जलद निघाले. हें महाराजांनीं पाहून संभाजी कावजी महालदार यांस आज्ञा केली जे शिताबी करून खानाचें शिर कापून आणणें. ऐसा हुकूम होतांच त्यांणीं भोयांचे पाय मारून पालखी भूमीस पाडिली आणि शिर

* येथें चित्रे काढण्याकरितां मूळांत जागा टाकिली आहे.

७३. शिताबी=त्वरा.

कापून घेऊन महाराजांकडे आला. इतक्यांत सैदबेग खानाकडील यांणीं जलदी करून एकाएकीं महाराजांजवळ जाऊन पट्टेचा वार चालविला. तेसमयीं महाराजांनीं जलदी करून जिवा महाली याजवळील हुदेतील पट्टा घेऊन बिचवा डावे हातीं धरून ठाणमाण मांडून लघुलाघवी संधान प्रवर्तोन सरसावला. जोजणी परजणी घाव डाव उ डी ल प णी झ प ण नजरबाजी रोखानें सैदबेग याचे पट्टेचा वार पट्टेवर व बिचवेवर टाळिले. पांचवे वारानें महाराजांस सैद यांणीं मारावें तों इतक्यांत जिवा महाली याणें फिरंगीनें खांदेवर वार केला तो पट्टियाचा हात महाराजांस लागू व्हावा तो तोडला. तेणें सैद जेर जहाला.

तदुत्तर खानाचें शिर घेऊन महाराज व महाली व महालदार सहित किल्लेवर गेले आणि तोफेचे आवाज जहाले. ते होतांच गडाखालील लोक व घांटावरील लष्कर कोंकणांतून पेशवे व मावळे लोक चहूंतर्फा खानाचे गोटावर चालोन आले. खानाचें लष्कर खानास मारलेंची खबर ऐकून आवसानें गेलीं आणि घाबरें होऊन महासंकटीं पडले, इतकेंत महाराजांची आलेली फौज मारीत चालली. परम तुंबळ युद्ध जहालें. दोन प्रहर घोरंदर मांडिलें. खानाकडील थोर थोर वजीर कराराचे समशेर बहादर [७४]कदीम जुने पठाण रोहिले हबसी मुसलमान व जातिवंत मराठे नामांकित धनगर ब्राह्मण व तसेच तो ब ची ब हि ले व कर्नाटकी [७५]काटक बंदुखी व अ डा व, इटेकरी व बाणेकरी व सांगा बर्चीवाले [७६]माडू गुरगुज, फिरंगा, कातिया, तोमर, गुरदेवाले व जु ने वा र हे ले गा ठे क र तिरंताज जेजाला व तोफा व बाण आदिकरून एक रंजक. [७७]होडीनें युद्ध जहालें तें भारत-समान. महाराजांचे फौजेनें व पायींचे मावळे लोक यांणीं व बाजे लोकांनीं पायउतारा होऊन मारामारी केली. खानाचे लोक तोडले ते जागजागां ठार झाले. कित्येक भारी जखमा लागून निचेष्टित पडले. तैसेंच मदोन्मत्त परम झुंझार हस्ती बुकणे व पलखदंती व छावे चालोन आले. महातांनीं मागांपुढां न पहातां शर्त केली. हत्तींस जखमा लागोन जर्जर जहाले. महात हत्तींवरून ठार होऊन पडले. त्याजमुळें हत्तींच्या शुंडा व पुच्छें तोडलीं व डोळे फोडिले. अर्बुज मावळे लोक, हस्ती कार्याचे हस्तगत झाले असतां अविचारपणें जायां केले. तैसेंच घोडे मातबर हबशी, विलायती, देसुरे, आरबी रणास आले. तैसे बिर्दाईत लोक पठाण, मोंगल, रांगडे, रजपूत, ब्राह्मण व मराठे, धनगर स र दा ज

७४. कदीम=पुरातन.

७५. काटक क्रूर आणि रक्तपात करण्यास उत्सुक असे एका जातीचे कर्नाटकांतील लोक.

७६. माडू-हरणाच्या शिंगास पोलादी टोपणें लाऊन दोन शिंगें एकत्र जुळून केलेलें शस्त्र.

७७ होड=पण, प्रतिज्ञा.

लोक ईर्षा धरून झुंजतां ठार पडले व कांहीं जखमी जहाले. एकाचे हात तुटले, एकाचे पाय शस्त्रें करून उडाले, एक रंवदळीनें तुडविले, एक कर्ण-नासिक-हीन जहाले, एकाचीं उदरें शस्त्रेंकरून विदारिलीं. अद्भुत युद्ध जहालें. दे धरणी ठाव हे गति लोकांस घडोन आली. शत्रूचा पराजय समरीं होऊन रक्ताचे लोट रणभूमीस चालले. क्षतेंकरून वीर बंबाळ जहाले. धरा वीररक्तकुंकुमें विराजली. हा प्रकार घडोन आला. हें युद्ध कांहीं सामान्य म्हणावें असें नाहीं. महाराजांकडील लोकांनीं सीमाच केली. अफजलावर श्रीईश्वराचा क्षोभ जहाला. प्राणास मुकला. लष्कर अगदीं बिघडविलें. अमीर व मातवर लोक ठार पडले. मोठा हाहाकार जहाला. महाराजांनीं या कलियुगीं धर्मसंरक्षणानिमित्य श्री-विष्णूचा मानवी रूपें अवतार ही प्रमाणताच होऊन खानास कांहींच उमज न पडतां अविचारपणें सर्वस्वास मुकला. होणार तेंही प्रारब्धानुरूप घडोन येतें. लष्करची वाताहत जहाली. उरले वजीर पाँडाव केले. जिते धरून आणिले. या विरहित साधन संपदा सांपडली बितपशील:— हत्ती सुमार १५० दीडशें व घोडे सुमार ७००० सात हजार, उंट सुमारें ४०० व नक्त होन सुमारें सत्तर लक्ष पाडाव केले. या खेरीज जड जवाहीर हिरे, पाच, माणीक, मोतीं व कापड हर जिनसी साथें सकलाद व किनखाप बुट्टेदार व भरजरी बादली व कळसपाकी व मखमाली तागे व डेरे राहुट्या व पालें व जनावरें व तोफखाना ऐसें बेमुबलक पाडाव जहाले. राहिले लोकांनीं शरण येऊन दांतीं तृणें धरून काकुळती प्राणासाठीं आले, ते सोडून दिले. याशिवाय बायका व ब्राह्मण वैदिक मुलेंबाळें मुक्त करून सोडिलीं. महाराज पुण्यश्लोकी, धर्मात्मा, करुणासागर, दयावंत, शरणागत आलिया सहसा मारीत नाहीं. याजकरितां शत्रूकडील लोकांस धर्मवाट दिधली. महाराजांनीं पुण्याच्या कोटि जोडिल्या. जगीं कीर्तिध्वजा अचळासारिखी लाविली. तदनंतर खानाचा पुत्र फाजील भयाभीत होऊन पायीं चिंध्या बांधून, जीवित्वाकरितां निबिड झाडींत लोकसह पळालें. कठिण प्रसंग प्राप्त जहाला. कित्येक नागवे उघडे जखमी तकवा-रहित होऊन पडले. अन्न-उदक-रहित रणीं हुंबूं लागले. धे धे मार मार हेंच आरोळी. धरा कंपायमान जहाली. जखमी जीवित्वाची आशा धरून नागवे उघडे पळून गेले. यदर्थीं श्लोक:——

भुतांचे गणू जेंवि नग्न स्मशानीं ।
तसे नागवे वीर अफ्जलखानी ॥

---

७८. पाडाव करणें=जीवंत धरणें.

७९. फजलखान यास कांकडे याणें धरून छपवून ठेविलें होतें.

नसे अन्नपाणी क्षुधाक्रांत रानीं ।
वजीरासि केली शिवें मेजवानी ॥ १ ॥

ऐशी फत्ते करून महाराज विजयी जहाले. प्रताप दैदीप्यमान अष्ट दिशांचे ठायीं भरून उरला. महाराजांनीं या कलियुगाचे ठायीं निस्सीमता केली. क्षात्रधर्माविषयीं सत्कीर्ति संपादून, अफजलाचा वध करून, अरिजनरक्तोदकाचा भाळीं टिळा लावून, खानाचें शिरकमल घेऊन, परमआनंदोन्मत्त मानस हृदयपंकज सुपुष्पित करून, श्री अंबेचें दर्शन घेऊन, शिर नजर केलें. आणि करद्वय जोडून प्रार्थना आरंभिली. श्लोकः—

श्रीअंबे कुलदेवते विनवितों जोडूनि हस्तद्वया ।
शीवाजी सरजावरी निशिदिनीं आमोघ कीजे दया ॥
अफ्जल्ला जननी तुझेचि वरदें निर्नाम केला रणीं ।
दासाचा अभिमान पूर्ण धरणें तूं श्रेष्ठ चिंतामणी ॥ १ ॥
विजयातें वरिलें कृपा करुनियां श्री अंबिके संकटीं ।
म्हैसा अफ्जल दंडुनी निजकरें आलों तुझे नीकटीं ॥
शस्त्राची दिपिका धरूनि समरीं लोलो करूं कौतुकें ।
केला गोंधळ साजिराच जननी हें येश आलें निकें ॥ २ ॥
श्री-अंबा वरदें नृसिंह समरीं मी दास होऊनियां ।
अफ्जल् दंडुनियां अरीच निकरें संपादिलें या जया ॥
शीवाजी नरनायकासि जननी संरक्षणें संकटीं ।
दासाचा अभिमान पूर्ण धरणें आहे तुझे नीकटीं ॥ ३ ॥

श्री अंबादर्शन घेतल्यानंतर श्रीमन्महाराज सकल सौभाग्यादिसंपन्न मातुश्री जिजाऊ साहेबांचें दर्शन

श्रीचीमूर्ति[८०] महाराजें मातुश्री.[८०]

[८१]मारिला व श्रीअंबेनें सकोप हृदयीं धरून म्हैसासुर कोलासूर रक्तबीज यांचें हनन केलें, किंवा श्रीमहाविष्णूनें शुंभनिशुंभ नखाग्रें वधिला,[८२] व श्रीवामन वेश धरून बळीदैत्य पाताळीं घातला व हिरण्याक्ष हिरण्यकश्यप या कारणें नारसिंहरूप परम क्रूर धरून जानुजंघांवरि घेऊन विदारिला, तद्वत् महाराजांनीं सकोप मर्दुमी करून अफजलखान स्वहस्तें निवटिला. तदनंतर अर्जुन स्वर्गभुवनास जाऊन श्रीसुरादि इंद्रास अजिक्य निवातकवच असुर निवटिला व भारतयुद्धीं

८०. येथेंही चित्रें काढण्याचा पुस्तक लिहिणाराचा हेतु दिसतो.

८१. चित्रांची जागा व “मारिला” हा शब्द यांजमध्यें बरीच जागा मजकूर लिहिण्यासाठीं कोरी टाकिली आहे. पण तो लिहिण्याचा तसाच राहिल्यामुळें कथाभाग जरा त्रुटित झाला आहे.

८२. शुंभनिशुंभांस तर देवीनें मारिलें.

कर्ण वधिला व भीमसेनें कीचक महादारुण हस्त-चडकणेनीं मारिला व जरासंध समस्तांस अजिंक्य बळिया गाढा भीमहस्तें निधन पावला व गांगेय शिखंडीनें निवटिला, तद्वत् महाराजांनीं परमदारुण बलोन्मत्त या कलियुगीं अफजल पादशाही वजीर समरंगणीं स्वकरें वधिला. शहाजी-तनय शिवाजी महाराज यांणीं निस्सीमता करून अरीस निवटिलें. महाराज नरशार्दूळ, निराश्रितां महदाश्रय, कलियुगीं दुसरी साम्यता महाराजांस द्यावयासि नाहीं. यदर्थी अन्युक्ति[८३] वचन.

गगनं गगनाकारं सागरे सागरोपमा ।

महाराज भूभारहरणास श्री ईश्वरें अवतार धरिला. ना विष्णुः पृथ्वी पतिः । हें महापद महाराजांनीं संपादिलें. संपूर्ण राजांचे राजे शिवनरेंद्रछत्रपति नरचूडामणि दयावंत. जे जे युद्धास प्रवर्तले ते ते धर्मयुद्धेंकडून दंडिले, आणि जे जे शरणागत आले ते कृपाळू होऊन जीवन्मुक्त करून संरक्षिले.

तदनंतर महाराज गडीं[८४] खालीं उतरोन सर्वांस दिलदिलासा[८५] होऊन समाधानें केलीं. लढाईत जे मृत्यु पावले त्याचीं वतनें त्यांचे पुत्रांस वंशपरंपरेनें चालविलीं. ज्यांस पुत्र नाहीं त्यांच्या बायकांस निमे वतनें चालविलीं. जे जे जखमी जहाले त्यांस बेगमीस दोनशें, शंभर, पाऊणशें, पन्नास होन जखमा पाहून दिले. मातबरांस घोडीं दिलीं. सुवर्णाचीं हस्तकडीं व कंठमाळा व शिरपेंच व मोतियांचे तुरे व कलगिया व अंगठ्या, मोहनमाळा, मुक्तफळांचे चौकडे व जडित कटदोरे व कांहीं सुवर्णाचे साधे व हस्ततोडे ऐसे अलंकार बक्षीस दिधले. या विरहित वस्त्रें भरजरी बादली व मंदील व झगे, इजारा, चादरा, तिवटें[८६] व शेले, पटके, शाला पंचरंगी, सखलादी; ताडपदरी पासोड्या, दुपेटे हरजातीचें कापड सर्वांस माणूस पाहून महाराजांनीं दिधलें. संपूर्ण लोक चाकरीचे नांवाजले. तारीफ मर्दुमीची बहुतां रीती केली. महाराजांचे अभय अमृतोत्तमवचनें परम समाधान आपलाले जागां पावले.

तदनंतर खानाकडील लोक मातबर वजीर उमराव *बाजे लोक पाडाव जहाले त्यांस महाराजांनीं समक्ष बोलावून आणून, धर्मन्याय चित्तांत आणून, यथाशास्त्र त्यांस वस्त्रेंभूषणें घोडे देऊन गौरव करून आपलाले स्वस्थळास विजापुरास जावयासि महाराजांनीं आज्ञा दिधली.

---

८३. अन्युक्त–अन्योक्ति, अलंकार.

८४. "राजगडाखालीं" असें मूळांत आहे पण तें चुकीचें—कारण, प्रतापगडीं असतां अफजलखानाचा वध झाला असें मागें लिहिलें आहेच.

८५. दिल-दिलासा=चित्तास आश्वासन.

८६. तिवट=पागोटें.

* बाजे=इतर.

तदनंतर महाराजांनीं फत्ते केलियाची खुशाली केली. हत्तीवरून शर्करा सर्वांस वांटली. वाजंत्रें व तुतारे म हा ळा व नगारे मृदंग घंटा शंखनादाची गर्जना जहाली. समस्तांस परमानंद होऊन महाराजांस सेवक लोकांनीं व समस्त महाराजांनीं नजरा केल्या. घरोघरीं विजय घुड्या उभवून कर्दळीस्तंभ व कुंकुमाचे अंगणीं सडे घातले. परम उल्हास लहानापासून थोरास जहाला. समस्त ब्राह्मणांस दान दक्षणा दिधली. फकीर गोरगरीबांस खैरात केली. तदनंतर ब्राह्मणभोजनें घातलीं. कुलधर्म संपादिला. श्री तुळजापूरनिवासिनीचे पांच गोंधळ घातले. महास्थळोस्थळीं महापुरूष संन्याशी व सिद्ध साधु यांसि पूजोपचारास द्रव्य पाठविलें. व महाजागृत स्थानें श्रीशंकर श्रीविष्णुमूर्ति यांसि जे जे नवस केले होते ते अर्पण केले. तदुत्तर अफजलवधानें यश आलियानें संतोषाचें वर्तमान मातबरांस व मांडलिक राजे व संस्थानिक देशोदेशींचे देशकांस वगैरे इष्टमित्रांस व वजीर उमराव यांसि व श्रीमंत सकलतीर्थरूप राजश्री शहाजी महाराज आबासाहेबांस वर्तमानें लिहून वार्तिकासमागमें पाठविलीं. किल्लोकिल्लियांस शर्करा पाठवून तोफेची सरबत्ती केली. महाराज विजयी होऊन अफजल निर्दाळिला. अस्मानीं फत्तेची ध्वजा लागली. महाराजांनीं अंगेजांची व जातीनिशीं मर्दुमीची निहायेत केली. सर्वांजनांनीं व जनस्त्रियांनीं आशीर्वाद देऊन महाराजांस परमानंद चित्तें बोलले. समस्त ऋषिब्राह्मणांनीं व साधुजनांनीं व तपस्वी महावृद्धांनीं मस्तकें डोलवोन वेदोक्त मंत्राक्षता परम दयावंत होऊन महाराजांचे मस्तकीं अर्पिल्या. महाराजांचे धैर्याची व सु धा क र्ण धार्मिक शौर्यकर्माची अणिमा* पाहून श्री संपूर्ण तेतीस कोटी अमर व अमरनाथ अनुपदें गणगंधर्व व सिद्धचारण यक्ष किन्नर व नरनाथ व पन्नगेश्वर परम म क रीं आमोदित मानसें गुप्तरूपें प्रगटांत न आणितां महाराजांचे मस्तकीं कनकपंकजें अर्पून मस्तकें समस्तांनीं डोलविलीं. या शिवाजी महाराजांची जगीं कीर्ति यावत् शशिसूर्य तावत्काल भीमभानुतेजप्राय प्रसर जाहली.

या नंतर विजापुरास ताबडतोब शितार्बीनें जासूद व हरकारे यांणीं जाऊन युद्धाची खबर लष्कर लुटून फन्ना केलें व शिर कापून नेलें ही संपूर्ण तपशील जाहीर केली. ते वेळीं पादशाहा तख्तावरून उतरून दिलगीर होऊन महालांत जाऊन पलंगावरि निजले. बहुत खेद प्राप्त झाला. तैशीच बडे साहेबिणीस खबर कळतांच पलंगावरि बैसली होती तेथेंच परम चिंताक्रांत होऊन दुःखें करून ललाट ताडून निचेष्टित पडली. सहेल्यांनीं [illegible]तीस

८७. अंगेज=अंगेजणी-एकांगी.=अंगची हिंमत. ८८. निहायत. !

८९. सहेली=सखी.

* अणिमा ही ८ सिद्धींतील पहिली.

उभ्या होत्या त्यांणीं उठवून सावध करून उचलोन पलंगावरि बैसविली. तिणें श्वास टाकिला आणि रुदन करूं लागली. अफजलखासारखा महाराजांनीं मारून शिर कापून नेलें, लष्कर लुटून फन्ना केलें, अतःपर पादशाहीस खैंर्मा आली. असें मोठे दिलगिरीनें बोलों लागली. या इन्शा अल्ला हुतआला या खुदा या खुदा या सुबहान या सुलतान पीर पैगंबर परवार दिगार रहिमानुरहिम म्हणों लागली. सखेद चित्तें अंग पलंगावरि टाकून रडों लागली आणि बोलली कीं, खुदांनीं अदलशाही बादशाही मेहेर' करून शिवाजी राजियास दिधली आणि आमची पादशाही बुडाली. ऐशा कित्येक कल्पना करून पादशाहा व पादशाहाजादी यांनीं तीन दिवस उपोषणें केलीं. कुल् लष्कर व शहर दिलगीर जहालें. पादशाही नौबत उपडी घातली. समस्त जन बोलों लागले जे, अतःपर तमा न धरितां बेवसवसीं महाराज फौजेसह येऊन शहर मारील कीं काय ! पादशाही जबरीनें घेईल. याउपरि पादशाही यवनांची बुडाली. मराठी राज्य जहालें. ऐसें समस्त लहाना पासून थोर बोलूं लागले. पादशाहाचें मोठें अनहित जहालें.

इकडे महाराजांनीं मंचकीं निद्रा केली असतां दासाभिमानी श्रीतुळजापूरनिवासिनी जगदंबा गोदोहन समयास प्रत्यक्षता स्वतःसिद्ध स्वप्नीं येऊन महाराजांस सदय आज्ञा दिली कीं, " अफजलखान तुझा वैरी होता तो तुजपासून मारविला. तुजला प्रसन्न जहालों. तुझे भक्तीस परम लुब्ध जहालों आहें. तुझे राज्यांत वास्तव्य करून, पुढें तुझें सर्व प्रकारें कल्याण करून, तुझे हस्तें वैरियांचा पराभव करून, संपत्ति संतति सहित राज्याभिवृद्धि करणें आहे. तरि आपली स्थापना करून पूजा ऊर्ज्या यथाविधि भक्तिभावें चालविणें." हा दृष्टांत चमत्कारयुक्त जाहला. अंबेनें सांगितलें ही प्रमाणताच. श्रीवचनास अंतर करितां नये. यावरून महाराजांनीं गंडिका नदीस कारकून शहाणा मनुष्य ऐवज देऊन पाठवून दिला. त्याणें जाऊन तेथें अपूर्व शिळा विलोकन करून ती गाडियावर घालून कांहीं दिवसांनीं महाराजांजवळ आणिली. ते समयीं चतुर हुन्नरवंत पाथरूट आणोन श्रीभवानीची मूर्ति अवयव सुद्धां ध्यानस्थ यथाशास्त्र शिल्पिकें निर्मोन तयार केली. तदनंतर किल्ले प्रतापगडीं देवालय निर्मोन मुहूर्त पाहून अर्चा करून स्थापना कुलदेवतेची केली. यथाविधि होमहवन ब्राह्मणसंतर्पणें जहालीं. दानदक्षणा दिधली. तदनंतर श्रीअंबेस मन उल्हासें महाराजांनीं भूषणें रत्नखचित वस्त्रें भरजरी तगटी बादली अर्पिलीं. आणि ऊर्जे

---

१०. खामी=नुकसानी, नाश.
११. मेहेर=कृपा.
१२. बे-वसवसा=बिन् विक्षत, निःसंशय.
१३. ऊर्जा=संरक्षण.

कारणें महाल मोकाशे देऊन हवालदार मुजूमदार पेशवे कारभारी करून श्रीदेवीस नेम उत्साह चालवून दिन प्रतिदिनीं महाराज करूं लागले. नवम्‍ यात्रा सर्वदा श्री तुळजापुराप्रमाणें प्रतापगडीं येऊं लागली. तुळजापुरास जाणारास दृष्टांत, आपण प्रतापगडीं आहों तेथें जाऊन दर्शन घेणें नवस फेडणें. ऐशी अभिनव लीला नाटकरूपें श्री अंबा जनास दाखवून निगमागमाचें गोचर परम जागा स्थान जहालें. येणेंकडून महाराजांचे मनोरथ अशेष सि॰ . पावले.

यानंतर विजापूरचा मोठा वजीर अफजलखान बुडविला येणेंकरून पादशाहीवरि आफत[९४] पडली ऐसें जहालें. विजापूर पादशहाचें तमाम कोंकण सरहद्देचे किल्ले याविरहित मावळचे किल्ले होते ते संपूर्ण घेतले. पन्नास साठ गड घेऊन बळकाविले. कोंकण सारें बळकाविलें. वरघाटही घेतला. शिलेदार लष्कर सात हजार व पागा पंधराहजार एकूण पंचवीस हजार फौज तोलदार जहाली. लष्कर कुल् जमा होऊन नेताजी पालकर सरनौबत मोंगलाईंत स्वारी शिकारी करून बालेघांट व परडें व हवेली कल्याण कलबर्गे व आवसे उदागिरी गंगातीरापावेतों मुलूख मारीत चालले. खंडण्या तमाम घेतल्या. मुलूख मारीत चालले व कांहीं सरहद्देचा जप्त केला. औरंगाबादेचा पुरा मारिला. मोंगलाई फौजदार औरंगाबादेस होता तो चालून आला त्याशीं युद्ध करून जिवें मारिला. हत्ती घोडे पाडाव केले. मोंगलाईंत धुंद उठविली. ऐसा पराक्रम करीत महाराज चालिले.

जे गड घेतले त्यांचे बंदोबस्तीस कारभारी ठेवून नवी पद्धत घालून महाराजांनीं बंदोबस्त केला तो येणेंप्रमाणें:—हवलदार एक व सबनीस एक व सरनोबत एक या तिघांनीं मिळून कारभार करावा. व नख्त नाणें व गल्लेचें दास्तान वगैरा जिन्नस सरकार निसबत कारखानीस जमेवर नेमून सरकारकून ठेविला त्याचे विद्यमानें सर्व करावा. गड तोलदार आहे, तेथें तट गडचा घेरा थोर, या जाग्यास पांच चार तटसरनोबत ठेवावे. त्यांस तट गजाप्रमाणें नेमून द्यावे. हुशारी खबरदारीस यांणीं सावध असावें. गडावर लोक ठेवावे. यांस दहा लोकांस एक नाईक नऊजण पाईक. याबरहुकूम चाकरी करून रात्र दिवस सावध राहून गड रक्षावा. सदरहू लोक इटेकरी बंदुखी व पट्टेकरी तिरंताज अडाव व आडहत्यारी ऐसे माणूस मर्दानें चौकस पाहून महाराजांनीं खांसा नजरगुंजार[९५] करून ठेविले. गडावरि लोक हवलदार सरनोबत मराठा जातिवंत कुलवंत ठेवावयासि जमानें[९६] हुजरातीचे लोक असतील त्यांपैकीं घ्यावे.

९४. आफत्=संकट, अनर्थ.
९५. नजरगुजार=दृष्टिगोचर.
९६. जमान=जामीन.

सबनीस ब्राह्मण हुजरातीचा ओळखीचा ठेवावा. कारखानीस प्रभु कायस्थ ठेवावा. परम विश्वासू गड हवालदार याच्या हातीं. त्यांणीं धनियाचे पायापाशीं इमानें इतबारें वर्तावें. फितवा फांदडा करून किल्ला कोणास न द्यावा. जातीनें बंदोबस्तीनें गडकोटाचे मामलेदार केले. नवी पद्धत अष्टप्रधान यांचे संमतें घातली.

तसेंच लष्करांत पागा केली. पागेचे हुद्देदार केले. पागेचे तोलदारी खाशीं शिलेदार ठेविले. स्वतंत्र बळ कोणाचें न चालावें. पागेमध्यें घोडयास बारगीर एक, अशा पंचवीस घोडयांस एक मराठा धारकरी हवलदार केला. पांच हवालियांचा एक जुमला केला व नांव जुमलेदार ठेविलें. ऐसे पांच जुमलेदार म्हणजे एक सुभा. त्यास पांचशें होन तैनात, पालखी एक, यास जुमलाजमादार एक. त्यास शंभर सवाशें होन तैनात. पंचवीस घोडयांस एक पखाली एक नाळबंद. दहा जुमले म्हणजे एक हजारी. त्यास हजार होन तैनात, मुजुमदार एक, व मराठा कारभारी जमनीस कायस्थ प्रभु त्यास पांचशें होन. तैनातीप्रमाणें असामीस पालखी द्यावी. आली जमा राखून जाहला खर्च चौघांचे विद्यमानें ठरावा. तदनंतर पंचवीस हजारी यास दोन हजार होन तैनात, तसेंच मुजुमदार, कारभारी, जमनीस, करावे. ऐसा पांच हजारी यांचा सजा व पंचवीस हजारी सरनोबताच्या हुकुमांत असावे. ये जातीचा पागेचा मामला.

तसेंच शिलेदाराचे सुभे वेगळाले. तेही सरनोबताचे आज्ञेंत. पागा व शिलेदार मिळोन सरनोबत याचे हुकुमांत वर्तावें. हजारी पंचहजारी सरनोबत यांजवळ वाकनिशीचा कारकून व हरकारे व जासूद ठेवावे. सरनोबताजवळ बाहिरजी नाईक म्हणोन बहुत शहाणा धूर्त, अक्कलवंत, सारे जासुदांचा नाईक केला. तो बहुत हुशार चौकस ठेविला. लष्कर पावसाळे दिवसांत छावणीस आपले कैंबजी देशांत यावें. आलियानंतर त्यास दाणा रतीब ऐसा दर घोडयास व वैरण व लोकांस घरें सिद्ध करून ठेविलीं असावीं. दसरा होतांच छावणीहून लष्कर कूच होऊन जावें. जाते समयीं कुलें लष्करचे लहान थोर लोकांचे बिशांदीचे जाबिते करावे तदनंतर धावणीस जावें. आठ महिने लष्करानें परमुलुखांत पोट भरावें, खंडण्या घ्याव्या. लष्कराबराबर बायका व कलावंत अगर बटकीवसव्या, बेलकरणी, डोंबारणी व परद्वारी, चितारणी व

९७. कबजी=बाबेतील,
९८. कुल=सर्व.
९९. बिशाद=जिनगी, मालमिळकत.
१००. जाबता=यादी.

कंजारणी¹ लष्करांत नसाव्या. जे बेनवा फंदी वागतील त्यांचें पारिपत्य करावें. व परमुलुखांत माणूस बायका अगर मुलें यांचा अणुमात्र बंद² न धरावा. जो बंद मस्तखोर धरील त्याची तत्काळ गर्दन मारावी. बैल बळकट पाहून निभावणीचीं ओझीं त्यांस द्यावीं. याप्रमाणें ताकीद सर्वत्रांस करून सरनोबतास करावी. ब्राह्मणास उपद्रव न करावा. खंडणी केलिया पैसा बोलीप्रमाणें घ्यावा. व तेथें तफावत न करावी. बोली बरहुकूम निभावणी करावी. कोणीही बदअम्मल न करावा. आठ महिने स्वारी करावी. वैशाखमासीं लष्करानीं छावणीस झाडेनिशीं यावें.

येतांच आपले लष्करचा कुल झाडा घ्यावा. पूर्वील जाबतेप्रमाणें बिशाद रुजू घ्यावी. जास्ती होईल ती किंमत करून त्याचे हक्कांत³ धरावें. थोर किंमतीची वस्तभाव असलिया दिवाणांत⁴ घ्यावी. कोणी चोरून ठेविलिया आणि सरदारास दखल⁵ जाहलिया त्यास शिक्षा करावी. लष्कर छावणीस आलेवर हिशेबाप्रमाणें पैसा सोनें रुपें जडजवाहीर कापड वगैरे सर्व सरदारानीं घेऊन हुजूर दर्शनास जावें. तेथें अवघा हिशेब समजावून मालमत्ता द्यावी. लष्कर लोकांचे सरंजाम हिशेब देणें, फाजील ऐवज मागणें, तो हुजुरून घेऊन छावणीस जावें. ज्यांणीं कामकाजें केलीं त्या लोकांसही सरंजाम करून द्यावा. कैदे⁶प्रमाणें वर्तणूक कोणी केली असेल त्यास नावाजोन ज्यांणीं कीर्ति केली असेल त्यांची चौकशी बहुतांमतें शोध करीत असावें. चार मास छावणी करून दसऱ्यानंतर आज्ञेप्रमाणें ज्या प्रांतास जाणें तिकडे जावें.

ऐसें लष्करचें वर्तमान तैसे मावळे लोक त्यांसि दहा लोकांस एक नाईक, पांच नायकांस एक हवलदार, दोनी हवाले मिळून एक जुमला, दहा जुमले म्हणजे एक हजारी करावे. जुमलेदारास शंभर होन तैनात. त्यास एक सबनीस नेमून दिधला. त्यास चाळीस होन तैनात करून द्यावी. तैसेंच हजारी यास पांचशें होन तैनात. त्यास एक कारकून शंभर होन तैनातीचा करून द्यावा. सर्व हजारी मिळोन त्यांस येसजी निकम⁷ म्हणोन सरनोबत केला. त्याचे आज्ञेत

१ कंजारणी—कंजारी म्हणून एक हलकी जात आहे.

२. बंद धरणें=कैद करणें.

३. हक्कांत=रोजमुऱ्यांत, वेतनांत.

४. दिवाणांत=सरकारांत.

५. दखल=ज्ञात, श्रुत.

६. कैद—कायदा, नियम.

७. "येसजी निकम" यास "येसाजी कंक" म्हणतात. पण हा अपभ्रंश मोडी लिपीवरून झाला असावा. "कंक" हें आडनांव मराठ्यांच्या शहाण्णव कुळींत नाहीं. "निकम" हें आडळत. तेव्हां मोडींत येसा निकम असें लिहितांना 'क' अक्षरावर अनुस्वार दिला असल्यास (आणि असा देतात) त्याचें "येसाजी कंक" असें केलें असावें. हल्लींच्या मूळ प्रतींतही "क" वर अनुस्वार दिलेला आहे. ग्रांटडफ यांणीं जें एकदां 'येसाजी कंक' लिहिलें त्याचेंच उतारे अर्थात् आलीकडील इंग्रजी व मराठी ग्रंथांत झाले यांत फारसें नवल नाहीं.

सर्वांनीं असावें. सरनोबतास मुजुमदार व फडणीस व चौकीनिवीस हुजरातीस द्यावे. व सर्व लोकांस तनखे द्यावे. नेमणुकी बरहुकूम वराता द्याव्या. शेतें करतील त्यांस रयतेप्रमाणें आकार करून त्यांचे हक्कांत धरावें. बाकी देणें तें हुजुरून वरातेनें द्यावें. येणेंप्रमाणें सालझाडा वरचेवरि करीत जावें. लष्करास व हशमास एकंदर वरकडांसहित मोकास व महाल [न] देणें. महिने जें देणें तें वरातेनें अगर पोत्यानें द्यावें. कुल कामांत सोहेबी कारकुनाखेरीज कोणाची अणुमात्र नाहीं. लष्करास व हशमास व गडकरी यांस जें देणें तें कारकुनाकडोन देववावें. मुकासे जहालिया रयत अफाट होईल, बळावेल. कमाविशीची कैद चालणार नाहीं. रयत बळावली म्हणजे जागजागां पुंड पाळेगार होतील. त्यास मुकासा द्यावा तो व वतनदार एक होऊन बेकैदी वर्तणूक करितील. याजकरितां मुकासे देणें नाहीं.

जो नवा मुलूख काबीज होतो त्या मुलखांत कारकून चौकस दप्तरदार करून कागद झडती करून मोसबा दिला असे जे दफ्तरदार असतील त्यांमध्यें शहाणा पाहून महालाची मजमू सांगावी. पुढें होतां होतां शहाणा पाहून हवाला अथवा सुभा सांगावा. मुख्य गोष्ट चौकस लिहिणार शहाणा पाहून त्यासच महालचा मामला सांगावा. केवळ लिहिणार नसोन कमाविशी न केली त्यास महालचा मामला धंदा सांगणें नाहीं. त्यास पादशाहींत चाकरीस जाणें अगर घोडे घेऊन शिलेदारी करणें ऐसें सांगोन निरोप द्यावा. मुलुखांत कारकून ठेवावे त्यांस महाल पाहून हवाले सांगावे. हवलदारास दरमहा तीन होन चार होन करावे अगर सालीना साठ पाऊणशें होन. एक सुभेदार कारकून करावा त्यास चारशें होन तैनात करावी. त्यास मजमदार सुभेचा करावा त्यास शंभर होन करावे. सुभेदारांनां चारशें होनांत पालखी चालवावी. मजमदाराचे तैनातीस हवालदार असेल त्यास अफदागिरी द्यावी. छत्री पादशाही वजिरास मातबर लोकांस होती तो शिरस्ता महाराजांनीं मोडला कीं, पादशाहीवरि छत्री आणि लोकांवरिही छत्री. याजकरितां छत्रीकायदा मोडला आणि अफदागिरी केली. सर्वत्र लष्कर व हशम त्यांमध्यें शंभर होन तैनातीस व अफदागिरीस. आपली तैनात चालवावी. मुलखांत देश पाहून आकार दोन अडीच तीन लक्ष होनांस एक सुभा करून, धामधुमीचा मुलुख पाहून संगिनात लष्कर स्वार हशम जागजागां जितुकी तोलदारी पाहिजे तितुकी करून दिधली. मुलुखाची जमीन मोजणी करून जमीन झाडा चावर करून आकार केला. साडेपांच हातांची काठी करून, ऐशा वीस काठ्या औरस चौरस त्यांचा एक बिघा. एकशें

८. पोतें-सरकारी तिजोरी. | ९. साहेबी-स्वामित्व, धनीपणा, सत्ता.

बीस बिघेचा एक चावर. ऐसा जमिनीचा आकार करून गांवचे गांव मोजून चौकशी केली. बिघ्यास पाहून आकार करून पांच तक्षिमा पिकाच्या करून तीन तक्षिमा रयतेस द्याव्या व दोन तक्षिमा दिवाणांत घ्याव्या. येणेंप्रमाणें रयत पाहून घ्यावें. नवी रयत येईल त्यांस बैल गुरें द्यावीं. बीज रयत [याणें] विकत घ्यावें येईल. व नातवान असलिया दाणे पैके द्यावे. ऐवज दोन चार वर्षांनीं आदाय पाहून उगवणी करून घ्यावा. ये जातीचें रयतेचें पालग्रहण करावें. गांवचे गांवकर रयतेची रयत कारकुनांनीं कमाविशी पाहून त्यांजवळून पिकावर वसूल घ्यावा. पाटील कुळकर्णी देशमुखाचे हाताखालीं कैदेंत रयत नाहीं. त्यांणीं साहेबी करून नागवीन म्हटलियानें त्याचे हातीं नाहीं. अदलशाही निजामशाही मोंगलाई देश काबीज केला त्या देशांत मुलखाचे पाटील कुळकर्णी यांचे हातीं व देशकांचे हातीं रयत व गांवकर. त्यांणीं कमाविशी करावी. आणि दिवाण मोघम टक्का घ्यावा. हजार दोन हजार होन जे गांवीं मिरासदारांनीं घ्यावे, त्या गांवीं दोनशें तीनशें दिवाणास खंडणी खंडमक्ता द्यावा. यामुळें मिरासदार द्रव्यवान् होऊन गांवास वाडा हुडे बांधवून संगीनात घ्यावे. बंदुखी ठेवून बोलाविल्या भेटणें नाहीं. गुंआईशी पाहून टक्का जास्ती मागितलियानें बळानें भांडावयासि उभे राहिले. हे जाजतीनें पुढेंच होऊन देश आपले हातून गेला हा प्रकार. त्यास राजानें काबीज करून वाडे हुडे कोट पाडिले. नामांकित कोट तेथें ठाणें आपलें ठेविलें. आणि मिरासदाराचे हातीं नाहीं ऐसें करून मिरासदारांनीं इनाम इजारती मन मानेसारखी आपले खुषीनें घेतली होती ती सर्व अनामत करून मिरासदार पाहून गल्ला व नक्त देशमूख व देशकुळकर्णी व पाटील कुळकर्णी व चौगुला व मखदूम यांस आपण हुजुरून वराता करून द्याव्या. आपले खुषीनें [त्यांणीं] कांहीं न घ्यावें. मिरासदारांनीं वाडे हुडे बांधूं नये. धोंड्यांचीं भिताडें घालून घर बांधून रहावें. प्यादे बंदुखी ठेवणें ते दिवाणचे करून ठेवावे. गांव पाहून दिवाणचे कारकून सुभेदारानें तीन होन दरमहा करून ठेवावे. सात पांच गांवीं मिळोन एक तर्फेदार वेतन चार पांच होन करून ठेवावा. असा तमाम मुलखाचा बंदोबस्त केला. मुलखांतील श्री देवस्थानें महा जागृत आगजागां होतीं त्यांस दिवाबत्ती नैवेद्य अभिषेक स्थळ पाहून यथाविधीनें चालविलें.

---

१०. नातवान=गरीब.

११. गांवकर=पाटील अगर चौगुला. गांवचे मुख्य कामगार.

१२. देशक=देशमुख, देशपांडे.

१३. हुडा=बुरुज, गढी.

१४. गुंआई=गुंजावी, [illegible].

व मुसलमान यांचे पीर मशीद यांची दिवाबत्ती तबरूकें चमत्कारिक स्थळें पाहून उरूस चालविले. तदनंतर श्री वैदिक ब्राह्मण विद्यावंत शास्त्रज्ञ महान् पंडित श्री वेदसंपन्न व ज्योतिषी अनुष्ठित महातपस्वी सत्पात्र गांवगन्ना पाहून त्यांचे कुटुंबाप्रमाणें अन्नवस्त्र लागेल तें त्या अन्वयें द्रव्य धान्य त्यांचे गांवीं महालीं नेमून द्यावें. सालदरसाल कारकुनांनीं त्यांस पाठवून ते भक्षून स्नानसंध्यादि षट्कर्माचरण आचरोन महाराजांस व राज्यास कल्याण दिवसेंदिवस चिंतून सुखरूप रहावें. तैसेंच गड कोठ किल्ले लष्कर हशम मुलूख हुजरातींत चौकशी करून राज्य महाराज करीत चालले.

मोंगलाईत धुंद उठविली ही खबर दिल्लीस अवरंगजेबास कळोन बहुत चिंतातुर होऊन महाराजांस बोलाविलें.[!] विजापूरची फौज अफजलखानासारखा मातबर वजीर होता त्यास बाराहजार स्वारांचे फौजेनिशीं बुडवून नेस्तनाबूद केला. गड कोट तीन पादशाही अदलशाह पादशाह विजापूर व हैदराबादेचा तानाशाहा पादशाहा व बेदरचा बहामनी कांगो पादशाह व दौलताबादेचा बाहिरी निजामशाह या चोहों पादशाहांचे जोरावारीनें राज्य महाराजांनीं घेतलें. त्याची तरतूद करावी ह्मणोन विचार करून कुळी पादशाही वजीर उमराव बोलावून आणून एक सुभा फौज लक्ष घोडा राजियावरि रवाना करावा ह्मणोन तजवीज करून नबाब शास्ताखान मुतलक वकील हिंमतवान् औरंगजेब पादशाहाचा मावसा, भारी उमराव तोलदार वजीर निवडक त्याजबराबर थोर थोर वजीर लक्षाचे लक्ष घोडे राऊत देऊन महाराजांवरि परम क्रोधें रवाना केले. त्यांस पादशाहानीं बुद्धिवाद सांगितला कीं, तुम्हीं जाऊन महाराजांस मारून गर्दीस मिळविणें. गड कोट किल्ले घेऊन हस्तगत करणें. ऐसें स्पष्ट सांगोन रवाना केलें. बराबर उजेबक, पठाण व रोहिले व रजपत बं ग स व रांगडे व भिल्ल नाना जातींचे लष्कर तिरंदाज व बरसंदाज सैतींवाले मु स्त फा बौंवरे हटेले उमदे लोक तैसेंच रांगडे व तैशाच हत्तीवरील तोफा व घोड्यावरील तोफा व पायचे बै ले व बंदुखी बरचीवाले आडहत्यारी पट्टेकरी व इटेकरी, बाणेकरी व चक्रधारी व कमाणमारी व पिस्तुलवाले पायचे लोक १००००० गणती लागली. समागमें फरासखानेचे हत्ती सुमारें दोनशें २०० तैसेच भांडियांचे ५०० शें हत्ती, उंठ सुमार आठरा कारखाने व तोफखाना व बाजे मिळोन गणती ३०००० तीस हजार. व खजाना वगैरा हत्ती सुमार तीनशें. याखेरीज उंट बाणाचे २००० दोन हजार व दारूगोळ्याचे सुमार ३००० छकडे व घोड्याचे

१५. तबरूक=पिरापुढील अगर ताबुता पुढील प्रसाद.

१६. सैती=एकप्रकारची बर्ची, हिला दोरी लाविलेली असते.

१७. बावरे=बावरेबावरे, उग्र.

सुमार २००० दोन हजार [ अशी ] दिल्लीश्वरानें शास्ताखानाची व बाजे लोक यांची रवानगी केली. दिल्लीश्वर म्हणजे या कलियुगीं संपदेचा अमर्याद सागर. संपदाविभवें रावण किंवा प्रत्यक्ष दुर्योधनच हीच समता. अवरंगजेबास धराभुवनीं लक्षितां अन्य सम तुलनेस नाहीं. यदर्थी वचन "दिल्लीश्वरो वा परमेश्वरो वा[18]" हें पद समस्त जनांनीं अवरंगजेबास दिधलें. जनीं जनार्दन असे त्या कैसें म्हणावें? अवरंगजेबाची साधनसंपदा श्री ईश्वरेंच वर्णावी. मानवी यास वर्णावयास अणुमात्र सामर्थ्य नाहीं. पृथ्वीपद ईन्शा अल्ला हुतआला यांगीं अकबरासहित अवरंगजेबास करार करून बक्षिसी केली आहे. शास्तीखान नबाबासमागमें पादशहांनीं हत्ती घोडे पायदळ व खजाना गाड्यांवर भरून व याखेरीज नख्त सोनें रुपये मोहरा होन ऐसें ३२ कोटी द्रव्य घेऊन दिल्लीहून शास्ताखान नबाब, पादशहाचा मावसा, गर्जना करीत परम तवकें फौजेचे विडे घेऊन मोहीम फते करावी हा अभिमान धरून दक्षिणेस शिवाजी महाराजांस हतभग्न करावया सेनासमुद्र घेऊन आला. लष्कर बेमुबलक. दोन तीन गांव लांब पांच कोश रुंदी ऐसें लष्कर जंगलोजंगलीं रहात चाललें. नदीवांचून पाण्याची लष्करास निभावणी न होय. या प्रकारचें लष्कर ऐसें जमलें. मजल दरमजल चालोन येऊन तीन महिन्यांनीं पुण्यास दाखल शास्तीखान जहाले. राजे राजगडीं होते. सर्व सरकारकून व थोर थोर सरदार व सरनोबत व हुजूर बोलावून विचारिलें. सर्वांचे मतें विचार केला जे, "सल्ला करावा, भेटी घ्यावी, त्याशीं युद्ध करितां गांठ पडत नाहीं. आपली फौज ती काय?" ऐसा विचार झाला. महाराजांचे मनांत सल्ला करावा तरि कोणीही नामजात[21] लष्करांत रजपूत मातबर, जे आपणही रजपूत, हिंदुधर्म रक्षून स्नेह संपादील ऐसा अर्थ नाहीं. शास्तीखान म्हणजे मुसलमान पादशाहाचा नातलग आप्त मावसा येथें कांहीं लांच रुषवैतें[22] चालेना. अगर आपणासि रक्षण सख्य [ कबूल ] करून भेटलियानें नाश करील. ऐशी तजवीज करून निदान मारितां मारितां जें होईल तें करावें ऐशी महाराजांनीं चित्तापासून

१८. हें पद्य असें:—
दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा
मनोरथान् पूरयितुं समर्थः
अन्यैर्नृपालैः परिदीयमानं
शाकाय वास्याल् लवणाय वास्यात् ॥
यांतील शेवटला चरण ऐकण्यांत फार येतो.

१९. ह्या पद्याविषयीं आख्यायिका अशी आहे कीं, प्रसिद्ध कवि जगन्नाथ पंडित यांस दिल्लीश्वराचा आश्रय सोडून आपल्या पदरीं रहावें अशी प्रार्थना एका रजपूत राजानें केली असतां, त्यास पंडितानीं वरील पद्यरूप उत्तर दिलें.

२०. ह्या वाक्याचा नीटसा संबंध लागत नाहीं.

२१. नामजाद=लौकिकवान्.

२२. रुषवत्=लांच.

हिंमत धरून [ निश्चय केला. ] तों तेच दिवशीं श्रीभवानी तुळजापूर-निवासिनी जगदंबा महिषासुरमर्दनी महाराजांचे अंगीं संचार करून कडाविकडी बोलों लागली जे, " माझे लेकरास म्हणावें जे शास्तीखान तो त्याची फिकीर किम्पि न करणें. जैसा अफजल प्रतापतवकें मारिला तैसेंच या दुर्बुद्धि यवनास तव हस्तकें शिक्षास्पद करितें. तूं यदर्थीं चिंता न करणें. शास्तीखान फौज सुद्धां येऊन उतरलियावरि त्याचे गोटांत शिरोन मारामारी हमतमानें करून या दुष्टास पराभवातें पाववितों." ऐसें सत्य अमृतोत्तर अभयवचनें श्रीअंबेनें सांगोन तत्क्षणीं अदृश्य जहाली. तदनंतर राजे सावध होऊन पाहूं लागले तों सन्निध होते त्यांणीं श्रीवाक्यें लिहून ठेविलीं तीं वाचून श्रवण केलीं. महाराजांस परम संतोषाच्या कोटी जहाल्या. राजे यांसि श्रीप्रसन्नता जहाली. हा खलु निश्चय केला. शकुनग्रंथी पल्लवीं दिधली. आणि पटुतर पराक्रमाची भारी हिम्मत धरिली. व आपले लष्करांत व मावळे लोकांत व हुजूर लोकांत निवड करून एक हजार मनुष्यें आणविलीं. त्यामध्यें सडे सडे राऊत फौज तयार करून शास्तीखान पुण्यास आला ही खबर तहकीक[२३] आणून राजे राजवाडेवरून[२४] खासा मुस्तेद[२५] होऊन खालीं उतरून धारकरी लोक समागमें घेऊन चालले. दादाजी बापोजी व चिमणाजी बापोजी देशपांडे हे खेड तर्फेस हरकारे होते, ते दोघे बहुत शहाणे चौकस इतबारी, महाराजांचे प्रीतिपात्र, ऐसे दोघे बंधु बराबर घेतले. नेताजी पालकर व मोरोपंत पेशवे यांच्या दोन फौजा केल्या व नेतोजी पालकर व पागा ऐशा दोन्ही फौजा शास्तीखानाचे गोटाबाहिर अर्धा कोशावर चौतर्फा उभ्या केल्या. आणि महाराजांनीं ढाल तलवार हातीं घेऊन तयार होऊन हजार माणूस पाय उतारा समागमें घेतलें. जिवावरील महाराजांनीं धाडस करून श्री अंबा हृदयीं स्मरोन चालिले. बिनीस चिमणाजी बापोजी व बापूजी कोंडदेव चालिले. त्यांचे मागें सर्व लोक फौज चालली. ताम्रांचे[२६] लोक जागजागा पुसूं लागले जे, कोणाचे लोक ? कोठें गेलां होतां ? म्हणोन. तेव्हां त्यासि चिमणाजी बापोजी बोलतें[२७] चालले. इतक्यांत मध्यरात्र जहाली. नबाबाचे डेरेंत जाऊन दुतर्फा उभे राहिले. त्यामध्यें दोनशें माणूस निवडून खासा राजियानें अंगेर्जें[२८] करून चिमणाजी बापोजीस सांगोन बाडें कटारीनें चिरून आंत शिरले. तों सात फेर तितकेही शस्त्रानें

२३. तहकीक=पक्की, निश्चित.

२४. " राजवाडेवरून " याबद्दल " राजमहालावरून " असें असतें तर बरें.

२५. मुस्तेद=तयार.

२६. ताम्र=यवन, मोंगल.

२७. चिमणाजी उत्तर करी कीं, "चौकीचे लोक, पाळी बदलून परत लष्करांत जातों."

२८. अंगेज=अंगजणी, आंगची हिंमत.

फाडून आंत गेले. चौकीचे लोक निजले होते. त्यांस अणुमात्र कळों दिलें नाहीं. पुढें खासा नबाबाचे डेरियापाशीं पावले. त्या डेरेंत बायका व खोजे व दा वा व उडदा बेगणी ऐसा समुदाय स्त्रियांचा होता. त्यामध्यें कितीएक समया व मेणबत्या लावून जागृत होत्या. त्यांणीं पारखे लोक पाहून परम घाबऱ्या होऊन भयाभीत चित्तें हांका मारून गलबला केला. इतक्यांत चिमणाजी बापूजी याणीं खोजे देवडीस आंतले होते तें पांच सात ठिकाणीं जिवें मारिले. वरकड बायका शास्तीखानाच्या खाशा बिब्या दबाविल्या. त्यामध्यें उडदा बेगणी वीस पंचवीस गुरगूज घेऊन लोकांस मारीत चालल्या. तेव्हां महाराजांचे लोकांनीं त्यांतून दहा पंधराजणी जिवानिशीं मारिल्या. बाकीच्या उगीच राहिल्या. इतका मोठा गलबला होतांच शास्तीखानास कळलें कीं, गलीम एकाएकीं चालोन आला. त्याजवरून खासा बिचोबेंतून[२९] उठोन बायकांत शिरला. तमाम समया व मेणबत्या विझविल्या. अंधार पाडिला. ओळखतां नये. तेव्हां वृद्धा पाहून खासा म्हणोन जागाजागा बायका मारिल्या. राजा खासा येऊन पाहतांच शास्तीखान नव्हे. बटकीचे सोंगानें खाशियाचा शोध डेरेंत करविला, परंतु तेथें नाहीं. भयानें बायकांत जाऊन लपला. महाराज प्रतापी पुण्यश्लोक बायकांवरि हात न करीत. इतकेंत मारितां मारितां खानाचे हाताचीं तीन बोटें तुटलीं. गलबल थोर झाली. गलीम येऊन शिरला ऐसें कळोन चौतर्फांचें लष्कर तयार झालें. सारे लष्करांत दंगा मातला. एकाचें एक ऐकेनात. अमिरांच्या वजीर उमरावांच्या व समस्त लोकांच्या बोंबड्या वळल्या. आपआपलेंत घे घे मार मार अशी गर्दी जोरावार जहाली. राजे लोकांनिशीं सांभाळून डेरेबाहेर निघाले. ताम्राचे लोक हजारो हजार गलीम कोठें आहे म्हणोन धांवण्यास निघाले. आणि आपली फौज सरनोबत पेशवे होते त्यांत मिळोन महाराज निघोन चालिले. गनिमाची फौज कुल् तयार होऊन आपलाले गोटांत शोध करूं लागले. याचा माग लागला नाहीं. महाराज स्वस्तिक्षेम आले. फत्ते करून आलियाचें वृत्त राजगडास कळतांच तोफेची सरबत्ती जहाली. लहान थोर समस्त जनांस परमानंद जहाला. ते श्लोकः—

शास्तीखान नबाब मूर्ख अगळा चालोन आला कसा ।
शीवाजी नृपती समर्थ अवनी अद्भूत ज्याचा ठसा ॥
केलें हीनहि पामरास चपळें तोडोनि बोटें झणी ।
धाकें कांपतसे कुटील उदरीं जिंकील आतां रणीं ॥ १ ॥
पाछाके दर बंदगीस अब मै जातानही ये वडी ।

२९. बिचोबा=लहान तंबू.

शास्तीकों इश्शा लगीच दिलमों जानो हमेशा बडी ॥
जानी दौलतकी नहोचि मजकूं आशा कभू प्यारसे ।
शीवा है बरजोर रोशन कियो ज्यानोच ईमानसे ॥ २ ॥
शास्तीतें मरणाहुनीच अगळें केलें नृपानें कसें ।
दंडोनी निकरें अरीस चपळें कौतुक झालें असें ॥
मारामार करूनियां निजबळें शाहूजी सुनो पातला ।
कीर्तीचें ध्वज लाविलेच अवनीं आखंड वीराजला ॥ ३ ॥
स्त्रीयां माजि कुटील मूर्ख कपटी शास्ती दडाला भयें ।
आतां मारिल भूपतीच मजला निष्ठूरता निर्दयें ॥
पाच्छानें मज धाडिलें करूं कसें शाहूजी सुनो हा बळी ।
कीर्तीचे ध्वज लाविले निशि दिवा या भोंसल्याचे कुळीं ॥ ४ ॥
सेना भीत समस्त जाण हृदयीं आपूर्व झालें कसें ।
शीवाजी नृपती समर्थ अवनीं अन्यत्र कोणी नसे ॥
पाच्छाके दरबंदगीस न चले दीदार येकी घडी ।
जादा देखनमों करामत असे जाना दिलेमों बडी ॥ ५ ॥
पाच्छाचे अमिरादि सर्व वजिरां मारील हा भूपती ।
दिल्ली घेउनियां प्रतापतवकें संरक्षिता हे क्षिती ॥
ईराणादिक हे तुराण अवघे घेईल राजा बळें ।
हस्तीं शस्त्र धरूनि सर्व चपळें खाणील शत्रूमुळें ॥ ६ ॥

ऐसा ह्यिा महाराजांचा इतरांस घडों पहातो कीं काय?

तदनंतर दिवस उगवल्यावरि शास्तीखान नबाबाचे परामर्षास सर्व वजीर उमराव व बाजे लोक मातबर आले. पहातात तों नबाबाचीं तीन बोटें तरवारीचे वारानें अगदीं उडोन गेलीं. वरकड कित्येक लोकांचा नाश जहाला. बायका व व खोजे उडदा बेगणी यासि जखमा लागल्या. कित्येक मारिल्या. ऐसें कळोन नबाब समस्तांस बोलले जे, गनीम बडे हिमतीनें काडी इतका जुम्मस[३०] न खातां दीलका करार करून वाघासारखा शिवाजी लोकांनिशीं खासे डेरेंत शिरोन मारामारी केली. बडा शोर[३१] हुवा. परंतु अमीर वजीर व मातबर लोक हुशार जहाले नाहींत. गलीम सन्निध असतां बेफाम. तेव्हां अवघे फितव्यांत मिळाले. आतां इतबार कोणाचा नाहीं. एकांतीं राजा येऊन डेरेंत माझीं बोटें तोडलीं उद्यां मागती जोरावारीनें येऊन आपलें शीर कापून नेईल. काय गति करावी? शिवाजी मोठा दगेखोर. दगा दिधला. तैसाच आणखी दगा

३०. जुम्मस=धास्ती, धाक. | ३१. शोर=संरंभ, लगबग.

देईल. आमचे लष्करचा इतबार नाहीं. आपण माघारां कूच करून जातों. या लोकांबराबर रहात नाहीं. असा दृढ विचार करून तिसरे दिवशीं माघारां शास्तीखान चालला.

राजे राजगडास आले. बातमीस जासूद पाठविले त्यांणीं नबाबाचे लष्करांत जाऊन खबर घेऊन येऊन सांगितलें जे, खानाचीं तीन बोटें तुटोन गेलीं. उजवा हात थोटा जहाला. वरकड कितेक बायका व लोक मारिले. नबाब या भयानें फौजेनिशीं दिल्लीस चालला. हें वर्तमान आल्यावरून महाराज परम आनंदयुक्त जहाले कीं, यासमयीं भारी फत्ते जहाली. शास्तीखानास हें नांव पादशहांनीं ठेविलें परंतु यथार्थ ठेविलें नाहीं. ते शास्तीखान आपण खरे करून समस्त लोकांत व चहूं खंडांत रुजू जहाले. ऐसें बोलोन गलीम पराभव प्रत्यक्ष जनांत रुजवातीस आला या आनंदें हत्तीवरून साखरा वांटल्या व अपरामित जय संपादन केल्याची खुशाली केली. आणि राज्य संतोषरूप करीत राहिले.

खान भयें करून मजल दरमजल मागें न पाहतां दिल्लीस पावला. पादशाहा मनांत आश्चर्य करून परम दिलगीर जहाला. अतःपर महाराजापुढें दुसरा विचार नाहीं म्हणोन श्वास टाकिला. खानाची फौज काय? तैशियामध्यें आपले अंगजोरानें मरणाची परवा न धरितां डेरे फाडून आंत शिरोन मारामार केली म्हणजे काय! शिवाजी महाराज अदमी नव्हे. बडा सैतान आहे. अशा गोष्टी वजीर उमराव दिवाणास व शाहजादे बहादूरशाहा व माजुद्दीन व कामबक्ष व दिदारबक्ष यांस जाहिर केल्या आणि तोंडांत हाताची अंगुली घालून दंग जहाला. आणि परवर दिगार मोठा गजब जहाला. शास्तीखान बडा नामर्द, तो आलिया वर्ज करावा ऐसा सिद्धांत केला. एकतर मसलत नामोहरम केली. दुसरी गोष्ट शिवाजी महाराजांनीं बरजोरीसे शिक्षास्पद केलें. तन्मूळें शास्तीखान शास्ती जहाला. यावरून त्यास समक्ष येऊं दिला नाहीं. यास्तव खान अर्जुर्दा[32] होऊन खांमीची[33] खंत चित्तांत आणून पेशमान जहाला. येबाबे अलमपैंनाह[34] पादशहानीं शास्तीखानास बेवकूफीचा हुकूम फर्माविला जे, आपण हवेलीस जाकर रहना. अबरू रही नही. हा सर्व प्रकार बेवकूफीचा घडला. तदनंतर त्याजसमागमें जे वजीर गेले होते त्यांस हुजूर आणून अपमान करून दौलती कमी करून जहागिरी काढिल्या. कितेक दूर केले. ते वेळीं त्याणीं अर्ज केला जे, "हजरत-नें बडा अमीर नवाब करून दिला. त्याचे हुकुमांत रहावें असा हुकूम

---

३२. अर्जुर्दा—खट्टू.
३३. खामी=नुकसान, हानि.
३४. अलमपन्हा—दुनयेचे संरक्षक.

केला. त्या बरहुकूम वर्तत असतां गाफलपणें नामोहरम होऊन भागकर आये. हमारी बात सुनी नही. मोहीम सुरू न करितां माघारे आले. आम्ही या गोष्टीस काय करावें ! इसबाबे हमारी तकशीर नही. हम पादशाहाके दौलतकी भलाई चहाते हों. उँमदे पादशहानें अमीर बडा अमीरुल उमराव देणें याजबराबर जाऊन खस्त होऊं." ऐसें म्हणतांच त्यास मागती दीलदिलासी होऊन पूर्वील जहागिरी करार करून बहुत खूष जहाले.

पुढें शिवाजी महाराजांवर कोणता मर्दाना उमराव साहेब यख्तियार रवाना करावा ? आणि फत्ते करून कोण येईल ? हा विचार करून अमीरुल उमराव बेवीस यांपैकीं द स दीस आणून औरंगजेब पादशाहा यांणीं भारी तजवीज केली जे, मातबर सरदार फौजदार सब बातसे माकूल दानां ऐसा कोण आहे ? ऐसें म्हणोन मोठे शूर धैर्यवान् बलाढ्य हटेल बिरदाईत मिरजा राजा व सवाई जयसिंगराजा रजपूत रवाना करावे. हिंदूपर मोहीम हिंदूकी सुरू आहे. ऐसें पादशाहा बोलोन उभयतां राजे यांस हुकूम फर्माविला जे, " तुम्ही शिवाजी राजे यांसि जीवंत धरून आणावें म्हणजे तुमचें बहुतां प्रकारें ऊर्जित होईल. शास्तीखानासारखें न करणें. इमान इतबारें सेवा करून शास्तीचे नाकास चूर्ण लावणें. तुम्ही हिंदू मर्दाने नेकजाद हरगीजें तफावत न करणें. इसवास्ते दक्षिणेचे मोहिमेस जावयास फर्माविलें आहे. " ऐसा करार जाहालियावरि उभयतांनीं कुरनिशात करून अर्ज केला जे, " आह्मी हजरतीचे दुवागीर. हमारे बडे तागायत बादशहाजे कदमोंको तफावत केली नाहीं. आमचा करार जीव जमीयतनिशीं पादशाहाके दौलतकेवास्ते खर्च होना. और कुच जानते नही. शिवाकी क्या मुजाख ? हम सब दख्खन काबीज पादशाहाके मेहेरसे करेंगे. ये हिंमत हजरतकू रोषँन है. शिवाकू पकडलाते है. और इसबाबें हमारे अर्ज शिवा इमानसे दर बंदगीके हजर हुवा तो सब तकशीर माफ करून जादा दौलत देऊन बढती करावी. हमारेपर नेक नजर देऊन शिवाका भला केल्यानें अछी बात. इसबाबें हमारे शीरपर हात रखना. शिवाजीस हजर करितों. न व दि ग र केल्यास फौसेसहित खर्च होतों. हा करार आमचा." तेव्हां पादशाहा उभयतां राजे यांस बोलले जे, तुमचे वचनावेगळें नाहीं. तुम्ही सांगाल त्याप्रमाणें चालवूं. म्हणोन कुराणाची शपथ दिली. आणि उभयतांस पांच नग भरगच्ची वस्त्रें व मोत्यांचे तुरे व कलम्या व जडावाचीं कर्डी

३५. " उमेद " असें मूळांत आहे.
३६. दील दिलासा=आश्वासन.
३७. माकुल=उचित, योग्य.
३८. दाना=शहाणा.
३९. हरगीज=सर्वथा, कोणत्याही प्रकारें.
४०. रोषन=श्रुत.

व पदकें व नवरत्नांकित पाचूचे हार व घोडे अरबी पांच पांच व हत्ती एक एक व तीन तीन कोट रुपये व शहागोषें[४१] दोन व चित्ते दोन देऊन रवाना केले.

दिल्लीहून निघाले ते मजल दर मजल शास्तीखानाचे तोलाप्रमाणें, किंबहुना त्याहूनही अधिक कुवतीनें, सेनासंभार भारती सेनेतुल्य निघाले. पृथ्वी आकाश अनुपदें अष्टदिशा सेनापथ धुरोळा वातस्पर्शें उठला त्यामुळें आकाशवासी श्री भास्करबिंब अगदीं आच्छादन जहालें. ऐसा सेनासमुद्र उचंबळला. दक्षिण प्रतापें हस्तगत करावया भूमंडळाचेठायीं प्रसर मासांत प्राय जाहाला. जेथें फौजेचा मुक्काम पडों लागला तत्र स्थळीं लांबी दोन अडीच [४२]गांवें व रुंद दीड गांव ऐसा गोट घनदाट. शिबिरें सफेत पर्वताकार. हती घोडे पायदळ उंट खेचरें व गुरेंढोरें ऐशा चतुरंग सेनासमुदायानिशीं उभयतां हिंदू राजे गर्जना करित चालिले. त्यांणीं शोधा शोध करून विचारणा केली जे, " शिवाजी मोठा हुन्नरवंत मर्दाना समशेर बहादर शिपाई आंगचा आहे. ज्याणें मर्दुमीनें अफजलखान आपले अंगें मारिला. तैसेंच शास्तीखानाचे डेरेंत शिरून मारामारी केली. ऐशियाबराबर जय कैसा येईल ?" म्हणोन चिंतासागरीं पतन पावले. तेव्हां थोर थोर सिद्धांत जाणते व वेदांतवक्ते नृपाचे आश्रित ब्राह्मण चतुःशास्त्री वेदपरायण पुरोहित अनुष्टित बोलिले जे एतद्विषयीं जयप्राप्तीस्तव श्रीदेवीचें आराधन सांगोपांग करावें. श्री प्रसन्न करून घ्यावी यांत श्रेयस्करता आहे. हा ब्राह्मणाचा इत्यर्थ ध्यानास आणून ब्राह्मणांस बोलिले जे, कोटिचंडी याग करावा व अनुपदें अकरा कोटी पार्थिव मृत्तिकेचीं लिंगें करावीं व कार्तवीर्याचा जप करावा व बगळा बकमुखी व श्रीकालिका व कालरूपी देवता अधिष्ठानें हीं पांच अनुष्ठानें शीघ्र करावीं. त्यावरून अनुष्ठानें चालीस लाविलीं. येविशीं दोन कोट रुपये धर्मकृत्यास काढून ठेविले. स्वहस्तें उदक सोडिलें. तीन मासानंतर अनुष्ठानें सिद्ध जहालीं. त्यांची पूर्णाहुती करून दान दक्षणा व ब्राह्मणभोजन यथायुक्त घातलें. तेथून उभयतां सद्या संभारासहित मजल दरमजल कूच करीत आले.

ही खबर महाराजांस येऊन वार्तिकांनीं पोंचविली कीं, उभयतां राजे लक्ष फौजेनिशीं आले. पांच हजार स्वार पठाण व आठ हजार मोंगल व बाकी फौज रांगडे व रजपूत दहा हजार एकूण सवा लक्ष सहित चालोन आले. त्याजवरून महाराज विचारांत पडले. ते समयीं बुद्धिमंत सरकारकून व मराठे

---

४१. शहागोष—शिकारींत उपयोगी पडणारें एक जनावर.

४२. गांवें—योजनें.

मातबर यांस हुजूर बोलावून एकांतासि आणिलें. तेवेळीं भवति न भवतीचा शोधाशोध करून विचार घटितार्थ केला. त्यास सर्वांनीं महाराजांस बुद्धिप्रदतेस जें ज्यास प्रसंगीं सुचलें तैसें सांगितलें जे, अफजलखान व शास्तीखान आलेले त्यांचीं पारपत्यें जहालेलीं त्यांस समजलीं आहेत. दगा करूं देणार नाहींत. यास्तव यांशीं सल्ला करावा. महाराज बोलिले जे, " रजपूत कैसा तरी वोळिला जाईल, परंतु दलेलखान [४३]हैरोळ हरामजादा कपटी खोटा बेमान आहे. पादशाहाची मेहेरबानी व इतबार व अंतरंग बराच आहे. तो भला नव्हे. तोच काय करील न कळे. तो बराबर नसता तरि आमचे योजिले मनोरथ सिद्धीस जाते. आतां श्रीअंबेवरी भार घातला आहे. चित्तास येईल तें करील." ऐसें महाराज बोलल्यावर तो दिवस गेला. तदनंतर दुसरे दिवशीं श्रीभवानी महाराजांचे अंगांत संचार करून बोलूं लागली जे, " अरे बाळा, यावेळेस प्रसंग मोठा दुर्धर आहे. उभयतां राजे यांस मारवत नाहीं. भेटावें लागेल. दिल्लीस पादशाहाचे दर्शनास जावें लागतें. तेथें प्रसंग कठीण प्राप्त होईल. परंतु आपण तुजसमागमें संरक्षणास येतों. तुजकारितां नाना प्रयत्न करून संकटांतून काढून संरक्षोन भक्तोत्तमा पुन्हा राज्यावरि राज्यकरावयास घेऊन येईन. राजा ! तुजला विजयी करीन. एतद्विषयीं अणुमात्र चिंता न करणें. ऐसें कृपाळू होऊन श्रीअंबेनें भक्तराजास अभय वचन दिधलें. हें राज्य आपलें वरदी आहे. सत्तावीस पिढ्या तुजला वंशपरंपरें दिधलें. हें सत्तावीस पुरुष पर्यंत एकछत्री राज्य करणें. ऐसा ह्या राज्याचा पूर्णाभिमान आहे. यद्यपि भक्ताकडून कांहीं अंतराय पडलिया क्षमाकरून सर्वांठायीं तुझी संरक्षणाच करावी लागते. कोणतेही विषयीं चिंता न करणें. " ऐसें सांगोन श्री अदृश्य जहाली. तीं संपूर्ण वाक्यें बांकनिसांनीं लिहून ठेविलीं तीं महाराज सावध जहालिया वरि निवेदन केलीं. त्याजवरून राजे बहुत संतोषप्रद जहाले. आणि मोठी हिंमत धरली.

इतकियांत जयसिंगराजे पुरंदर व कोंडाणा या दोहीं किल्यांचे दरम्यान लष्करसुद्धां मुक्काम करून राहिले आणि महाराजांकडे पत्रें जासुदां समागमें पाठविलीं कीं, " तुम्हीं स्वदेशी रजपूत, तुम्ही आम्ही एकच आहों. याजकारितां तुम्हीं चित्तांत दुसरा अर्थ किमपि न आणितां [४४]बेवसवसा भेटीस यावें. तुमचें सर्व प्रकारें कल्याण करून देऊं. " म्हणोन राजगडास आलीं. त्या पत्रांचा भावार्थ श्रवणें करून अवगत जहाला. त्याचा मथितार्थ महाराजांनीं केला जे,

---

४३. हरोळ=फौजेची पिच्छाडी, तिजवरील अम्मलदार.

४४. बे वसवसा=बिनदिक्कत.

उभयतांकडेस होजिबीस शहाणा चौकस बुद्धिसागर बृहस्पतिसमान उत्तर प्रतिउत्तर समर्पक [ करणार ] कोण योजून पाठवावा. ही तजवीज चित्ताचा शोध करून महाराजांनीं केली. आणि आपले राजमंडळांत योजना मांडली. जैसा श्रीरामचंद्रजींनीं लंकेशाकडे शिष्टाई संबंधास अष्टादश कपिपुंगवांत अभिनव, बलोत्कट, सहिष्ण, शांत, दांत, सर्वाध्यक्ष, प र वि ष, पटुतर प्रतापी, वाचामीशासमान उत्तर प्रतिउत्तर सांग निक्षून वाग्माधुर्यद व रसिक सगर्भ वचनें अमृतोत्तम माधुर्य निरुपम अग्रगण्य, श्रीधरासुताधव त्रैलोक्यनाथ दशरथात्मज श्रीरघुनायकुलतिलकचरणारविंदीं तत्पर, साभिमानी सुलक्षण महामेरुप्राय प्रसंगीं श्रीजानकीनायक [यांणीं] कनकपुरवासी यांजकडे समर्थ आज्ञा करून प्रेषिलें; तदनुरूप शिवाजी महाराजांनीं विवंचना करून आश्रित समूहांत महातेजस्वी दैदीप्यमान, द्वितीय द्विजराज, वेदपरायण, षट्शास्त्रीं निपुण, सत्य समर्पक बोलणार, पडले मनसब्यास वि ष यं ध नि त, किंबहुना विक्रमोपराक्रमें अर्भाट रचोन गंधर्व-नगरातुल्य भयप्रदतेस विभू रचून अमित्रास गोचरता करून कार्यभागीं द क्ष वा वें, वांछित अभीष्ट सिद्धीस नेणार, सकल वेदशास्त्र संपन्न, राजश्री रघुनाथ भट्ट पंडितराव संनिध होते त्यांस शिष्टाई संबंधास उभयतां राजे यांजकडे पाठवावें ही विचारणा केली. रजपूत परम प्रवीण, क्षात्रधर्मी निपुण, सर्वज्ञ, श्रीविष्णुभक्त, सत्यवचनी, अगाध कर्मांचे ठायीं परमभीत, सहिष्णु, वेदमर्यादेनुरूप प्रवर्ते करीत आहेत, सज्ञानत्वासही शिखामणिच, तीन कर्मास अ ह र्वे, क्षत्रिय कुलावतंस, अभिज्ञ, सज्ञान, पांडित्याचेठायीं अतिशयेशीं रत, भवति न भवति प्रसंगास योग्यायोग्य वचनें माधुर्य, मनोरंजनास विश्रांतिदायक ही प्रमाणताच. रघुनाथराव पंडित गेल्यावरि परमानंदच उभयतां राजे पावतील. हा महाराजांनीं सिद्धांत करून त्यांजसमागमें त्या उभयतांस दिव्यवस्त्रें महा तेजस्वी त्रि षु समान, कीं चंद्रिका व सूर्य तद्वत् व तसेच अलंकार नवरत्नांकित पाचू परोजें लसणे गोमेदमणि श्यामवर्ण आरक्त माणिकें वैडूर्य दैदीप्यमान, तद्उत्तर परम वर्तुळ अलौकिक शुक्तिकासुत हुरमुजी मुक्ताफळें बदरीफळातुल्य मणिमाणकें संवेष्टित प्रवाळ श्रीमंत सभूषणें शिरोपेंच, चहूं मोतियांचे तुरे, अनुपदें कलगिया, तदुत्तर कंठयुगलींच्या कंठ्या मुक्ताफळें वेष्टित कनकसहित व तसेंच हेममांडित पदकें नवरत्नांकित रत्नराजिया सुतेजत्वें मध्यनायक वैडूर्य योग्यता पावले, व हस्तकडीं जडित व बाहुभूषणें, तशींच पंचपंच करपल्लवेंस मुद्रिका नवर-

---

३५. वाचामईश=वाचस्पति, बृहस्पति.
३६. द्विजराज=चंद्र.
३७. गांधर्व नगर=पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे ढगें येऊन त्यांत चित्रविचित्र रंगाची रचना दिसते तीस गंधर्वनगर म्हणतात.
३८. परोज=नीळ, निळ्या रंगाचें रत्न.

रत्नांकित हस्तलाघव चमत्काराचेठायीं विद्युल्लतेसमान प्रभा विराजोन भूमीचेठायीं किरणें देदीप्यमान विराजलीं. किंवा व्योमगर्भीतून उडुगणेंच धरारातळवटीं पतन जहालीं. या प्रकारचे अलंकार व राजवहनाचे वाजी नटनागर भूषणें संयुक्त वारिधि-तीरानें आलियास्तव नाम अरबी पावले. वारू विलोकितां उपमेस द्वितीय श्यामकर्णच. तैसेच मत्त करी सुभावने. पलखदंतीं आभरणें विराजलीं. मस्तकीं रत्नांकित र मों चि त मा तलवटीं सुवर्णाचीं अश्वत्थपर्णें, तदुत्तर कंठाभरणें सुवर्ण गोमांनकी सुवर्णाची सकलाद गजवेष्टित विराजल्या. तदनंतर पृष्टीं पाखरा भरजरी मुक्ताफळें संवेष्टित, पदीं सुवर्णाचे अंदु, कर्णीं गुच्छ, नग पुच्छाचे, गज लक्षितां परम नेटके कनकाचेच अटळे. दिवौकस् अधिक गृहींचेच विलोकितां. तदुत्तर उपसाहित्यें फळफळावळ नानाप्रकारचीं आमोदाभरित सुमनें करंडे भरोन रघुनाथभट पंडितराव यांसमागमें देऊन महाराजांनीं बुद्धिमंत सकल लेखकावतंस निकटवर्ती द्वितीय चित्रगुप्तच असेजे बाळाजी आवजी प्रभु चिटणीस यांजवळून उभयतां राजे यांस स्नेहोपचार ममताअभिवृद्धिदायक पत्राचीं प्रत्युत्तरें यथासांग वचन-माधुर्य-सुमनवाटिकाच पत्रीं प्रसर केली. आधींच चिटणीस, मनोवांछित लेखन विषयीं परम चातुर्य, कलींत अमरगृहींचे विद्याविशारद श्रीशारदेचे अभिमुख च त रा क्ष णी हेम-मंडित भरजरी बुट्टेदारी कागद आणून शिकस्त करून महाराजांचे आज्ञेप्रमाणें लिहिलीं [ तीं ] येणेंप्रमाणें ऐसी जे. सन्मानयुक्त श्रेष्ठता अर्पून प्रसंगीं स्वकार्यास दक्ष प्रथाच प्रत्युत्तर. श्रीमंत सकलशास्त्रीं निपुण धर्मपरायण शौर्यौदार्य क्षत्रिय कुलावतंस सत्कीर्ति प्रभाकर पटुतर प्रतापी स्वधर्म ति सा ई अग्रगण्य, पंडुतनय समान निरापेक्ष, निराश्रितां महदाश्रय, श्रिया विराजमान सुराज राजश्री मिरजा भूपति यांसि प्रीतिपूर्वक शिवाजी राजेंद्र क्षितिपालक कृतानेक विज्ञप्ति. अत्रत्य कुशल श्रीकृपयातिरेक वर्धिष्णु जाणोन स्वकीय संतोषातिशय श्रांततेस परम विश्रांतिदायक अमृतावह रसोत्पत्ति पत्रपात्रीं परिपूर्णता भरोन चित्तास प्रमोदप्रद करावया वडील असां. विशेष. आपण बहुत वासरानंतर सकृपता होऊन वार्तिकासमागमें पत्र प्रेषण केलें तें अकस्मात् परम-ग्रीष्मकाल-हरणास्तव अकालीं पर्जन्यैप्रांय आगमन पत्राचें जहालें. पत्र येतांच द्वय हस्तकीं घेऊन मुदितमानसें हृदयारविंदीं समर्थ दर्शनातुल्य अवग्रहण करून चित्तास परम संतोषाच्या अपरमित कोटीच जहाल्या. पत्रागमनाचा किमपि भास नसतां गंगायमुनासंगमातुल्य उत्फुल्लित चित्तें उभयपक्षीं अमर्याद ममतासिंधु प्रसर जहाली. तदनंतर सावधवृत्ति होतांच पत्रागमनच

४९. मूळांत लेखनावतंस असें आहे. | ५०. " मयोन्यै " असें मूळांत दिसतें.

जहालें तत्क्षणींच पत्रश्रवण होऊन चित्तखलुनिश्चयता दूर पावोन श्रांतता हरण जहाली. पत्रीं भाव अशेष अनुकंपा करून दर्शविला जे, उभयतां भिन्नता व्या पि का दि नच. अन्य अर्थ चित्तांत न आणितां पत्र पावतेक्षणीं दर्शनास यावें. कोणेविषयीं आक्षेप अणुमात्र न करितां व परकी अर्थाची चिंता अल्पही न आणितां अवलंबित जहालियानें सर्वही मनोवांछित हेतु जवोत्थ परिपूर्णता होऊन सर्व गोष्टीनें कल्याणावहच आहे. अन्य असेल तरि श्रीठाकुरजीची शपथ असे. चिरंजीव राजश्री रामसिंग राजे पुत्र तद्वतच तुम्ही म्ह...न ममता पुरस्कर लिहिलें तेणेंकडून चित्त संतोष उन्मादता पावोन गजछावकातुल्य डुलत आहे. एक श्रीकुलदेवी अंबा जाणे. इतर भावनेचे संकल्पा रहित मानस जहालें. व तुमचें आगमन दिल्लीहून दक्षिणप्रांतीं जहालें ही उत्तमोत्तम गोष्ट घडोन आली. ज्या ज्या बी चि त्त भा व क सिद्धीतें पावतील हा चित्ताचा निशौं होऊन गेला. आतां भय परतें ठेऊन मानस आंनदोत्कर्ष पावलें. आपण वडील, क्षात्रधर्मसंरक्षणास्तव मुकुटमणी, भूतलवटीच्याठायीं अपर भानूच विराजले आहांत. तदुत्तर पातशहाची इतराजी आम्हांवरि विशेष जहाली. पुढें कांहीं तारणोपाय दिसत नाहीं. या अर्थाची विवंचना करीत आहों. पातशहा सर्वांचे खावंद हे प्रमाणताच. क्षात्रधर्मास अवरोध केला. म्लेंच्छमय धरा जहाली. अविंध उन्मत्त होऊन हिंदुधर्म बुडवीत चालिले. संपूर्ण पुण्यक्षेत्रें श्रीविष्णु व श्रीशिवस्थानें भ्रष्ट केलीं. गोवध तत्रस्थळीं करूं लागले. श्रीचीं देवालयें पाडोन अगदीं आपला अविचार चालवून मशिदी देवालयांच्या केल्या. ब्राह्मण भ्रष्ट करूं लागले. संपूर्णजन दक्षिणेत त्रास पावूं लागले. हें महा संकट श्रीभवानी शंकरास पडलें. तेव्हां धर्मरक्षणास मजला ईश्वरानें निर्माण केलें हा साक्षात् चमत्कार जहाला. श्रीअंबा व श्रीसदाशिव प्रसन्न होऊन मज हस्तकें यवनाचा पराभव करीत चालिला. दक्षिणेंत चार पादशहा अदलशहा विजापूरकर व हैदराबादेचा तानाशाह व बेदरकर व दौलताबादेचा बहिरी निजामशाह यांणीं केवळ अमर्यादाच केली. तैसेंच विजापूरकर पादशहानें अतिशयच पातक केलें. हिंदुधर्मरहित धरा करावी, वर्णसंकर मांडिला. याजकरितां वडिलांचे प्रतापें व श्रीअंबावरदें करून अफजलखान विजापूरचे पातशहाचा मातबर वजीर, कांहीं सामान्य नव्हे, तो ग्रासावयास एकाएकींच अ के तैं स्थळास धीटपणें चाळोन आला. त्याणें स्नेह न रक्षितां दुराचरणास प्रवर्तला ते समयीं अफजलास स्वहस्तें मृत्यु देऊन यमधामास पाठविला. तदनंतर दिल्लीश्वर औरंगजेब पातशहानीं शास्तीखान नवाबास अगणित सेना देऊन आम-

५१. निशा—खात्री. | ५२. 'संकेत' असतें तर बरें.

घा उपमर्द करावा म्हणोन पाठविला. तोही श्रीअंबावरदें शिक्षास्पद करून माघारा पाठविला. यास्तव अलंपनाहास विषाद येऊन तुह्मांस मोहीम सांगोन पाठविलें. आम्ही पादशहाचे दरबंदगीस अंतर करणार नाहीं. परंतु हिंदुधर्माची ईर्षा हिंदुराजे यांणीं टाकिली. हे पृथ्वीचें राज्य परागत त्रेताकृताद्वापारयुगापासून नीतिन्याय हिंदूच करीत आले. एतद्विषयींचा मानाभिमान तुम्हांस असावा. येविशीं हरोळी वडिलीं मजला द्यावी. येविशींचा अभिमान धरावा. म्हणोन बहुता रीतीं ऐसें पंडितरायासमागमें दिधलीं आणि मुखोत्तरेंही महाराजांनीं याचप्रमाणें सांगितलें व महाराजांनीं आपले निकटवर्ती भाषणश्रवणास्तव जिव्हाळियाचे दादाजी रघुनाथ प्रभु बुद्धिमंत यांसही समागमें दिधलें व अनुपदें संगीनात लोक देऊन रवाना केलें. ते लष्करा सन्निध गेले. हें वर्तमान समजतांच मिरजा राजियानें सेना समागमें घेऊन जाऊन भेटून परमादरें लष्करांत आणून डेरेस पंडितराव यांस नेलें. महाराजांचें परम ममतेनें आतुर चित्तें कुशल विचारिलें. पंडितराव यांनीं यथानुक्रमें संतोषवृत्त निवेदन केलें. महाराजांचीं पत्रें व वस्त्रें अलंकार हत्ती घोडे मिरजा राजियास नजर केले. ते पाहून परम संतोष जहाला. पत्र श्रवण करितां चित्त सद्गदित होऊन खुशाली केली. आणि कांहीं लडा न राखितां राजा बोलिला जे, आम्ही व शिवाजी राजे कांहीं भिन्न नाहीं. ऐसें प्रथमतः भाषण होऊन उदईक मनोदयानुरूप बोलणे तें बोलूं म्हणोन निरोप दिधला. आणि जैयसिंग राजे यांची भेटी घेणें म्हणोन सांगितलें. त्याजवरून त्यांजकडे जातांच सामोरा येऊन भेटी घेऊन पंडितराव यांस डेरियांत नेलें. बहुतां रीति सन्मान केला आणि महाराजांकडील कुशल वर्तमान स्वमुखें विचारिलें. बहुत समाधान पावला. पंडितराव यांणीं महाराजांचीं पत्रें व वस्त्रें, अलंकार, हत्ती, घोडे दिधले. त्यांचा राजियानीं परमप्रीति अंगीकार केला. नंतर डेरियास जाणेस निरोप दिधला.

तदनंतर दुसरे रोजीं पंडितराव उभयतां राजांचे दर्शनास गेल्यावरि मिरजाराजे यांणीं स्पष्ट सांगितलें जे, " दिल्लीपति औरंगजेब बादशाहा कांहीं सामान्य नव्हे. पृथ्वीपति सार्वभौम. याशीं स्पर्धा लाविलियानें राजियाचें बरें हरगीजें होणार नाहीं. या गोष्टीनें परिणाम लागतो कीं काय ? एतद्विषयीं स्वहित

५३. जयपूरचा राजा जयसिंग (पहिला) यासच " मिर्झा राजा " असा किताब होता. सवाई जयसिंग ( म्हणजे दुसरा जयसिंग ) हा या जयसिंगाचा नातु. हा औरंगजेबाच्या पाठीमागून गादीवर बसला. बाजीराव पेशवे यांस अनुकूळ होता तो सवाई जयसिंग. ह्या बखर लिहिणारानें मिर्झा राजा व जयसिंग सवाई असे दोन राजे पादशहानें पाठविले असें म्हटलें तें चुकीचें. " मिर्झा राजे जयसिंग " यांस पाठविलें असें म्हटलें पाहिजे होतें. ही चुकी त्याणें मागें व पुढें ही प्रत्येक ठिकाणीं केली आहे.

५४. हरगीज=सर्वथा, कोणत्याही प्रकारें.

काय पाहिलें ! याउपरि अनमान न करितां राजे यांणीं आपणा समागमें पादशहाचें दर्शनास दिल्लीस जावें. आम्ही घेऊन जाऊन मुलाकत करवितों. सर्व प्रकारें साह्य संपद्वारा होतों. अणुमात्र भय कोणेविषयीं नाहीं. जरि येविषयीं अंतर केला तरि श्रीठाकुरजीची आह्मांस शपथ असे." म्हणोन आपले हस्तें मिरजा राजियांनीं श्रीची पूजा नवविधा भक्तीनें करून तुळशी काढून पंडितराव यांचे हस्तकीं दिल्या. "आपला पुत्र रामसिंग तैसेंच शिवाजी महाराज. आम्ही सत्यवक्ते रजपूत क्रियावंत येविषयीं आम्हापासून बे-इमानी होणार नाहीं. पातशहांनीं कुटिलता चित्तीं धरिलिया लाख फौजेनिशीं पातशाहाजवळ प्राण खर्च होईल हा निशा मानून उदईक राजे यांनीं प्रांजल चित्तें भेटीस यावें. दुसरा अर्थ किमपि चित्तांत न आणिला पाहिजे. सर्वा गोष्टीनें पादशहापाशीं राजे याची उभारणी खामाखॉम करून तुम्हांस स्वराज्यास यावयास निरोप देववितों. तुमचा बहुमान यथायोग्य करवितों." म्हणून महाराजांस उभयतां रजपूत राजे यांणीं पत्रोत्तरें लिहून देऊन पंडितराव यांस वस्त्रे अलंकार देऊन निरोप दिधला. तदनंतर राजे यांसि भरजरी वस्त्रें व नवरत्नांकित अलंकार विविध प्रकारांतर व हत्ती घोडे व फिरंगा व तरकषें कमानी व चित्ते व शहॉगोष पाठविले. आणि पंडितराव यांस उभयतांनीं संपूर्ण मनोभाव चित्तांतील सांगितला जे, आजच भेटीस राजे यांसि घेऊन यावें, विलंबावरि घालवूं नये, आम्ही भेटीची मार्गप्रतीक्षा करितों. म्हणोन रघुनाथभट्ट पंडितराव यांस गुप्तरूपें निरोप राजे यांसि भेटीस आणावयाकरितां दिधला. ते समयीं उभतांस बहुतां प्रकारें बोध केला, "तुम्ही सर्वज्ञ शिखामणि हिंदू राजे म्हणवितां. क्षात्रधर्म शास्त्रमर्यादेनुरूप संरक्षण केलिया भूषणप्रदता आहे. येणेंकडून श्रीठाकुरजी तुमचें कल्याण पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें करील. अविंधानीं स्वधर्मअवरोध केला. श्रीकाशी व श्रीप्रयाग यमुना सरस्वती हीं महातीर्थे अविंधभयें संपूर्ण जनांचीं राहिलीं. अविंध दुष्ट अप्रमाद कर्मास प्रवर्तले. तुम्ही एतद्विषयीं पराक्रम अगदीं त्यागिला. यवनास वंद्यता करून सेवाधर्मास प्रवर्तलां ही भ्रष्टताच. या गोष्टीचा अभिमानच नाहीं. ऐसा प्रसंग घडलिया जीवित्व जगीं संरक्षण केलियानें त्रैलोक्यभुवनीं वंद्यता नाहीं. हा मानाभिमान चित्तीं समर्थानीं धरावा. याकरितां पुरुषार्थ धर्म कोणता, तुम्ही धार्मिक राजे महाप्रतापी सुज्ञ आहां, तेथें विशदें विनंतीची कारणता नाहीं. शिवाजी महा-

---

५५. खामाखाम=खचित, कांहीं झालें तरी.

५६. ग्रंथकाराची ही चुकीची समज. पूर्वी दर्शविली आहे.

५७. तर्कष=भाता (बाणांचा).

५८. कमान=शृंगाचें धनुष्य.

५९. शियागोष-कोल्ह्यासारखें काळ्या रंगाचें शिकारींत उपयोगी पडणारें जनावर.

राज तुमचें लेंकरूं आहे. कळेल त्याप्रमाणें साभिमान धरून कल्याण करणें आणि राज्यियापासून हिंदूधर्म भूतळीं चालीस लावणें. **शिवाजी महाराज** अवतारी. तुम्ही हिंदु राजियांचे कुळीं अपर भानू उदयातें पावलां आहां. *याचा लोप केलिया जगीं निंद्यता तुमचे विभागास येईल. त्याचे जिवास दगा जहालिया मग तुमचा §नामोश जाईल. आणि आपले वंशाचा क्षय तुम्हांपासून जालिया यावत् शशिसूर्य तावत्काल अभूषणता घडेल. **शिवाजी महाराजांनीं** तुमचे मांडीवरि शिरकमल ठेविलें आहे. प्राणदातेपणाचें सार्थक समर्थाजवळ असे. यदर्थीं श्लोकः—

अद्यापि नोज्झति हरः किल कालकूटं ।
कूर्मो बिभार्ति धरणीं खलु पृष्ठभागे ॥
अंभोनिधि र्वहति दुःसहवाडवाग्निं ।
अंगीकृतं सुकृतिनः परिपालयंति ॥ १ ॥
कूर्मावतारीं धरिलें क्षितीला ।
अंभोनिधीनें वडवानळाला ॥
समर्थ ज्याला धरिताति हातीं ।
त्या कारणें प्राणहि वेंचिताती ॥ २ ॥
शीवाजी नृपती सुनो तब असे सांभाळिजे संकटीं ।
येताहे बळिया समर्थ अवनीं अत्यादरें नीकटीं ॥
पाच्छाचें भय आगळें म्हणवुनी विज्ञापना आयका ।
इत्यादी वचनें कदापि प्रभुचीं कांहीं कशीं नायका ॥ ३ ॥
दिधल्या ठाकुरजी वरील तुळशी संकल्प होऊनियां ।
याचा हा अभिमान पूर्ण धरणें येणेंचि आहे जया ॥
मानूनी सुत रामसिंग प्रभुजी चित्तीं दुजें नाणिजे ।
क्रीया रक्षणता अशाच समयीं आखंडता हा किजे ॥ ४ ॥
श्रेष्ठांचीं वचनें सनेम असती बोलोनि गेला विधी ।
कीर्तीची गरिमा भरूनि उरवीं तूं एक अंभोनिधी ॥
मिर्जा भूपति धार्मिका विलससी चातुर्यचंद्रा सदां ।
शीवाजी नरनायकावरि दया कीजे प्रभो एकदां ॥ ५ ॥
श्रीरामें वर दीधला निजमुखें बीभीषणातें क्षणीं ।
दंडीतों रिपु रावणासि निकरें तत्काल पाहो रणीं ॥
लंकेचें तुज राज्य जाण दिधलें यावत् रवी चंद्रमा ।

---

* याचा=शिवाजीचा. | § नामोश=लौकिक.

श्रेष्ठांचीं वचनें सनेम प्रभुजी आखंड कल्पद्रुमा ॥ ६ ॥
मिर्जा भूपति तूं कृपार्णव जगीं श्रीरामचंद्रा परी ।
शीवाजी सरजा सुनू तव असे मानाभिमानाधरी ॥
कीर्तीचीं भुवनें भरोनि उरवीं सत्कीर्ति संपादिजे ।
येणें हा जय पावशील अगळा दातृत्व विप्रां दिजे ॥ ७ ॥

ऐशी पंडितरायांनीं साक्ष दिधली. यावरि बहुत समाधान उभयतां राजे पावले. पुन्हा शपथपूर्वक अभय देऊन रवाना केलें. तेथून निघाले ते किल्ले राजगडास येऊन महाराजांस सहविशदें वर्तमान निवेदन केलें. त्याजवरून संतुष्ट होऊन जागजागां गड कोटास ताकीद महाराजांनीं करून मजबुदी केली. तमाम लोकांस युद्ध करणें म्हणोन सांगोन पाठविलें.

तदनंतर इकडे उभयतां राजे यांचे गोटांत महाराजांकडील वकील आले ही खबर दलेलखान यास एकांतीं समजतांच मनांत परम कष्टी जहाला. शेवटीं हिंदु हिंदु एकत्र होऊन मिळाले. पादशाही कार्यास ढोम पाडिला. ऐसें म्हणोन दुसरे दिवशीं दलेलखान उभयतां राजे यांचे भेटीस आला आणि बोलूं लागला कीं, " उगेच कां बैसलां ! लष्कराजवळ कोंडाणा व पुरंदर हे दोन किल्ले आहेत. पुरंदर आम्ही घेतों, कोंडाणा तुम्ही घेणें. गड जेरीस आले म्हणजे शिवाजी राजाही सहजच येईल. " ऐसें बोलतांच मिरजाराजा बोलला जे, "किल्ले आले तरि बरें, नाहीं पेक्षां नामोस अगदीं जाईल. याजकरितां गडास उपद्रव लावूं नये. मुलूख काबीज करावा. किल्लेस सामान जाऊं न द्यावें. म्हणजे किल्ले सहजच येतील. " ऐसें बोलतांच दलेलखान रागानें उठोन चालिला आणि " आपण खुद जाऊन पुरंदर घेतों, तुम्ही कोंडाणा घ्याल तर घ्या, " असें म्हणोन डेरेस गेला. तदनंतर कूच करून फौजेनिशीं जाऊन पुरंदरास वेढा घालून, येलगार करून, खासा पाय उतारा होऊन, पांच हजार पठाण व पेंढारी, अडाणी, खळक वीस हजार लहान थोर पायउतारा होऊन गर्दी करीत चालले. तेव्हां किल्लेवरील नामजाद लोकांचा सरदार, महाराजांकडील मुरार बाजी प्रभु हजार माणसांनिशीं होते. त्यां खेरीज किल्लेचे लोक हजार होते. एकूण दोन हजार. त्यांमध्यें निवडक सातशें माणूस मुरार बाजी घेऊन खालीं उतरले. आणि दलेलखानावरि चालून घेतलें. त्याची फौज चहूंकडून चढत होती त्यांत शिरून मुरार बाजी यांणीं व मावळे लोकांनीं मोठी शर्त करून युद्ध केलें. पांचशें पठाण ठार जहाले. तैसेच रोहिले मारिले. खुद दलेलखान देवडी सोडून उघारा जहाला आणि लोकांस सांगोन एकदम गर्दी केली. त्यामध्यें साठ लोक पडले. ते समयीं मुरार बाजी [ याणें ] फिरंग घेऊन दलेलखानावरि चाल-

केली. तेव्हां तो बोलिला जे, माझा कौल घेणें. तूं मर्दाना शिपाई तुज नावाजितों. ऐसें बोलतांच त्यांणीं उत्तर दिलें कीं, मी शिवाजी महाराजांचा सेवक, तुझा कौल घेतों कीं काय? म्हणोन पुढें जाऊन खानावर वार करावा तों त्यांणीं त्वरा करून तीर मारून ठार केला आणि तोंडांत अंगुली घालून ऐसा शिपाई खुदा पैदा करितांहि ऐसें म्हणोन आश्चर्य केलें. त्याजबराबर तीनशें मनुष्य होतें ते ठार पडले. बाकीचे चारशें किल्लेवरि गेले. दिलेलखान शिरींची पगडी उतरून गड घेईन ते वेळीं पगडी घालीन ऐसा नेम करून किल्लेवरि चाल केली. आणि दरवाजाखालीं येऊन ढालांचा कोट करून बसला. किल्लेचे लोक मुरार बाजी पडला म्हणोन गणना न धरीन शर्तीनें लढूं लागले. एक मुरार बाजी पडला तरि काय जहालें! आम्ही ही तैसेच शूर मर्दाने आहों, ऐशी हिम्मत धरून लढतों.

हें वर्तमान महाराजास राजगडास समजलें. दिलेलखानांनीं लगट केला. मुरार बाजी तीनशें लोकांसहित रणास आले. हें कळोन महाराज चिंतातूर होऊन किल्ला दिलेलखान घेतो, तेव्हां वरकड आहेत तोंपर्यंत भेटून आपले हातानें देणें ते देऊन सल्ला करावा हें या समयीं उचित आहे. म्हणोन पंडितराव यांस मिरजा राजे यांजकडे पाठविलें कीं, आपण तूर्तच भेटीस येतों. म्हणोन त्याप्रमाणें त्यांणीं जाऊन उभयतां राजे यांस सर्व वृत्त श्रुत केलें. त्यांणीं उत्तम म्हणोन सांगितलें. नंतर शपथक्रियेची बळकटी केली आणि परत आले. नंतर महाराजांनीं पांच हजार माणूस निवडक बरोबर घेतले. तदनंतर श्रीशंभु व श्रीभवानीस द्वय करकमल जोडून त्रिकर्णचित्तें साष्टांग प्रणिपात केला आणि एक पदावरि उभें राहून सद्गदित चित्तें परम निदान जाणोन प्रार्थना केली ते श्लोकः—

हे शंभो करुणाकरा पशुपते भक्ताभिमानी सदा।
दासाचा अभिमान पूर्ण धरणें हें प्रार्थना जी पदां॥
द्यावें येश अम्हास जाण समयीं सत्कीर्तितें पाविजे।
शत्रू दंडुनियां प्रतापतवकें या संकटीं रक्षिजे॥ १॥
मालोजी मम पूर्वजावरि प्रभो आमोघ कीजे दया।
तूझा हा वर सर्वदा निशिदिनीं अर्पीतसें हो जया॥
दंडीं येचन हस्तकें मम सदा ठेवूं नको एकही।
पुण्याची अभिवृद्धितांच करणें संतुष्ट व्हावी मही॥ २॥
श्रीअंबे तुळजे कृपा करुनियां सांभाळिजे संकटीं।
धांवें या समयीं उदास नकरीं यावें दिना नीकटीं।

पाच्छाचे सदनाप्रतीच मजला जाणें असे एकदां ।
ऐसें हे घडलें कुटील कपटी दंडीं त्वरें दुर्मदा ॥ ३ ॥
शास्ता अफ्जल दंडिला तदुपरी निर्दाळिजे पच्छाहा ।
शिव सरजाप्रति रक्षणेंच जननी संपादिजे याशा ॥
मिर्जा हो जयसिंग मित्र मजला जाले अती ष्टीं ॥
श्रीअंबे सुदया करूनि चपलें यावें दिना नीटीं ॥ ४ ॥

तदनंतर सकल वेदशास्त्रसंपन्न वेदोनारायण समस्त ब्राह्मण अग्निहोत्री व शास्त्रज्ञ व ज्योतिषी व गणक व सिद्धांत वेदवक्ते व महापंडित व तपस्वी व दंडधारी संन्यासी व वेदाश्रमी जटिल गोसावी शेवडे[६०] जंगमी फकीर व मानुभाव यांसि महाराजांनीं साष्टांग नमस्कार करून अनुक्रम चरण वंदिले. समस्तांचे आशिष मस्तकीं घेतले.. तदुत्तर सकल सौभाग्यादिसंपन्न वज्रचूडेमंडित मातुश्री जिजाऊ साहेबांच्या महालास जाऊन चरणावरी साष्टांगेंकडून नमस्कार घातला. मातुश्रीनें परम सद्गदित चित्तें हृदयीं आलिंगून मस्तकीं दयाहस्त ठेविला. आणि सस्नेह चित्तें बोलून हृदयीं गहिंवर येऊन नयनीं अश्रुपात जहाले. आणि वरवचनीं मातुश्री बोलली जे, “ शिवाजी बाळ ! तुझें वय लहान. हा अर्थ चित्तांत आणून परमक्लेशसंगत सुरात होत आहे. हें निदान एकाएकींच तुज प्राप्त जहालें. अविंध परम कृतघ्न, दुरात्मे, करुणाहीन, यांचे भेटीस पुत्र चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांसि घेऊन दिल्लीस जातां या गोष्टी सामान्य नव्हेत. श्रीशंभु व श्रीअंबावरें यश संपवून आलिया पुन्हां भेटी शिवबा होतील. पुत्रमोहो कांहीं सामान्य नव्हे. शिवबा, तूं सर्वज्ञ, अवतारी, विक्रमोपराक्रमी, पंडुपुत्रातुल्य, तुझे गुण कांहीं इतरास येणें नाहींत. शिवबा, आपणास बहुत प्रकारें जतन करणें व संभाजी राजे यांसि औरंजेबाची भेट करवणें. समयोचित पादशाहाची अदब रखून स्वकार्य सिद्धीस नेणें. श्रीशंभु व श्रीअंबा व वडिलांचे पुण्य व तुझा पराक्रम सिद्धीस कुळस्वामिणी नेऊन तुजला यश अर्पण करील. कांहीं भय नाहीं. उभयतां राजे सत्यवचनी आहेत. ते तुम्हांसि अपकार अणुमात्र होऊं देणार नाहींत. लाखों फौजेनिशीं आपला प्राण खर्च करितील. ते हिंदु राजे परम धार्मिक क्रियावंत त्याज प्रमाणें निशा आहे. त्यांसि वडलांसमान मानून त्यांचे वचनांत राहून स्वकार्य सिद्धीस नेणें. याअन्वयें आईसाहेबांचे आशीर्वाद घेतले. ते समयीं आईसाहेब व शिवाजी महाराज व संभाजी राजे त्रिवर्ग मिळोन षड्स अन्न सुवर्णताटीं बैसोन भोजन केलें. नंतर अंचवून षोडशगुणी तांबूल सेविले. तदनंतर शिवाजी महाराज

६०. शेवडा नांवचा एक गोसाव्यांचा भेद आहे.

व संभाजी राजे यांसि आईसाहेबांनीं प्रसाद दिला. वस्त्रें दिधलीं. चिरा बादली
व भरगच्ची व साधी सुवर्ण तारांची चादर व पटका व किनकाफी, बुट्टेदार
सुरवार व झगा मंदि व अलंकार मोतियांचा तुरा व कलगी व शिरपेंच व
पदकें सुवर्ण मात्रा रत्नांकित कडीं व मुक्ताफळांच्या माळा पितापुत्रांस दिध-
ल्या. शिवाजी महाराजांनीं मातुश्रीचा [ निरोप घेतला. ]

निरोप घेऊन राणी वशांत आले. वडील स्त्री सकल सौभाग्यादिसंपन्न सईबाई
साहेब यांणीं महाराजांस हस्तीं प्रीतिनें धरून मंचकीं बैसविलें. षोडशगुणी तां-
बुलें दिधलीं, व पुढां भ जरी दुरुस्त आणून ठेविला. तैसेच अलंकार महारा-
जांस व पुत्रांस दिधले. आणि महाराजांस सद्गदित चित्तें विनंति केली
ऐसीजे, " महाराज, सर्वज्ञ सागर. सारांश आपणास बहुत प्रकारें व चिरंजीव
संभाजी राजे बावजीस सांभाळावें. एवढीच प्रार्थना. लेकरूं धाकटें आहे.
साहेब असतां एतद्विषयीं चिंता करणें ऐसें नाहीं. परंतु ममता विशेषें याचा
अर्थ जाणतच आहां. महाराज सावध राहून पादशाहाचा विश्वास न धरतां
बुद्धिवैभवाची प्रौढता दाखवून, यश संपादून, पुत्रासहित राज्यास अविलंबित
आलें पाहिजे. महाराज, तुम्ही अवतारी, परम पराक्रमी, ही कीर्ति चतुःसमुद्रव-
लयांकित धराभुवनीं रूढली आहे. परंतु औरंगजेब पादशहा कांहीं सामान्य
नव्हे. ज्याणें पटुतर प्रताप ... पादशाही किल्ले घेतले. प्रस्तुत तुमचेठायीं
आस्था धरिली आहे. परंतु तुम्ही अवतारी, श्रीअंबा महाराज सन्निध सार्वकाळ
आहे, तेथें पादशहा याची तमा धरितां असें नाहीं. बारीक बारीक गोष्टींचा
शोध करून अहर्निशी चित्तांत आणून अमित्राशीं यासमयीं स्नेह संपादून आ-
पली कांबू साधून तेथें न गुंततां महाराजांनीं स्वराज्यास यावें. पादशाहा याचे
कावेशींत न रहावें. मिरजा राजे व जयसिंग राजे यांसि अपरमित ममता ला-
वून कार्य संपादावें हीच प्रार्थना चरणाप्रति " ह्मणून निरोपसमयीं सईबाई-
साहेब [ यांणीं ] फार श्रमी होऊन अश्रुपात ढाळिले. तेव्हां महाराजही सद्ग-
दित जहाले. ममता मोह विचित्र तेणेंकडून गहिंवर आला; परंतु विवेकें सां-
वरून सईबाई साहेबांचें संबोधन करून आलिंगन दिधलें. सप्रिय होऊन
गौरव केला. वस्त्रें भूषणें महाराजांनीं अर्पिलीं. आणि तेथून महाराज निघाले.

संपूर्ण राजविलासाचीं साहित्यें नरवाहन पालखी व छत्रिया व चामरें व
आतपत्रादि बालव्यजनें व समीरपत्रें तदनंतर राजवाहनाचे घोडे सुमार कोत-
वाल दहा त्यांचीं नांवें-एक शंभुप्रसाद व एक भवानीप्रसाद व एक गोवर्धन
व एक राजहंस व एक तिजराव व एक चंद्रशेखर व एक नवरत्नमणी व एक

११. कावू-कार्यभाग!

श्यामकर्ण व एक मार्तंडप्रसाद. तदनंतर खासे वहानाचे हत्ती सुमार सात. एक पलखदंती व एक बालसुंदर व एक ऐरावती व एक गजराज व एक रा ज ष र्य व एक नरनाग व एक दलतुंदल व एक नंगी समशेर व तैशीच सेना. हत्यारें येणेंप्रमाणें: श्री तुळजा फिरंग व शंभुप्रसाद गुरदा व नागीण व एक गजबेल व एक मर्दाना स ही पा त वाघनखें बिचवा व खंजीर व नवरत्नांकित जमदाड व पट्टा जेनबी यशवंत व गेंडियाची ढाल व तरकष महाराजांनीं अंगीं घातलें. व कडेदार नरवरी जिरे चिलखत त्याजवरि सोनेरी बादली झगा. डोईस नरवरी बारीक तोडा व बादली मंदील व उंच बाराशें परांची कलगी व मोतियांचा तुरा व शिरपेंच, तदनंदर हुरमुजी मुक्त चौकडा व कंठी मोतियांची जडित लोलक सहित, तदुत्तर नाभिमंडळीं पदकें व नवरत्नांकित माणिक मुक्ताफलांसह वेष्टित व पदक मध्यभागीं वैडूर्याचा मध्यनायक व मुक्ताफळांच्या माळा व कटिमंडळीं जडित कडदोरा व हस्तकडीं जडावाचीं बाहुभूषणें रत्नांकित प दी प खा शेल किनकाफी बुट्टेदार भरजरी चादर सोनेरी व ली ग व चार्ची पल्लवीं मुक्तें सहवेष्टित, हस्तकीं भरजर मोतिलग रूमाल, भाळीं आडवें केशरी गंध व अक्षत कस्तुरीचे. याप्रमाणें महाराजांनीं पोषाख केला. आधींच बत्तीस लक्षणी परम सुकुमार श्री शिवावतारी शहानृपतनय श्रीमन्महाराज शिवराजेंद्र क्षितिपति दिव्य अलंकार अभिनव प्रभाकरन्यायें [प्रभा] झांकली. अन्य उपमाच नाहीं. जैसा अमरनाथ आकाशभुवनीं तैसा या भूतलवटाचे ठायीं नरचूडामणी क्षितींद्र शिवाजी महाराज दयावंत शौर्यकर्माचे ठायीं किरीटी किंवा कर्ण किंवा गांगेय तद्वत महा तेजस्वी विराजला. समागमें चतुरंग वीर भरजरी पोशाख व अलंकारयुक्त भारती वीरांसमान व पायदल मावळे लोक अलंकार व वस्त्र मंडित सपट बळोत्कर्ष हत्यारें फिरंगा, गुर्दे, तोमर, इ स पा, कत्या, कटार, भाला, बिचवे, जवडू इटे, पटे, बाणे, बंदुख, गारभांडीं, स इत्या, व बरच्या व भाले गुरगुज, य क ल्या, दुमदुमे, निमचे, कमाना, कांबिटे व ठाणपे, भिंडि-माळा, लोक बावरे दुजे बलोन्मत्त हस्तीच. गणती बाराहजार पायदळ. त्यांत निवडक पांचहजार. याप्रमाणें व राऊत निवड पंचवीस हजार समागमें मातबर शहाणेव कुळीचे. त्यांत धारकरी तीन हजार. येणेंप्रमाणें फौज घेतली. पंचवीस महालदार व चोपदार पंधरा तैसेच सेवेचे लोक मर्दाने पाहून समागमें घेतले.

[नंतर] मोरोपंत व अण्णाजीपंत व निळोपंत व नेताजी पालकर व प्रतावराव यांसि राज्य निरविलें. "बंदोबस्तीनें रक्षणें व गडकोट किल्ले जतन करणें. श्रीमन्महाराज मातुश्री आईसाहेबांचे आज्ञेत वर्तणूक करणें. हमेशा

आम्हांकडील दिल्लीची बातमी राखणें. बहुत सावधपणें असणें. आम्ही दिल्लीस गेलों म्हणजे अवसान न सोडणें. जें जें पराक्रमें राज्य साधेल तें वरचेंवरि वृद्धिंगत करणें. आम्ही कांहीं अवसान टाकून डगमगोत नाहीं. आमचा सबळपक्ष, हिंदु राजे साध्य संपदाद्वारा अनुपदें जह्मले आहेत, ते नेऊन बदलियानें पादशाहची तमा धरणार नाहींत. आम्ही ही रात्रदिवस सावध आहों. आमची चिंता न करणें. वरचेवरि आईसाहेबांचें समाधान सर्व गोष्टीनें करीत जाणें." म्हणोन महाराजांनीं पेशवे यांसि व समस्त लहान थोरांस आज्ञा करून मिरजा राजे व जयसिंग राजे यांचे भेटीस शिबिकारूढ होऊन सेना समारंभ घेऊन निघाले. जैसा [ इंद्र ] नंदनवनास चालिला, किंवा श्रीकृष्ण द्वारकाभुवनीं प्रवेशला, किंबहुना धर्मराज इंद्रप्रस्थासि चालिला, तद्वत् शिवाजी महाराज प्रतापसूर्य क्षितिपालक विक्रमोपराक्रम वाद्यगजरें चालिला. महाभेरी व नगारे व तुरतुरे कर्णे बाके शिंगें झल्लरी वाजंत्रें एक घाई लागली. नादें अंबर कोंदलें. उमज कांहींच पडेना.

शिवाजी महाराज रणकेसरी गर्जना करीत उभयतां राजे यांचे सेने समीप येतांच उभयतां सेनासंभारासहित परम आनंदोन्मत्तचित्तें महाराजांस सामोरां आले. पुढें हेजिबतीस रघुनाथभट्ट पंडितराव येऊन उभयतां राजे यांसि वृत्त निवेदिलें जे, महाराजांस घेऊन आलों. हें ऐकतांच उभयतां पंडितराव यांस संतोषें बोलिले जे, बहुत उत्तम गोष्ट जहाली. सन्निध महाराज ही गेले. तेही उतावीळ चित्तें पुढां चालोन आले. ते समयीं शिवाजी महाराज पालखींतून उतरले आणि हस्ताशीं हस्त मिळवून व कंठास कंठ मिळवून सप्रेम आलिंगन दिधलें. भेटी जहाली. ते वेळीं उभयपक्षीं वाद्यें सुरू जहालीं. तोफेची सरबत्ती जहाली. तदनंतर सारे लष्करांत शर्करा हस्तीवरून वांटली. ऐसा आनंद जहाला. तमाम लष्करचे लोक रजपूत रांगडे व बाजे लोक अमीर उमराव महाराजांस पहावयास आले. आणि पाहून, दख्खनका राजा बडा शिवाजीकी तसबीरसे जादा, असें बोलोन मोठे संतोषी जहाले. आणि एकास एक बोलूं लागले जे, "महाराजकी आजकी तसबीर श्री ठाकुरजीके समान. राजाजी तुमारा भला होगा. तुम हिंदु राजा महाप्रतापी." ऐसें म्हणोन समस्त समाधान पावले. तदुत्तर महाराजांस डेरियास नेलें. एकासनीं उभयतां आरूढ झाले. शिवाजी महाराजांस पाहून उभयतां राजे चित्तांत दंग जहाले आणि महाराजांची तारीफ बहुतां रीतीनें करूं लागले जे, "हिंदु धर्म या दक्षिणेंत प्रतापें रक्षिला. चारी पादशाह पदाक्रांत केले. औरंगजेब पादशहास रात्रंदिवस चिंतासागरीं पाडिलें. शाबास महाराज तुमची ! तुम्ही कांहीं येविशींची चि-

ता अणुमात्र न करणें. सर्वस्वें तुम्हांस आम्ही साधनसंपदेनिशीं अनुकूल आहों. तुम्ही कांहीं निराळे नव्हेत. सर्व अभिमान तुमचा आम्हांस आहे. या गोष्टीची खचीत चित्तांत दृढतर असों देणें. जैसा चिरंजीव रामसिंग राजा आमचा पुत्र, तैसे तुम्ही." याचप्रमाणें जयसिंग राजे बोलिले. त्या योगें महाराज अंतरीं समाधान पावले. तुम्ही आम्ही एक हमजात शिसोदे रजपूत, आर्धी आमचा जीवात्मा जाईल तेव्हां तुम्हांस बरें वाईट होणें तें होईल. महाराजांनीं निशा मानिला पाहिजे. तेसमयीं महाराज उभयतां राजे यांसि बोलिले जे, "आपण वडिलांसमान. मी लेंकरूं. वडिलांचे ठायीं दुसरा अर्थ असेल तरि श्रीभवानी शंकराची शपथ आहे. हें राज्य तुमचें. मीही तुमचा. वडिलांचे आज्ञेप्रमाणें आनंदचित्तें दर्शनास आलों. वडिलांचे मांडीवरि उसें आहे. या गोष्टीचा अभिमान धरून पुन्हा राज्यावरि स्थापना करावी. बिरुदाभिमान धरावा. पोटचें द्यावें परंतु पाठचें देऊं नये ही धार्मिकाची नीति आहे. वेदमर्यादानुरूप प्रवर्त आपण धराभुवनीं करितात. यास्तव माझें आगमन विश्वासें वडिलांनिकटीं जहालें आहे. आपले चित्तास येईल तो अर्थ केला पाहिजे. तुम्हांस जे किल्ले पाहिजेत ते देतों. बेवसवसा निशाणें किल्लेवरि चढवावीं. द्वैतार्थ किमपि नाहीं. परंतु या दक्षिणेंतील मुसलमानांस अणुमात्र यश देत नाहीं. हा माझा त्रिकर्ण चित्तें कृतसंकल्पच." असें महाराज बोलिल्यावरि उभयतां रजपूत राजे परम संतोष पावले आणि तेव्हां बोलिले जे, "दिलेलखान अरबी उमराव पादशहाचे परम मेहेरबानीचा आहे. त्यास तुम्हीं हातीं घ्यावें लागतें. आम्ही रजपूत एकास एक आप्त विषयीं तुम्हांसमागमें वजीर तोलदार देतों. तुमची खानाची भेट करून आणवितों. अणुमात्र फिकीर न करणें. तुमचें भारीजड संकट आपणास आहे. पन्नास साठ रजपुतांचीं पथकें व संगिनात फौज देतों." ऐसें ऐकून महाराज म्हणों लागले कीं, "मी शिवाजी आहें. मग दलेलखानाचा गुमान तो काय? तुमचे आज्ञेनें जातों आणि त्यास भेटतों." म्हणोन महाराजांनीं उभयतां राजे यांचा निरोप घेतला. तेव्हां उभयतांनीं सुभानसिंग आपला वडील मामा हा अस्कैरियाचा परम दारुण योद्धा, ज्यास जीवित्वाची तमा नाहीं, ऐसा महाबलिष्ठ योजून शिवाजी महाराजांसमागमें [ दिला. ] दलेलखानाचे सवाई तोलदार फौज घेऊन जाऊन भेट करवून महाराजांस संभाळून घेऊन यावें, तुमचे भरंवशावरि राजे पाठविले आहेत, ऐसें बोलून निरोप दिधला.

तदनंतर सुभानसिंग यांणीं आपले तोडीचे बहादर लोक शें सवाशें व याविरहित चाळीस हजार फौज समागमें घेऊन चालिले. दलेलखान पुरंदरचे

---

६२. अस्करा-लौकिक, कीर्त.

दरआनियाजवळ होता तेथें महाराज गेले. ही खबर पुढें त्यास कळविली जे, महाराज उभयतां राजे यांस भेटून तुमचे भेटीस येतात. हें ऐकून रोषयुक्त होऊन आपलीं मणगटें चाविलीं कीं, किल्लेचें यश आपलें गेलें. आपले विद्यमानें राजकारण नाहीं. रजपुतांस यश आलें. म्हणोन परम कष्टी जहाला. तों महाराज जवळ आले. दलेल उठोन पुढें येऊन परम रागें भरून महाराजांस आंवळून घटकाभर भेटला. तो मोठा बळकट जोरावार, एका रेडियाचें बळ किंवा ज्यास्तीच होईल, आणि जेवणारही तसाच. दोघां मनुष्यांचा आहार, सगळा एक पशु नित्य, व पक्का तीन शेर तूप व दारू पक्के दहाशेर; ज्याणें नालंडेबा पिळोन मोडून टाकावा, तैसेंच मोहोरा रुपये बोटानें चुरावे. असा प्रत्यक्ष हेडंब राक्षससमान. ऐसा थोर त्याणें आंवळून धरिलें. परंतु महाराज सवाई जोरावार, परम बळकट, सराईत म्हणोन गणना धरिली नाहीं. मग मिठी सोडून बिच्छायतीवरि एके लोडाशीं महाराज व खान बसले. दुसरे बाजूस सुभानसिंग लोडाशीं बसले. त्यांस खानानीं पुशिलें कीं, "महाराजके सात तुम आये.'? मग "हम आये" असें उत्तर दिलें. नंतर महाराजांस पुसों लागला कीं, केव्हां आलेत? त्यास उभयतां राजे यांची भेटी जहाली तदनंतर तुमचे भेटी करितां आतांच आलों." असें बोलल्यावर भला म्हणोन बोलिला. तों इतकेंत सुभानसिंग बोलिले जे, "महाराज आले, आतां पाहिजे ते किल्ले देतील. तुम्हीं वेढा काढोन उठोन गोटास येणें, ऐसा मिरजा राजे यांचा हुकूम आहे." ऐसें ऐकून बहुत कष्टी जहाला कीं, आपला मनोरथ सिद्धीस पावला नाहीं. "बरें साहेब सुभा आपले हुकुमांत येऊं, परंतु हा किल्ला उदईक घेऊन, निशाण चढवून येतों." ऐसें बोलतांच सुभानसिंग बोलिले कीं, "गड आपणाजवळ आला आहे. तुम्ही चला." त्याजवरून खान उतरून आपले गोटांत आला. चौकी गडाजवळ ठेविली. महाराजांस विडे देऊन पाठविलें. तुम्ही मिरजा राजे यांजपाशीं जावें. ते वडील आहेत जें करितील त्यांत आम्ही आहों." ऐसें बोलल्यावर महाराज व सुभानसिंग परत येऊन मिरजा राजे यांसि जहालें वर्तमान सांगितलें. तदनंतर मिरजा राजे यांणीं महाराजांस पंक्तीस घेऊन यथारुचि भोजन होऊन विडे जहाले. रात्र समयीं कित्येक बोलणें उभयतांचें जहालें. किल्ले अवघे देऊन पादशहाचे भेटीस दिल्लीस यावें असें म्हणतांच महाराज बोलिले जे, "आपल्या किल्ल्यांपैकीं सत्तावीस किल्ले देतों. पुत्र संभाजी राजे व आपण पादशहाचे भेटीस येतों. भेटी होऊन दक्षिणेचे पादशहा अदलशाह व कुतूबशाह व निजामशहा यांवर आपणास

६३. नालडबा=(घोड्याच्या) नालांचा जुडगा.

नामजाद करून पाठवणें. तिन्ही पादशाही फत्ते करून पादशहास देतों. त्यांतून निजामशाही त्यांणीं पूर्वीं फत्ते केलीच आहे. बाकी दोन पादशाही फत्ते करून देतो." तें उभयतां राजे यांणीं कबूल केलें.

तदनंतर पुण्याहून कूच करून चालिले. शिवाजी महाराजांनीं संभाजीराजे यांस राजगडाहून आपणाजवळ आणिलें. सत्तावीस किल्ले उभयतां राजे यांचे विद्यमानें पादशहाकडे दिधले. त्यांणीं आपलीं ठाणीं घातलीं. वरकड किल्लेकोट मोरोपंत पेशवे व नेताजीपालकर व निळोपंत मुजुमदार व श्रीमन्महाराज मातुश्री आई साहेबांचे हवालां केले. आणि चिरंजीवासह दिल्लीस पादशहाचे भेटीस जावें ऐसा करार महाराजांनीं केला. पुढें पादशहास खबर कळावी म्हणोन मिरजा राजे यांणीं आपला वकील रामसिंग शहाणा मनुष्य रवाना केला. त्याजबराबर महाराजांकडील वकील सोनोपंत डबीर यांचे मेहुणे रघुनाथपंत कोरडे यांस हुकूम देऊन रवाना केलें. त्यांजसमागमें अर्जदास्त लिहिली कीं, "आपण पादशहाचे भेटीस येतों. आपले हुकुमास हरगीज तफावत होणें की नही. इह किसान दुवागीर नेकनियत हजरत दुनियाके इनशाय है. ये बात मालूम है. हजरतने रोज बरोज मेहेर करना. ज्यादा लिखनेकू ताकत नही." अशाप्रमाणें लिहून पाठविली. तदनंतर मिरजा राजे यांजबराबर महाराजांनीं आपली फौज घेऊन विजापुराकडेस चालिले. मार्गीं चालतां चालतां महाराज व मिरजाराजे एक हौदियांत बसों लागले. तमाम वजीर येऊन सलाम करितात. दलेलखान न करी. यांचे कारण काय म्हणाल तर उभयतां एके ठायीं याजकारितां कसा करावा! याजकरितां तो येतच नसे. याप्रमाणें विजापुरास आले. तेथेंही सल्लाह मामला करून पुढें उभयतांनीं दिल्लीस जावयाचें, परंतु मिरजा राजे बोलिले कीं, "पादशाह बहुत हुन्नरवंत, काबू, छिनाला वे इमान आहे. तुम्ही आम्ही मिळोन गेलिया एखादे वेळेस दोघांसही दगा केला तरि काय करावें? आम्ही मागाहून पादशहाची मर्जी पाहत पाहत हळू हळू येतों. कांहीं दिवस औरंगाबादेस राहतों. तुम्हीं दिल्लीस जावें. तेथें आमचा पुत्र रामसिंग हुजूर आहे तोही तोलदार भिडेचा आहे. त्यास लिहून व बहुतां रीति सांगोन पाठवितों. तो आमचे वचनास तत्पर होऊन तुम्हांसि दुसरा अर्थ न करितां बंधुत्व चित्तांत कल्पून भारी अगत्य धरून पादशाहाचा तमा न धरितां हमखास पादशाहाची व तुमची भेट करील आणि रूबरू अर्ज पादशाहास करून कार्य सिद्धीस पाववील. कोणे गोष्टीचें संकट पडों देणार नाहीं. नहून बेतलिया जिवानिशीं खर्च होईल. हा निशा मानिला पाहिजे. बेमामसाच्या व बेइमानाच्या गोष्टी कदापि होणार नाहींत. म्हणोन सर्वथा दिलगीर

न होणें. तुमचे ठायीं आम्हांपेक्षां विशेष ममता करून विवेकें जुमस न खातां तुमचीं इच्छित मनोदयें सिद्धीस नेईल. संतोषरूप जावें. चित्तांत अणुमात्र चिंता न करणें. सर्व मानाभिमान मज पावला. पादशाहाची भेटी जहालिया-वरि सरंजाम करून घेऊन दक्षिणेस येणें. तुम्ही दिल्लीहून निघालेत म्हणजे आम्ही पादशाहाचे दर्शनास दिल्लीस जाऊं. तोंपर्यंत बाहेर आहों. या भिडेनें तुम्हांशीं पादशाहा बेइमान न करी." अशी तजवीज सांगोन चिरंजीवास पुढें सहविशदें मानाभिमानाचें शपथपूर्वक पत्र पाठवून घटाई करून मग महाराजांस रवाना केलें. महाराजांनीं लोक मर्दाने नामांकित पडला प्रसंग निभावीत असे निवड करून घेतले त्यांची नांवनिशी बितपशील:--

| कारकून असामी. | हुजरे असामी. | कित्ता असामी. |
|---|---|---|
| १. जीवराव शहाणा सुज्ञ. | १. हिरोजी फर्जंद. | लष्करी स्वार धारकरी |
| १. त्रिंबक सोनदेव यांचे पुत्र. | १. राघो मित्र. | नामांकित सुमार ६००० |
| १. दत्ताजी त्रिमळ. | १. दावलजी गाडगा. | मावळे लोक सुमार |
| १. माणको हरि सबनीस. | १. जिवा महाल्या. | ३०००. |
| ४ | ४ | |

यांसह वर्तमान महाराज राजगडास येऊन श्रीदेवाचें दर्शन व अनुक्रमें मातुश्री आईसाहेबांचें दर्शन घेतलें. तदनंतर राणीवासांत जाऊन विचारून निघाले. सर्व सेवकांस दर्शन देऊन राज्यसंरक्षणतेची आज्ञा करून ममता न धरितां मिरजा राजे यांचे लष्करांत दाखल जहाले. मिरजा राजे याणीं महाराजांपाशीं राजगडास जातेसमयीं शपथक्रिया घेऊन संभाजी राजे यांसि ठेऊन आले होते.

तदनंतर उभयतां राजे रजपूत यांचा निरोप घेऊन महाराज संभाजी राजे यांसह मजल दरमजल चालिले. समागमें पंचवीस हजार रजपूत व रोहिले व पठाण व उजबेग व मोंगल उभयतां रजपूत राजे यांणीं दिधले. तदुत्तर शिवाजी राजे भेटीस येतात हें वर्तमान पादशहास कळोन अदलशाही वजीर फौज सुद्धां व उमराव व महाल मोकासेदार यांसि ताकीद पत्रें पाठविलीं कीं, शिवाजी राजे भेटीस येत आहेत जेथें फौजेसहित मुक्काम होईल तेथें तेथील फौजदारांनीं येऊन भेटावें, घासदाणा शिवाय जो खर्च लागेल तो द्यावा, शाहाजादे याचप्रमाणें अदब चालवावी. ऐसेंच करीत मजल दरमजल दोन महिनेनीं दिल्लीस जाऊन पोहोंचले. राजे आले हें वृत्त श्रवण होतांच रामसिंग राजे पुढें पाठविले. त्यांची भेटी जहाली. रघुनाथपंत कोरडे पेशजी हुजीब पाठविले होते तेही येऊन भेटले. पादशाहाचें वर्तमान समाधान खुषीचें बाहेत्कारें सांगितलें. मनांत काय आहे नकळे, ऐसें बोलिले. रामसिंगांनीं स्वतंत्र शिवपुरा म्हणोन

नामाभिधान ठेवून वसविला. पादशाहाचे हुकुमें हवालीं घेऊन जागा उत्तम करून राहिले.

[नंतर] मुहूर्त पाहून पादशाहाचे भेटीस शिवाजी महाराज नरचूडामणि गेले. पादशहानीं सदर करून पांच हत्यारें आपणाजवळ ठेऊन कमरबंदी करून, अंगीं जरीचा दुपटा घालून, खासा औरंगजेब अलमपॅनाह पादशाहा तक्तारूढ जहाले. तैसेच जवळ मातबर धारकरी पिढीजाद मर्दाने जातिवंत पठाण उजबेक मोंगल व रोहिले व रजपूत आसपास दोन हजार माणूस उभें केलें. तैसेंच मर्दाने अमीर व कुली वजीर मुस्तेद करून उभे केले. मनांत विचार कीं, शिवाजी राजे सामान्य नव्हे. केवळ सैतान. बडे करामतका. घडीमे बिल्ली और बाग होता है, और पचास पचास हात जोरसे कुदताहे. अफ्जलखान हिम्मतवान् भुजबळ नबाब बडा वजीर भेट होतांच मर्दुमीनें [६७]अंगेजी करून वाघनखें पुरा करून शिर कापून नेलें. तैसेच गतीनें उडोन तक्तावरि आला आणि आपणांस एकाएकीं दगा केला तरि काय करावें ? ऐसा भयप्रदतेचा अर्थ चित्तांत पादशाहानीं समजोन मुस्तेद होऊन लोक सुद्धां बसला. पृष्ठिभागीं शाहजादे बहादरशाह फैजुद्दीन व अज्जमतारा व लालबर्क्ष व पिदारबक्ष हेही बहादर मुस्तेद होऊन बैसले. आणि शिवाजी राजे यांसि भेटीस बलाविलें. तेसमयीं महाराज व पुत्र संभाजी राजे यांणीं रणकंदनाचा पोषाख यथास्थित अफ्जल. भेटीचे वेळेस केला तदनुरूप करून समागमें कारकून व हुजरे भरंवशाचे दहा असामी व महाराजांजवळ हत्यारें फिरंग तुळजा व खंजीर बिचवा व वाघनखें याप्रमाणें होतीं. तैशींच संभाजी राजे यांजवळ पंच हत्यारें अलंकारसह भूषणें दैदीप्यमान रत्नांकित बहु मोलाचीं. महाराज अनुपदें राजंकुर सुतेज जयत्वें प्रभाकरप्राय विराजिले. महाराज अवतारी, उपमेस अवलोकितां अन्य नाहीं. यदर्थीं श्लोक:—

शीवाजी नरनाय भूतळवटीं वीराजला हो क्षिती ।
धैर्योदार्य हि धूर्तताच अगळी धार्मीकता हो निती ॥
पाच्छाची परवा नसे चि प्रभुतें भीमार्जुना सारिखा ।
देखोनी अवरंगजेब वदतो आला असे पारिखा ॥ १ ॥
आतां सावध जाण फार असणें ऐसें वदे पादशा ।
आहे तारक या घडीस मजला पाहो सखा ईनशा ॥

---

६५. अलम् पना=दुनियेचा संरक्षक.
६६. मुस्तेद=तय्यार.
६७. अंगेजी, अंगेजणी आंगचें धाडस, आंगची मेहेनत.
६८. "कामबक्ष" म्हणून एक औरंगजेबाचा मुलगा होता.

शीवाजी मज दीसतोचि नयनें प्रत्यक्ष तो केसरी ।
अफ्जलखावत हे गतीच घडती जानोच भाई बुरी ॥ २ ॥
पाच्छाची भृति फाटलीच चपळें देखोन राजाप्रती ।
बेमानी जरि केलिया इस घडी होईल शास्तागती ॥
जैसा व्याघ्रहि धांवतोच निकरें देखोनियां श्वापदा ॥
तैसा हा रिपु भासतोच मजला अन्यत्र नाहीं कदा ॥ ३ ॥

महाराजांस रामसिंग घेऊन गेले. पादशहाची व महाराजांची रुबरू एक नजर जहाली. पादशाहा बोलले जे, हेच शिवाजी राजे ? ऐसें म्हणतांच महाराज स्वमुखें बोलिले जे, "हजरत परवरदिगार मैंच शिवा शहाजी राजेका फर्जंद." असें प्रत्युत्तर समर्पक देऊन तीन तसलिमाती केल्या. आणि मनांत कल्पिलें कीं, एक तसलीम श्री शंभु महादेवास दुसरी श्री भवानीस तिसरी शहाजी महाराजांस. इतकेंत उजवे बाजूस जसवंतसिंग राजा नवकोट मारवाडचा त्याचे शेजारीं उभे रहावें म्हणोन हुकूम केला. तेथें उभे राहून रामसिंग यासि महाराजांनीं पुसिलें, आपणावरते शेजारीं हे कोण ? त्यांणीं सांगितलें कीं, राजा जसवंतसिंग. ऐसें ऐकितांच महाराजांस परम कोप आला कीं, या सारिख्या उमरावाच्या [७०] कोटी आमचे फौजेनीं पाहिल्या असतील. याचे खालीं आपण उभें राहावें म्हणजे काय ? ऐसें क्रोधें बोलिले आणि रामसिंग याचे मांजेस कटार होती ती घेऊन जसवंतसिंग राजे यांस मारितों म्हणोन मागों लागले. रामसिंग धीर धरणें म्हणोन बोलिले. ऐसे शब्द होतांच पादशाहास हा अर्थ समजला. आणि म्हणों लागले कीं हें काय जहालें ! तेव्हां रामसिंग यांणीं अर्ज केला जे, "शिवाजी राजे जंगल के हैवानें यासि गर्मी बहुत जहाली. तेणें करून परम काहिले जहाले." ऐसें ऐकतांच पादशाहाचे मनांत आशंका उत्पन्न जहाली कीं, यासमयीं काय होईल तें नकळे. म्हणोन रामसिंग यासि पादशाहा बोलिले कीं, राजे यांसि घेऊन डेरेस जाणें. उदईक सावकाशें मुलाकत होईल. ऐसें ऐकतांच राजे व राजपुत्र रामसिंग राजे यांचे लोक देखील हवेलीस गेले. त्यायोगें पादशाहास मोठा संतोष जहाला कीं, आजिचा अनर्थ चुकला. शिवाजी राजे यांचें भय होतें.

इकडे महाराज डेरियास आल्यावरि आपण व रामसिंग बैसोन बोलिले जे, हा कोण पादशाहा ? आम्हांस जसवंत राजे यांचे खालीं उभें करावें कीं काय !

---

६९. फरजंद=पुत्र.
७०. "पाठी" असेंही इतर ग्रंथीं आढळतें.
७१. माज=कमर.
७२ हैवान=प्राणी, जीव.

माझें स्वरूप पादशाहास समजलें नाहीं. तेव्हां रामसिंग बोलिले जे, तुम्हा भेटीसच येऊं नये. आले तरी रसरंग राखून निघोन जावें. स्वस्तिक्षेम जाणें झालें म्हणजे आम्हांस विशेष जोड प्राप्त जहाली. ऐसें सांगोन ते आपले हवेलीस गेले.

तदनंतर महाराजांनीं आपले कारकून बोलावून आणून विचारलें कीं, "पुढें तजवीज काय? कसें करावें? पादशहाची मजालस कळली. यश संपादून निरोप देत नाहींत ऐसें [दिसतें.] रघुनाथपंत कोरडे यांस सांगितलें कीं, तुम्ही पादशाहाजवळ उदईक जाऊन अर्ज करणें कीं, महाराजांची मनोगति आहे कीं, आपण निखालसपणें पुत्र देखील भेटीस आलों कीं दक्षिण कुल् अदलशाही व कुतुबशाही या दोन्ही दौलती घेऊन देतों. वरकड सुभे रवाना करितां त्यांची कामगारी पहावी. ऐशा कित्येक गोष्टी बोलून एकांतस्थानीं तपशीलवार श्रुत करणें. पादशहा खूष पाहून भेट घेऊन अर्ज करणें." ऐसें बहुतां प्रकारें उगवोन सांगितलेवरून दुसरे दिवशीं कोरडे पादशहापाशीं जाऊन येणेंप्रमाणें करीणा लिहून पाठविला. तो वाचून चित्तांत विकल्प धरिला. कोरडे यांणीं येऊन महाराजांस सांगितलें कीं, सबुरी करणें ऐसें पादशहा बोलिले. तेव्हां विकल्प ज्यास्ती दिसतो, समर्पक जाब दिधला नाहीं, असा तर्क महाराजांनीं केला. ते दिवशीं शास्तीखान व जाफरखान हे दिवाण पूर्वी शहाँजादा पादशहाचे वेळेस दिवाण होते तसे चालत आहे परंतु मुतालिकाहातें कारभार होत असतां कार्यभागास्तव जाफरखानास सांगोन पाठविलें कीं, शिवाजी बडा सैतान विद्यावंत बहुत करामत आहे. आपल्या गोटांत शिरला तेव्हां चाळीस गज जमीन हुन्नरवंतीनें उडाला. बळें कुँदोन बाँडींत आला. तैसें येथेंही करील. याजकरितां पादशहांनीं भेटीस येऊं देऊं नये. भेटीस नेला तरि चाळीस पन्नास गज उडाला म्हणजे दगा होईल. ऐसें सांगोन पाठविलें. त्याजवरून जाफरखानानें पादशहास वर्तमान निवेदन केलें ते समयीं पादशहा मनांत खोंचोन दरम्यान भारी विकल्प धरिला. दुसरे दिवशीं महाराजांस कळलें कीं, जाफरखानांनीं पादशहाजवळ गिल्ला केला. त्याजवरून कोरडे हेजीब यांस त्यांजकडे पाठवून भेटीस येतों म्हणोन सांगोन पाठविलें. त्यांणीं जाऊन कळविलें त्यांणीं ही बहुत वेळ तजवीज करून, बरें येऊं द्या म्हणोन बोलिला. त्याजवरून महाराज भेटीस गेले. बहुतां रीति सन्मान केला. व कितेक मजकूर आपले सरंजामाचा सांगितला. परंतु त्याचे

---

७३. 'शाहाजादा' शहाजहान असावा.
७४. कुदणें=उडी मारणें.
७५. बाड=तंबूच्या कनाथी.

मनांत आलें नाहीं. बहुत बरें म्हणोन उत्तर दिधलें. खानाची बायको ती शास्तीखानाची बहीण तिणें अंतर्गृहांतून सांगोन पाठविलें कीं, शास्तीखान व अफजलखान [यां] सारिखे मारिले. तुम्हांस शिवाजीची युक्ति न कळे. बडा हुन्नरवंत पैलवान आहे. निरोप सत्वर द्यावा. मग खान व दिवाण मनांत समजोन महाराजांस वस्त्रें अलंकार देऊन गौरवें निरोप दिधला. आणि पादशहास इसन्नाबें अर्ज करून सरंजाम करून देतों म्हणोन बाहेत्कारें बोलिला. महाराज आपले डेरेस आले आणि खान सुदा बोलिला नाहीं, जें श्री करील तें खरें, म्हणून राहिले.

तदुत्तर दुसरे दिवशीं पादशाहानीं पांच हजार स्वार व लोक व तो ब चीव पोलादखान कोतवाल पाठविला. तो येऊन हवेली वेढून राहिला. मग महाराज कष्टी होऊन संभाजी राजे यांस पोटाशीं धरून बहुत खेद करूं लागले. ते वेळीं निळोपंत व दत्ताजीपंत व त्रिंबकपंत यांणीं समाधान केलें. पुढें कार्य युक्तीनें करावें म्हणोन सांगितलें आणि बहुत चिंतातुर जहाले. तों महाराजांस निद्रावस्था होऊन श्रीअंबा स्वप्नीं येऊन साक्षात्कार जहाला कीं, " कांहीं चिंता अणुमात्र करूं नको. " म्हणोन अभय सकृप होऊन महाराजांस दिधलें. त्याजवरून समाधान जहालें. मग दुसरे दिवशीं नाना जिन्नस मेवे खरेदी आणवून वेळवावे कांबीचे पेटारियांत भरून, एक पेटारियास दोन मनुष्य मजूरदार लावून, दहा वजिरांस दाहा पेटारे रवाना केले. चौकीच्या लोकांनीं एक दोन पेटारे उघडोन पाहिले. बाकीचे न उघडतां जाऊं दिले. असा राबता आठ दहा दिवस लाविला. आणि आपले स्वार व लोक व कारकून यांस पळा म्हणोन सांगितलें. ते जागजागां वळखीनें गेले. कांहीं जवळ राहिले. नंतर एक दिवशीं आपण व संभाजी राजे दोन पेटारेंत व चार मेवेचे असे चालिले. आणि मागें आपला पोषाख हिरोजी फर्जंद यास देऊन पलंगावरि निजविला. हातमात्र उघडा बाहेर दिसों दिधला. आणि महाराजांचा शेला आंगावरि घालोन पाय रगडावयास एक पोर लाविला. दिल्ली आलीकडे तीन चार कोशांवरि एक गांव होता तेथें निराजीपंत व राघो मित्र मराठा अगोदर पाठविले होते. तेथें जाऊन त्यांसह रानांत बसोन विचार केला कीं, आतां जरि सरळ वाटेनें देशास जावें तरि पाठलाग होऊन जाणें होणें नाहीं. यास्तव दिल्ली पलीकडून वाराणशीस जावें. ऐसा मतलब करून महाराज व संभाजी राजे व निराजीपंत व दत्ताजीपंत व राघोमित्र मराठा असे पांच निघाले. वरकडांस मनास मानेल तिकडे जाणें म्हणोन निरोप दिधला. आपण अंगास राख लावून वैराग्यांचीं सोंगें घेऊन गेले.

तो दिवस गेलियारे दुसरे दिवशीं प्रहर दिवस आलेवर कोतवाल याचे लोक चौकीस होते त्यांणीं येऊन पाहिलें तों हात दिसतो. हे पाहून पोरास विचारलें जे, आज काय निमित्य निजले ? त्याणें उत्तर दिधलें कीं, शिर दुखतें. ऐसें ऐकून ते गेले. दोन प्रहरानंतर हिरोजी फर्जंद याणें उठोन घोंगडें चोळणा पागोटें घालोन, पोरास बरोबर घेऊन बाहेर आला आणि चौकीदारास रामराम करून जाऊं लागला. तों चौकीदारांनीं विचारलें कीं, आज बहुत वेळ निजणे-चें कारण काय ! त्यांणीं सांगितलें कीं, शिर दुखतें. याकरितां कोणी आंत जाऊन गडबड करूं नका. आम्ही सामान घेऊन येतों. असें सांगून दोघे बाहेर गेले आणि रामसिंग याचे गोटांत येऊन त्यास एकांतीं सांगोन तेथून निघोन देशाचा मार्ग धारिला. तदनंतर रामसिंग पादशाहाचे दर्शनास गेले आणि अर्ज केला कीं, "शिवाजी राजे आमचे मार्फतीनें आले होते त्यांस चौकी देऊन बंदोबस्त केला. याजमुळें त्यांचा इलाखा आम्हांकडेस कांहीं एक राहिला नाहीं." त्यांस पादशहांनीं उत्तर केलें कीं, ते आमचे सेवक, त्यांस सर्फरौजी करूं. त्यांची दरम्यानगिरी तुम्हांकडे नाहीं. तेव्हां त्यांणीं निरोप घेऊन डेरेस आले. नववे तासीं चौकीचे लोक म्हणों लागले जे, आज माणसांची हालचाल नाहीं. महाराज आजारी आहेत असें सांगतात, आंतून कोणी येत नाहीं. हें काय वर्तमान ! म्हणोन एक खोलीचे दारांत पहावयास गेला. तों पलंगावरि कोणीच नाहीं. हें येऊन पोलादखान यास कळविलें. त्यांणीं जाऊन पादशाहास वर्तमान सांगितलें कीं, "महाराजांस पहात असतां एकाएकीं गैब जहाले किंवा पळाले अगर जमिनींत घुसले किंवा असमानांत गेले हें कांहींच न कळे. किंवा गौडबंगाल विद्येकरून गेले. आम्ही रात्रंदिवस जवळीच असतां देखत देखतां दगा करून कोणते हुन्नरें गेले हें समजत नाहीं." हें ऐकून पादशाहास बहुत आश्चर्य वाटलें आणि अलमपनाह म्हणोन बहुत विचारीं पडले. नंतर कुल वजिरांस व फौजेस ताकीद करून अष्ट दिशेस दोन लक्ष साठ हजार स्वार रवाना केले. बावीस उमराव वजिरांस सांगितलें कीं, शिवाजीराजे मोठे हुन्नरवंत करामतवाले बलिष्ठ अंगिजीनें एखादे देशांतून जात असतील. तेव्हां अमीर व उमराव यांणीं अर्ज केला जे, शिवाजीपर ईनशा अल्लाहुतालाकी बडी मेहेर है. हमारा इलाज नही. उसके बराबर इस जैहाँनमें कोई नहीं. इस जमीनके पर्देपर एक शिवाजी बडा बावन्न पादशाहीको पालने वाला परवर दिगार नें पैदा किया हे. उसकी करामत वोही ज्याने. घडी मो बाग, घडी मो अदमी होता है. या कलीमध्यें मुसलमान काफर जहाले

७६. सर्फराजी नांवाजीस करणें. | ७७. जहान्=जग.

यांचा संहार करावयाकरितां रहीमनें पैदा केला आहे. तो पादशहास आटोपत नाहीं. पादशहा थोर सब् अलमके पालनवाले, याजकरितां बडे नियतसे इमान धरून आपला बेटा घेऊन आला असतां त्याचा गौरव न करितां एकाएकींच कैद करून चौकी ठेऊन कोंडिला. ऐसा प्रसंग करावयाचा नव्हता. ही पेशैंनदेशी केली नाहीं. त्याचा बहुतच सन्मान करून, शाहजादियांत गणोन, बहुमानें नांवाजून, दक्षिणेंत राज्यावरि रवाना करावयाचा होता. तसें न होतां बेमानीचा प्रसंग घडोन आला. या गोष्टीनें इतबार अगदीं उडोन गेला. भिरजा राजा व जयसिंग राजे यांस खांँभी आली. रामसिंग याप्रमाणें मानून ठाकुरजी वरील तुळशी काढून विश्वासानें दिधल्या. नंतर त्यांणीं ही पादशाही हुकूम ब र त र म्हणोन सारें राज्य व किल्ले कोट भिरजा राजे यांचे स्वाधीन केले आणि बडे इमानसे पुत्रास घेऊन आले. [ असें ] असोन अलमपनाहानीं उभयतां रजपूत राजे यांस यश दिलें नाहीं, तसेंच रामसिंग यांस फिके पाडिलें. ते रजपूत राजे सामान्य नव्हत. पादशहाचे रिपु. पादशाही हिंदूंची. बरजोर रजपूत राजे इमानास भ्रष्ट केले. जाफरखान दिवाण याची गोष्ट चित्तांत आणून अनर्थ घडविला. शिवाजीस बरा वाईट प्रसंग घडतां तरि पादशाही रजपूत घेते. यास संदेह नव्हता. बरें, होणार तें चुकत नाहीं. शिवाजी करामतवाला असोन सांपडलेला बरी हुन्नरवंती करून निघोन गेला आतां स्वराज्यावरि गेल्यानंतर कळेल. जैशी दक्षिणेंत अदलशाही व कुतबशाही व निजामशाही गत जहाली तशीच दिल्लीची होईल. ही खातरनिशा अलंपनाहानीं चित्तांत आणून परम खेद केला. आतां तुमचे इमानाचा इतबार अगदीं उडाला. बेमानी ठरली. शास्ताखान व वरकड वजीर गेले ते काय जय संपादून आले ! पुढेंही कठीण प्रसंग दिसतो. उभयतां रजपूत राजे यांसि शिवाजी पेशमान करितो. त्यांसही आपण फशीं पाडिलें. यामुळें तेही रुजू राहत नाहींत. आतां शिवा कैसा सांपडतो ? त्याजवळ मोहनी आहे. श्री अंबावरदें यवन कुलाचा संहार करावया परवरदिगारानें शिवाकू हुकूम केला आहे." ऐसें पादशहांस वजीर बोलिले. तें ऐकून पादशाहा चकीत जहाला. आपणापासून अंतर पडला. शिवाजी निखालस आपले पदरींचा गेला. रामसिंग राजे रजपूत दरम्यान असतां अनुचित गोष्ट घडली. ऐसियास शिवाजीस हयत्न करून शोधून आणावा म्हणोन पादशहांनीं वजिरास फर्माविलें. जंगम

७८. पेशन्देशी=दूरंदेशी, पुढील पल्ला पहाणें.

७९. खामी=नुकसानी कमीपणा.

८०. असें औरंगजेब बादशाहास सांगणारे कारभारी कोणी असतील असें वाटत नाहीं. आणि असले तरी त्यांस तो जुमानणारा नव्हता.

जोगी संन्यासि तापसी बैरागी नाथपंथी गोरखी फकीर ज फ लि बा न वा मलंग व ब्राह्मण [८१] शेवडे व चुडबुडे जोशी व पांगूळ व चितरकरी ड ब री व बहुरूपी, गोंधळी व गारूडी दंडधारी व परमहंस नानापरीचीं सोंगें शोध करून राजे वळखून कैद करून आणावे. ऐसी इशारत करून फौजा चहूंकडे रवाना केल्या. तमाम शोध करूं लागले. समस्त लहान थोर लोकांस यापरीचा विचार पडला. यदर्थी श्लोकः—

गाजी समर्थचि समर्थ नृपू शिवाजी ।
दिल्लीश्वरासि निकरें दिधलीच बाजी ॥
लावूनि चूर्ण वदनादिक नासिकाला ।
शिक्षा करूनि प्रभुजी चपळें पळाला ॥ १ ॥
भला मर्द तूं शीव सर्जाच गाजी ।
म्हणे पादशा दीधली आजि बाजी ॥
कसा या गतीनें निघालासि राया ।
तुला लोक मीं पाठवीले धराया ॥ २ ॥
जाणा बावन पादशांसि रिपु हा सर्जा शिवाजी असे ।
दिल्लीचा अवरंगजेब परितो सामर्थ्य त्याही नसे ॥
शाहाजीचा सुत भूतळीं विलसला आर्यप्रतापी सदा ।
दंडी तो अवघे [ हि ] येवन करें अन्यत्र नाहीं कदा ॥ ३ ॥
शीवाजी सरजा समर्थ नृपती भूमंडळीं आगळा ।
कीर्तीचे ध्वज लाविले निशिदिनीं आमोघ याची लिळा ॥
जाणा या अवरंगजेब रिपुला दंडील हा नीकरें ।
श्रीअंबावरदें जयासि वरितो संरक्षिल श्रीहरें ॥ ४ ॥
गेला हा शिवभूपती पळुनियां नाना गतीनें कसा ।
जाला विस्मित पादशाच हृदयीं अद्भूत ज्याचा ठसा ॥
सोडींना मजला असेंच दिसतें मारील जीवें म्हणी ।
दंडीले अवघेच येवन कसे जाणा प्रतापें रणीं ॥ ५ ॥

फौजा गेल्यानंतर पादशाहांनीं मनांत शंका धरिली कीं, राजा शहरांत कोठें गैब[८२] होऊन राहिला असेल. रात्रीं संधी पाहून आपणांस कोठें केव्हां तरी दगा करील. म्हणोन विचारांत पडोन जिवास भय पावोन बहुत सावध चौकी पहारा निकट ठेऊन पलंगावर जागृत असों लागला. मर्दाने लोक कमरबस्ता

---

८१. शेवडा—म्हणून एक बैराग्याचा प्रकार आहे.

८२. गैब=गुप्त.

करून रात्रंदिवस ठेविले. आणि जातीनें चिंताक्रांत होऊन राहूं लागले. कोणाचा इतबार अणुमात्र नाहीं.

पुढें राजे व राजपुत्र मजल दर मजल रात्रंदिवस चालोन मथुरेस गेले. त्यांसि मध्यें ओळखीचीं माणसें शोधितां कृष्णाजीपंत व काशीपंत व विसाजीपंत हे त्रिवर्ग बंधु, मोरोपंत पेशवे यांचे मेहुणे, यांची व निराजीपंत यांची ओळख होती. त्यांणीं जाऊन त्यांची भेटी घेऊन सविस्तर वर्तमान सांगितलें वरून त्यांणीं धीर धरून कबूल केलें. त्याजवरून त्यांचे घरीं संभाजी राजे यांस ठेवून सांगितलें कीं, देशीं राज्यावरि जाऊन पावलों म्हणजे तुम्हांस बलावणेस माणसें व पत्र पाठवितों. चिरंजीवांस घेऊन कुटुंबासह येणें. तुमचें सर्व प्रकारें ऊर्जित करूं. असें सांगोन त्यांचे बंधु कृष्णाजीपंत समागमें घेऊन वाराणशी गया प्रयाग यात्रा तुमचे वळखीनें करूं असें म्हणून वाराणशीस आले. तेथें गुप्त रूपें श्री विश्वेश्वराचें दर्शन घेऊन प्रयागास येऊन तेथील यात्रा करून गयेस आले. तेथें कर्ज घेऊन धर्मही बहुत केला. नंतर राज्यावरि जावें असें योजून नीट वाटेनें जावें तरि पादशाहाच्या फौजा शोधास गेल्या सबब त्या मार्गें जातां नये म्हणोन विचार करून गोंडवणांतून भागानगर व विजापुरावरून महाराज राजगडास आले. मार्गीं उदंड शोधांत अपाय होऊन दगाच व्हावा असें जहालें होतें. परंतु श्रीभवानीशंकरांनीं कृपाकरून स्वराज्यास आणिलें. निराजीपंत व दत्ताजीपंत व रावो मित्र मराठा ऐसे चौघे राजगडास आले. आणि दानधर्म बहुत केला. श्रीअंबेचा उत्साह संपादिला. शर्करा हस्तीवरून समस्त जनांस वांटली व मातबर सरदारांस व किल्यांस शर्करा पाठविली. महाश्रीदेवस्थानें व ऋषि ब्राह्मण व तपस्वी महापुरुष संत साधु यांसि दक्षणा व शर्करा पावती केली. व गडोगडीं तोफेची सरबत्ती करवून मोठा आनंद केला. तदनंतर श्रीअंबेचे दर्शनास जाऊन साष्टांग नमस्कार घालून हस्त जोडून त्रिकर्णाचित्तें प्रार्थना केली यदर्थी श्लोकः—

श्रीअंबे तुळजे कृपा करुनियां राज्यावरी आणिलें ॥
केला विन्मुख पाच्छहा मुढमती ह्या संकटीं रक्षिलें ॥
तूझा दास पतीत जाण जननी सांभाळिजे सर्वदां ॥
माझा हा अभिमान पूर्ण धरणें अन्यत्र नाहीं कदां ॥ १ ॥

ऐशी विनंतीभावें प्रार्थना करून मुक्ताफळांचे अभिषेक श्रीअंबेस घालून महाराज परमानंद पावले. तदुत्तर श्रीसकल सौभाग्यादि संपन्न महाराज मातुश्री आईसाहेबांचे मंदिरास जाऊन चरणावरि मस्तक ठेऊन सद्गदित चित्तें मातुश्रीस भेटले. त्यांहीं पोटाशीं धरून परम अक्रोध ममतातिशयेंकडून रुदन केलें. आणि

वचन बोलली जे, " शिवबा, आम्हांस टाकून वैरियाचे भेटीस गेलास. पादशहा महा कपटी, दुर्जन, दुरात्मा, बेइमान, नष्ट क्रूरता तुम्हांस चौकी देऊन कोंडिलें. प्राणनाश करणेंचा मतलब असतां श्रीअंबेनें स्वयें येऊन बा तुझी मुक्तता करून स्वराज्यावरि आणिलें. आजिचा दिवस शिवबा, आनंदाचा प्राप्त जहाला. या सुखास पारावार नाहीं. शिवबा, तूं गेलियावरि परम दुःखाचे दिवस अनुभविले. रुदन करीत अखंड बैसलों. यमाचे घरास तुझें जाणें जहालें. निराश मनाची शिवबा केली. औरंजेब महाकपटी, घातक, कृतघ्न, चांडाळ यासि करुणा नाहीं. शिवबा, तूं परम क्लेशातें पावलास. मोठे दुःखार्णवीं पडलास. श्रीअंबेनें दया करून आपण स्वयें जाऊन शत्रूतें मायामोह घालून फत्ते करून तुजला एक वेळ आणिलें. मजला पुत्रवती केलें." असें वारंवार स्मरोन नेत्रोदक न रहातां अचेतना प्राप्त जहाली. मग महाराजांनीं आईसाहेबांस स्वहस्तें उठवून सावध केलें. उदक आणून मुखप्रक्षालन केलें. तदनंतर आईसाहेबांनीं [८३]ईरीमिठी काढून कर्णीं बोटें मोडिलीं. आणि वारंवार पुत्रास चुंबन देऊन वलाय दूर केली. आणि पंचरत्नादिक कनकाभिषेक महाराजांस केला. एकासनावर बैसवून विचारलें जे, " शिवबा, प्राणाचा प्राण चिरंजीव राजश्री संभाजीराजे बाबांस काय अनर्थ घडला ? किंवा समागमें आणिला ? किंवा मागाहून येत आहे ? किंवा पादशहानीं मारिला ? कीं जित धरून ठेविला ! कोणती गति काय घडून बाबास आली ? "म्हणोन हृदय पिटून भूमीवर गडबडां लोळों लागलीं. " बाबा, तुझें वय धाकुटें, तुझे ठायीं सर्व ममता गुंतली, तूं प्राणाचा प्राणसखा. शिवबा, काय गति केली ? " तव्हां महाराजांनीं चरणावर मस्तक ठेवून चरणाची आण वाहिली व श्रीअंबेची शपथ वाहिली जे, " बाबा खुशाल आहे. कांहीं चिंता आणुमात्र न करणें. संपूर्ण श्रीभागीरथी यात्रा संपादून बाबा गुप्तरूपें ब्राह्मणाचे गृहीं ठेवून त्यास निर्वणूक करून आलों. चिंता न करणें. सत्वर स्वस्थळास येईल. " असें सांगतांच परम संतोष पावली. तत्क्षणीं दानधर्म अगणित मातुश्री साहेबांनीं केला. ब्राम्हणसमुदाय संतोषातें पावले. तदनंतर षड्रस अन्नें रत्नखचित पात्रांत घेऊन उभयतांनीं परमानंदें भोजन करून आंचवून षोडशगुणी तांबूल सेवून तेथून महाराजांनीं आज्ञा घेतली. आज्ञा घेऊन सकल सौभाग्यादि संपन्न मातुश्री सईबाई साहेबांचे महालास गेले. जातांच रत्नखचितपात्रीं पंचज्योतिदीपक प्रदीप्त करून महाराजांस ओंवाळिलें. हस्तीं धरून मंचकारूढ केलें. आणि परम श्रमी होऊन चिरंजीवाचें स्मरण करून फार शोक केला. ते समयीं महाराजांनीं

---

८३. ईरीमिठी काढणें=दृष्ट काढणें.

बहुतां प्रकारें समाधान धरून चिरंजीव क्षेत्ररूप ब्राह्मणांचे घरीं ठेवून आलों. पायउतारा फकीराचीं सोंगें घेऊन आम्हीं मार्ग टाकून आड मार्गानें [ आलों ] सकुमार [यास] पायउतारा कैसें आणावें ! पादशहानीं चहूं मार्गांस तीन अडीच लक्ष घोडा व खेरीज पायदळ बेमुबलग आमचे शोधास पाठविलें. तेथें प्राणहरणाचा प्रसंग, तेव्हां सारे मार्ग टाकून गोंडवणांतून चांदे देवगडचे मुलखांतून फकीराच्या रूपें पायउतारा ही येत असतां ठायीं ठायीं दगा होणेचा प्रसंग आला असतां श्रीअंबेनें कृपा करून स्वराज्यावरि आणिलें. बाबाजी सत्वरच येईल. अणुमात्र चिंता न करणें. म्हणोन सईबाई साहेबांचें पदोपदीं समाधान केलें. धैर्यत्वास एक कलियुगीं शिवाजी महाराज नरचूडामणि प्रताप आर्य अवतार मूर्ति या मन्वंतरीं कृतकर्म आगाध संपादिलीं. पुढेंही संपादनता करणार. ऐसे अनिष्ट प्रसंग अवतारादि मन्वादिकांस प्राप्त जहाले. एवढे श्रीरामचंद्र थोर त्यांस महासंकटें प्राप्त जहालीं. तेणें करून दुःखार्णवीं पतन जहाले. तैसेच पुण्यश्लोक राजे नैषध व हरिश्चंद्र, नहुषनंदन ययाती, धर्मराज तैसेच जरासंधादिक यांसही प्रसंग प्राप्त जहाले. याप्रमाणें महाराजांनीं, युक्तिमार्गें करून, [प्रसंग] घडोन आला म्हणोन सईबाई साहेबांचें मनोधारण केलें. तदनंतर राजमंदिरास येऊन समस्त मातबर लोकांनीं व सरकारकुनांनीं व गडकोटचे मामलेदारांनीं व सावकारांनीं दर्शनें घेऊन नजरा केल्या. आणि आनंदयुक्त होऊन शर्करा वांटिल्या. गुडिया व तोरणें बंधन केलें. द्वारीं कुंकुमाचे सडे रांगोळ्या घातल्या. सुमनें विखुरलीं. जयजयकार जहाला.

नंतर दिल्लीकडे वर्तलें वर्तमान जे, पादशहांनीं फौजा शोधास पाठविल्या. कोठेंही महाराजांचा शोध पडेना. चौकशी करूं लागले. तों कोणी पादशहास सांगितलें कीं, शिवाजीराजे यांचा पुत्र कृष्णाजीपंत व काशीपंत व विसाजीपंत यांचे घरीं आहे. म्हणोन त्यांचे घरीं चौकी पाठविली. आणि संभाजीराजे हजर करणें म्हणोन अटक जबरदस्त केली. तेव्हां काशीपंत बहुत शहाणा दैववान्, पादशहास महशूर, नामांकित, बहुतांचा स्नेही, त्याणें जाऊन अर्ज केला जे, महाराजांनीं अम्हांजवळ पुत्र ठेविला नाहीं व त्यांचा व आमचा परिचय नाहीं असें असोन काय म्हणोन चौकी पाठविली ? आमचे पुत्रास राजपुत्र म्हणोन जुलूम करितां हें ईश्वरास मानेल कीं काय ? माझा पुत्र सर्वां जनांस माहीत आहे. येविशींचा शोध करावा. अंतर पडलिया आमचें पारपत्य करावें. तेव्हां सर्व अमीर यांणीं व जाफरखानांनीं अर्ज केला जे, हजरत अलंपनाह ! तो पुत्र काशीपंत याचा हें प्रमाण. आम्हीं पाहिला आहे. ते समयीं पातशहांनीं नीर[४४]

---

४४. नीर=निकाल, तोडजोड.

काटिला जे आपला निशी व्हावा लागतो. त्याचा पुत्र असलिया पुढे घेऊन जेवावें. तेव्हां खातरी होईल. तेवेळीं काशीपंत म्हणूं लागले जे, येविशीं कोणी विश्वास द्यावा ह्मणजे जेवितों. ते समयीं पादशाहानीं मिरजाअल्ली पठाण व रहिमान गोरी सैद दिवाण, जाफरखानाचा भाऊ, मिरजा महंमद वगैरे हजर होते त्यांस पाठविलें. तेव्हां काशीपंत यांणीं दहीं पोहे केळीचे पानावर कालवून घेऊन उभतांनीं भक्षिलें. तें सर्वांनीं पाहून कळविल्यानंतर चौकी उठविली. पादशहाचा संदेह फिटला. मग स्वेच्छा पुत्रवत् संभाजीराजे यांस मानून सुखरूप राहिले. गुप्तरूपें प्रायश्चित्त घेतलें. संभाजीराजे यांस व्युत्पत्तीची विद्या सांगों लागले. सारस्वत अमरकोश व रघुवंश व सिद्धांतकौमुदी व मुक्तावली व आणखी व्युत्पत्ति ग्रंथांत संभाजीराजे यांसि प्रवीण केलें. बहुत चतुर जहाले. परकीय असें न लक्षितां मनोदयानुरूप मोह लळा चालवून सांभाळ पुत्राहीपेक्षां अधिक केला.

तदुत्तर इकडे महाराजांनीं राज्याचा बंदोबस्त करावयाची हिम्मत धरिली. आणि पैरवीस लागले. मोंगलांस सत्तावीस किल्ले दिले होते ते मागती घ्यावे. ही तजवीज करून मोरोपंत पेशवे व निळोपंत मुजुमदार व अण्णा दत्तो सुरनीस यांसि आज्ञा केली कीं, तुम्हीं राजकारण करून यत्नें किल्ले घेणें. मावळे लोकांस आज्ञापिलें कीं, तुम्हीं गड घेणें. त्याजवरून तानाजी मालुसरा वरिष्ठ हजार लोकांचा सरदार, कांहीं सामान्य नव्हे, ज्याचा धाक हबशियास व कुडाळकर खेम सावंतास, कोळवणचे राजे यांस वगैरे लोकांस मोठा भारी, पुंड समशेरबहादर, सुदृढ, बळाधिक्यता अधिकोत्तर, दिग्गज पुरुष, त्याजसमागमें विलोकावयास दुसरा नाहीं. सराईत व दांडाईत व पटाईत सर्व शस्त्रांचे घडामोडींत प्रवीण, रूप पहातां भयानक, भीमसेनाचे उपमेस योग्य, जनवाक्यें स्मश्रू पिंगटा, मदारकटिबंध ग्रंज कन्याधत्रप्राय व नेत्र आरक्त स्फुल्लिंगें तांबडीं, मिशा हस्तदंडप्राय मोठ्या व लंब, मिशांवर उभयभागीं लिंबें वर्तुळ ठेवलिया अचल विनाचल रहात, तसें मस्तक प्रचंड बळोन्मत्त जसे प्रत्यक्ष द्विरदच, हस्तीचा तमा ज्यास नाहीं, हस्तीचे दोन्ही दंत धरून उभा करावा. ऐशी बळाची निःसीमता. तानाजीराव ज्या फौजेंत असलिया सहस्राचे सहस्र लोकांनीं भयेंकरून पलायन संपादावें. समरीं भयेंकडून कोणीं न टिकावें. त्यास विलोकून कंपायमान होत असावें. असत्य सर्वथा नाहीं. महाराजांची परम कृपा तानाजीवर. संपूर्ण सत्तावीस मावळें महाराजांस हस्तगत करून दिधलीं. यदर्थीं श्लोकः—

---

८५. निशा—खात्री.

८६. सत्तावीस मावळें कोणतीं? मागें बारा मावळें असें एकदां आलें आहे.

तानाजी मर्दगाजी समरिं अरि सदा भीत होताची जाणा ।
दोर्दंडे दंडिताहे अभिनव गरिमा घेतसे शीघ्र प्राणा ॥
यालागीं शीवराजें निवडुनि चपळें लोभ केला अपार ।
शौर्यत्वें कीर्ति झाली अगणित भुतळीं सेवकांमाजि थोर ॥ १ ॥

तानाजी म्हणजे महाराजांचे हृदयावरील पदकच ऐसें मानून कृपेस पात्र केला आणि किल्ले कोंडाणा घेणेंची आज्ञा करितांच कबूल करून पैजेचे विडे उचलून चालिला. तेसमयीं महाराज परम संतोषप्रद होऊन भरजरी वस्त्रें, मंदील, व चादर मोरांची भरगची कुसुंबी व सुरवार, इजार किनखापी, झगा बादली भरजरी व चौकडा मोत्यांचा व सोनेरी मुलामेचा पट्टा व ढाल याप्रमाणें दिलेवरि महाराजांचे चरणावरि मस्तक ठेवून आज्ञा मागितली. महाराजांनीं यशस्वी हो म्हणोन मस्तकावर हस्त ठेविला. फत्ते करणें म्हणोन बोलिलेवरि त्यांणीं अमृत वचनाची गारी पल्लवी बांधली आणि पांचशें माणूस मर्दाने मावळे लोक निवड करून रात्रीं गडाखालीं जाऊन कड्यावर वानरन्यायें वेगें करून गुप्तरूपें किल्लेवरि जाऊन माळ गडास लावून वरते लोक चढविले. ते लोक तीनशें आलेचें वर्तमान उदयभान रजपूत वर होता त्यास समजतांच कंबरबस्ता करून हिलाल व चंद्रजोती लावून बाराशें माणसें व तोफा तिरंदाज व बरचीवाले व सांगा व बरचीवाले व बाणे व पटाईत व इटेकरी व बंदुका खेरीज पायलोक ढाला हातास चढवून चालोन आले, तेसमयीं मावळे लोकांनीं श्री हरहर महादेव ! ! स्मरण करून नीट धीट होऊन रजपुतांचे फौजेवरि चालोन घेऊन मोठें युद्ध एक प्रहर जहालें, पांचशें रजपूत ठार पडले. उदेभान किल्लेदार याजवर तानाजी खुद्द जाऊन दोघांचें युद्ध परम शूरत्वें हिंमतमानें[८७] एकावर एक चालोन आले. तानाजीची ढाल तरवारीचे वारानें तुटोन गेली. समयास दुसरी पोंचली नाहीं, मग हातास शेला गुंडाळून त्याजवर वार वारिले. घोरंदर जिवाची तमा न धरितां मारामारीस पेटले. बहुत निकराचे युद्ध जहालें. एकमेकांचे फिरंगेचे हात परस्परें लागू जहाले. तेणेंकडून दोघेही ठार पडले. रक्त मुसंडे वाहूं लागले. दोघेही वीर सामान्य नव्हेत. भारती वीरांप्रमाणें शौर्यत्वाचे. एक ईश्वरानींच पाहवे. त्यांची साक्षा त्यांसच, इतरांस योग्य नाहीं. यदर्थीं श्लोकः—

तानाजी मर्द गाजी समरिंच अरिला मारिला नीकरानें ।
ऐसा हो जाण योद्धा अघटित करणी अर्पिली श्रीहरानें ॥
मेला हो स्वामिकार्जी म्हणवुनि मघवें मान्यता यासि केली ।

---

८७. हमतमानें=ईर्षेनें.

शाहजीच्या सूनुभृत्यांमधि भुतळिं या कीर्ति विस्तीर्ण झाली ॥ १ ॥

तानाजी पडलियानंतर त्याचा भाऊ रायाजी यांणीं भारी हिम्मत धरून, सर्व लोक सांवरून, रजपुतांवरि एकंदरीनें उठोन कित्येक रजपत मारिले व कित्येक पळून गेले. ऐसें सर्व माणूस मारून किल्ला काबीज केला. आणि तेथें पागा होती तीस अग्नि लाविला. तो उजेड महाराजांनीं पाहिला. जातेसमयीं लोकांस संकेत केला होता कीं, किल्ला घेतांच अग्नि लावून उजेड करणें. त्याजवरून किल्ला घेतला असें महाराज समजले. इतकियांत खरी बातमी जासूद घेऊन दुसरे दिवशीं आले आणि "तानाजीनें युद्धाची मात केली, जिवाची आशा अणुमात्र धरिली नाहीं, किल्ला घेऊन उदेभान यास जिवें मारिला आणि आपणही ठार जहाला, फत्ते केली." असें सांगतांच महाराज म्हणों लागले एक गड घेतला परंतु तानाजी गेला याजकरितां बहुत श्रमी जहाले. ऐसा हत्ती माणूस पदरींचा तुटला. तानाजी सारिखा मनुष्य कांहीं सामान्य नव्हे. अनुचित श्रीईश्वरें गोष्ट केली. पुढें किल्लेवरि बंदोबस्त केला. आणि रायाजीस वस्त्रें भूषणें देऊन नांवाजून तानाजीचा सुभा सांगून, धारकरी लोकांस बक्षीस सोनेचीं कडीं व द्रव्य व वस्त्रें, चिरें, मंदील व सकलादा व ताडपदरी पासोड्या व पैठणी चादरा, शाला व दुपेटे व शेले व नवरंगीत याप्रमाणें दिधले व तोडे व फिरंगा देऊन नांवाजिलें. समाधानें सर्व लोकांचीं केलीं. प्रथम कोंडाणा घेतला. पुढें मोरोपंत पेशवे व निळोपंत मजमदार व अण्णाजीपंत सचिव व मावळे लोकांनीं एक चित्तें मिळून सव्वीस किल्ले लढोन घेतले व कांहीं अंतर-भेदें घेतले. ऐशी खस्त मेहनत करून चहूं महिनेंत फत्ते केली व राज्याचा बंदोबस्तही करीत चालिले.

तदनंतर मथुरेस पत्रें देऊन माणसें पाठविलीं. नंतर काशीपंत व विसाजीपंत यांणीं कुटुंबसहित संभाजीराजे यांस जानवें घालून धोत्रें नेसवून भाचा म्हणून घेऊन राजगडास आले. राजदर्शन जहालें. पितापुत्र भेटले. मोठा आनंद होऊन महाराजांनीं दानधर्म फार केला. ब्राह्मण संतर्पणें जहालीं. कृष्णाजीपंतसह त्रिवर्ग बंधूंस विश्वासराव हे किताब देऊन हस्तीरूढ करून मिरविलें. त्रिवर्गांस वस्त्रें भूषणें दिलीं. नंतर लक्ष होन बक्षीस दिधले. तिघांस दहा हजार होन तैनात करून मातबर लोकांत असामी घातली. नांवाजून महाल मोकासे देऊन ठेविले. तैसेंच निराजीपंत व दत्ताजीपंत व राघो मित्र मराठा यांणीं महाराजांसमागमें महासंकटीं बहुत श्रम सायास केले जिवाभ्य क्लेश

८८. "रायाजी" बद्दल "सूर्याजी" असें अन्यत्र आढळतें. तेव्हां रायाजी असें सूर्याजीस म्हणत असत कीं काय?

अनुभविले. याजकरितां महाराजांनीं तें चित्तांत समजोन नीतिन्याय जाणते चतुर चवकस निजामशाही ब्राह्मण यांस न्यायाधिशी हुद्दा सरकारकुनीचा सांगितला. जितकी राज्यांतील न्याय मनसुबी तितकी यांणीं करावी. त्यांचे पुत्र प्रल्हादपंत हा मोठा मनुष्य भारी थोर होईल ऐसें महाराज बोलिले. दत्ताजीपंतास हुद्दा काय सांगावा ऐशी तजवीज महाराजांनीं करून, गंगो मंगाजी वाकनीस होते ते दैवगतीनें मृत्यु पावले, त्यांची वांकानिशी यांस सांगितली. वस्त्रें भूषणें देऊन गौरविलें. ज्या लोकांनीं समागमें श्रम साहस केले व नानाप्रकारें सेवा करून महाराजांस प्राण नजर केले, मागें पुढें पाहिलें नाहीं, त्यांजला कृपाकरून नांवाजिलें.

नंतर महाराजांनीं आपले पालखी समागमें चांगले मर्द माणूस घरंदाज नामांकित निवडक असावे, आपण चहूं पादशहांचे दावेदार, एखादे वेळेस प्रसंग पडतांच जवळ असतील तेच कार्याचे समयीं कामास येतील, ऐसें जाणोन मावळे लोकांची पहाणी करून निवडक पतकें केलीं आणि नांवें ठेविलीं तीं बितपशील. शंभर लोक व साठी लोक व चाळीस लोक व तीस लोक. ऐशीं ठेऊन पुढें खासे मर्दानें ऐशी भरती करीत चार पतकांस दोन हजार [ केले ] त्यांतही कांहीं बंदुखी व कांहीं इटेकरी व कांहीं अडाव हत्यारी ढाला, फिरंगा, ऐसे जवळ ठेविले. तितुकिया लोकांस डोईस मंदील, अंगांत सकलादी दुदू, हातीं सोन्याचीं कडीं व कोणास रुप्याचीं व तरवारीस अबनाल व तेनाल सोन्यारुप्याचीं, याखेरीज स्वारी शिकारीस बराबर बारा हजार पायचे व मातबर लोक धारकरी तैसेंच शूर पागा व शिलेदार याप्रमाणें बंदोबस्त करून हुकमतींत वर्तो लागले. बाजे मुलुखांत कौलाप्रमाणें टका घेऊन रयत वर्तविली. मोंगलाईमध्यें गैरकबजी मुलूख होता तेथें मोठमोठीं शहरें त्यांत द्रव्यवान् साहुकार पाहून पालती ठेवून बळें त्यांस कैद करून आणावें हा इत्यर्थ करून रांयाजी पालकर स्वारीस गेले होते त्यांस येणेंविशीं तावडतोब पत्र देऊन जासूद रवाना केले. काम नाजूक आहे म्हणून. परंतु आज्ञेअन्वयें त्वरेनें आले नाहींत. हें जाणोन त्यांस तलबें करून हुजूर आणिला आणि समयास आला नाहीं म्हणोन शब्द ठेवून सरनोबती दूर करून राजगडचा सरनोबत कडतोजी गुजर होता त्याचें नांव प्रतापराव ठेवून कृपाकरून सरनोबती दिधली. ते सरनोबती करीत असतां

---

८९. अबनाल, तहनाल=म्यानाचें वरचें व खालचें अडकवण

९०. "नेताजी पालकर" असें अन्यत्र आढळतें. नेताजीस पन्हाळयाचा उपराळा करण्याबद्दल निरोप गेले असतां वेळेस पावला नाहीं म्हणून दूर केलें.

९१. तलब=आकर्षपत्र, पकडसमान, वारंट.

शहाण्णवं[१२] कुळींचे मराठे मेळविले आणि पागेस घोडीं खासगत करून पागा सजित चालिले. तैसेच शिलेदारही मेळवून जमाव पोख्ता केला. चहूं पादशाहींत दावे[१३] लाविला. आणि दिल्लीहून पितापुत्र आपले देशास येऊन चार महिनेंत सत्तावीस किल्लें घेऊन मोठी खस्त केली.

हें वर्तमान औरंगजेबास कळोन चिंतातुर होऊन आपला पुत्र शाहा अलम वडील त्यास बोलावून आणून कित्येक विचारें राज्यकारण सांगून त्यास फौजेनिशीं रवाना करून सांगितलें कीं, " शिवाजी जोरावारीनें हातास लागणार नाहीं. तुम्हीं जाऊन औरंगाबादेस रहाणें आणि सल्लाह ममता राजेयांशीं करून बहुतां विचारें त्यांचें सख्य करणें आणि भेटीनंतर दौलत त्यांचे नांवें अगर तुमचे नांवें देऊन त्यांची फौज चाकरीस आपणाजवळ आणवणें. त्यास मोकामा मुलूख पैसा वांटणी जे पाहिजे ती देऊन शिवाजी राजा आपला वजीर करणें आणि सल्लाह केला एवढें यश घेणें. म्हणजे सर्व फत्ते जहाली." म्हणोन बुद्धिवाद सांगितला. साठ सत्तर हजार फौजेनिशी निघाले ते मजल दरमजल करीत येऊन फौजसुद्धां औरंगाबादेस राहिले. आणि महाराजांकडे पत्रें जासूद व हरकारे हेजीब पाठविले. त्यांणीं सल्याची गोष्ट जाणविली. त्याजवरून महाराज परम संतुष्ट होऊन रघुनाथपंत कोरडे यांस पाठविलें. त्यांजसमागमें जडजवाहीर वस्त्रें पाठविलीं. त्यांणीं जाऊन शाहाजादा याची भेट घेतली. त्यांणीं बहुत सन्मान केला. एकांतीं कितेक गोष्टी बोलिले कीं, " राजे व आम्ही भाऊ एकचित्तें राहून भेटीसही न येणें हें अपूर्व दिसतें. तुम्ही पादशाहास रुजू[१४] असणें व मुलुखांत धामधूम न करणें. संभाजी राजे यांस हफ्तेहजारी[१५] दौलत द्यावी, पंधरा लक्ष होनाची जहागीर मुलूख वऱ्हाडदेश व बाजे देश द्यावे." ऐसें बोलोन कोरडे यांस वस्त्रें व द्रव्य व घोडा देऊन रवाना केलें. आणि राजे यांसही वस्त्रें भूषणें व पत्रें देऊन रवाना केलें. ते परतोन राजदर्शनास आले दर्शन घेऊन वस्त्रें भूषणें व पत्रें प्रविष्ट केलीं. महाराज परम समाधान पावले. पत्रांचा जाब लिहून दिधला. दौलतीचा मजकूर अवघा कळला.

त्यानंतर महाराजांनीं विचार केला कीं, आपणांस विजापूरचे पादशाहाचा दावा दुसरा निजामशाहीचा दावा तिसरा मोंगलांचा हे तीन दावे सोसवत नाहींत. राज्य आपलें नवें त्यांत दोन तीन चपेट होऊन बहुत हलाक जहालों आहों.

---

१२. शाण्णव कुळी--सूर्य–चंद्र–शेष--ब्रह्म असे चार वंश. प्रत्येक वंशांत २३।२४ मिळून ९६ कुळ्या.

१३. दावा लावणें=भांडणे.

१४. रुजू असणें=पादशहाचें वर्चस्व, ताबेदारी कबूल करणें.

१५. हफ्त-हजारी=सप्त–सहस्री.

त्यास एक शत्रु तरी मित्र करावा. आणि वर्षे दोन वर्षे बळ धरून भाँवरून जें कर्तव्य तें करावें. असें ठरवून सरनोबत यांजबराबर पांच हजार स्वार देऊन समागमें निराजीपंत सरकारकून दिधले. व मुतालीक मजमदाराचे व सुरनिसचे दिधले. प्रल्हाद निराजी यांस लष्करची सबनिशी सांगितली. मुकासा मुलूख देतील त्यास सुभेदार रावजी सोमनाथ समागमें देऊन पाठविलें. मोंगलांशीं सल्लाह केला. संभाजी राजे यांचे नांवें हफ्त हजारी मनसब कबूल करून ते औरंगाबादेस गेले. शहाजादे यांणीं बहुत सन्मानें भेट घेऊन स्वतंत्र जागा दाखवून वेगळा पुरा बसविला. हत्ती घोडे व जहागीर वस्त्रें सर्वांस दिधलीं. वऱ्हाड देश पंधरा हजार होनांचा नेमून दिधला. तेथें रावजी सोमनाथ ठेविले. याखेरीज हुजूर वांटणी पैसा टक्का बहुत लोकांस पावोन खुशाल राहिले. दिल्लीस ही खबर लिहून पाठविली. त्याजवरून पादशाहा बहुत संतुष्ट जहाला कीं, शिवाजी राजे यांसि सल्लाह जहाला. याउपरि सुखरूप राहतील हा संतोष मानून बेफिकीर रहाता जहाला. अशीं दोन वर्षें औरंगाबादेस फौज होती.

इकडे महाराजांस फुरसत होऊन द्रव्यसंग्रह करून कित्येक अदलशाही गड कोट देश काबीज केले. शहाजादे यांचा व महाराजांचा निखालस घरोबा चालला. परस्परें वस्तभाव वस्त्रें अपूर्व जिन्नस पाठवूं लागले. उभयतां एक दील जहाल्याचें वृत्त ऐकून दिल्लीस पादशहास शंका उत्पन्न जहाली कीं, समयवशें फितवा होईल. म्हणोन शहाजादेस फर्मान पाठविला कीं, "शिवाजी राजा बहुत हरामी आहे. त्यांचे सरदार प्रतापराव गुजर व निराजीपंत हे दोघे फौजेनिशीं आहेत. त्यास यांचा भरंवसा धरूं नये. एखादे वेळेस दौलताबादेस दगा करितील. तरि तुम्हीं त्यांस कैद करून घोडीं तबिलेस लावणें. येविषयीं विलंब न करणें." म्हणोन लिहिलें. इतकियांत शहाजादे यांचा वकील होता त्याणीं टाकोटाक इशारत पुढें लिहून पाठविली कीं, "येथें या रीतीचा प्रकार झाला आहे. तुम्हीं हुशार होणें." हे वर्तमान येतांच त्यांणीं निराजीपंत यांस बोलावून सांगितलें आणि गुप्तरूपें वस्त्रें अलंकार देऊन निरोप दिला कीं, "तुम्हां उदईक रात्रींच कूच करून फौजेनिशीं जाणे, तुमचें सामान राहिलेस कोठेंही ठेवून सावकाशें नेणें. कागद येतांच कैद करावे लागेल. याजकरितां अगोदर निघोन जाणें." त्याप्रमाणें त्यांणीं येऊन प्रतापराव यास कळविलें. त्यांणीं सर्वांस कळवून दुसरे दिवशीं तयारी करून रात्रीं फौजेनिशीं निघोन त्वरेनें मजल दरमजल करीत महाराजांसन्निध येऊन दर्शन

---

१६. फर्मान=राजपत्र.

जहालें. कितेक खजाना व चित्र विचित्र वस्त्रें भूषणें आणलेलीं नजर केलीं. तेणेंकरून बहुत संतोषी जहाले. आणि बोलले कीं, दोन वर्षें लष्करचें पोट भरलें आणि शाहाजादा मित्र जोडिला हीं दोन कामें उत्तम जहालीं. आतां मोंगलांचा मुलूख मारून खावयास जागा जहाला. औरंगाबादेहून फौज निघोन आलियावरि आठ दिवसांनीं दिल्लीहून पत्रें घेऊन मनुष्यें येऊन हुकुमाप्रमाणें सांगितलें. त्याजवरून शहाजादे बोलिले कीं, "मराठे हरामजादे आठ रोज अगोदर पळोन गेले. हजर असते तरि कैद करितों." ऐसें उत्तर पाठविलें. तें पाहून पादशाह थक्क जहाला.

इकडे प्रतापराव येऊन महाराजांचें दर्शन जहालें. पागाही सजली. गनीमाचे फौजेनीं आपल्या राज्यावरि आलिया त्यास मारून घालवूं लागले. देश मारून धुळीस मिळविले. तदनंतर शांगणा किल्लेस विजापुराहून रुस्तुम वजीर सात आठ हजार लष्कर घेऊन येऊन वेढा घातला. ते वेळीं गडकरी यांणीं मोठें युद्ध केलें. तें महाराजांनीं पाहून बाहेरून उपरांळा करून वेढा घातलेला उठविला. रुस्तुम वजीर मागें सारून नामोहरम केला. त्यानंतर अफजल करीम व बहिलोलखान वजीर विजापुराहून दहा हजार जमाव घेऊन येऊन पुन्हा शांगणेस वेढा घातला. गडकरी यांणीं बहुत खेस्त करून मारामारी केली. महाराजांनींही बाहेरून फौज पाठवून उपराळा करून बेजार केले. आणि पाऊसही लागले मुळें कितेक लोक मेले. हत्ती घोडीं उंटें मरों लागलीं. लोक राहिलेले सडले. ऐशी अवस्था होऊन जीव वांचवून पळाले. जातांना परम सायास जहाले. पुढें जितकीं शहरें मोंगलाईत होतीं तेथें तेथें वेश पालटून शोधास माणसें पाठविलीं होतीं त्यांतून दोघांनीं खबर सांगणेस यावें दोघांनीं तेथें रहावें खबर आलेवरि लष्कर पाठवून शहर लुटावें ही तजवीज केली.

इतकियांत सुरतेहून बहिरजी जासूद आला कीं, सुरत मारालिया अगणित द्रव्य सांपडेल. ऐसें कळविलेवरून विचार महाराजांनीं केला जे, फौज पाठवून मनासारखें होणार नाहीं. आपणच खुद जावें. असें ठरवून, पीळबंधु व व्यंकाजी दत्ताजी ब्राह्मण हे मोठे लष्करी नामोशींचे सरदार महाराजांकडून सेवा सोडून राजे यांजकडेस आले त्यांस नांवाजून, पांच हजाऱ्या पागेच्या सांगितल्या; आणि प्रतापराव गुजर सरनोबत व व्यंकाजीपंत व भकाजी आनंदराव व वरकड सरदार व दहा हजार पागा शिलेदार ऐसें वीस हजार

९७. उपराळा=मदत.
९८. खस्त=श्रम, मेहनत.
९९. पाळ बंधु=शहाजीचा राख पुत्र.
१००. नामोश=कीर्त, लौकिक.

लष्कर व मावळे लोक पांच हजार निवडक माणूस व सरकारकून निळोपंत व अण्णाजीपंत व दत्ताजीपंत ऐसे समागमें घेऊन [1]कोळवणांतून नीट सुरतेस येऊन एकाएकीं दाखल जहाले, तेथील लोक गैरहुशार असलेंमुळें पेठेंत शिरोन मोंगलाचें लष्कर होतें त्याची मारामारी जहाली. ताम्राकडील लोक बहुत मारिले. आणि साहुकार यांचीं घरें काबीज करून सोनें रुपें मोतीं पोंवळें आणि हिरे पाच नीळ गोमेद पुष्कराज लसणे व आरक्त माणकें ऐशीं नवरत्नें मोहरा पुतळ्या वगैरे सोनें रुपेचें नाणें व तांबें पितळ वगैरेंचीं भांडीं सोडून दोन रात्र दिवस लुटलें. उत्तम घोडे युद्धांत व शहरांत सांपडले ते आणिले. ऐसा [2]नागावा करून तें द्रव्य कांहीं घोड्यांवर व कांहीं माणसांजवळ देऊन निघाले. ही खबर मोंगलांचे वजीस सुभे व उमराव मोहबतखान व दाउदखान या दोघांस [ लागून ] एकेकाबरोबर बारा बारा हजार स्वार त्यांसहित सात आठ गांवांची दौड करून महाराजांस गांठावें याविचारें त्वरेनें आले. ही खबर कळोन महाराज [3]बख्तर व मस्तकीं [4]जिरेटोप घालून घोडेवरि बैसोन पुढें बिनी लाविली. दोन्ही हस्तकीं पट्टे चढवून सर्व मालमत्ता घोड्यावर घालून पुढें पायचे लोक रवाना केले आणि दहा हजार स्वारांनिशीं सडे के डा स म्हणोन शहर होतें तेथें महाराज उभे राहून युद्ध केलें. दोघे सुभे चालोन आले त्यांची यांची गांठ पडून मोठें खटलें जहालें. त्यांस मारून मुडदेवरि मुडदे पाडिले. दोन प्रहर घोरंदर युद्ध जहालें. मराठे यांणीं शूरत्वाची सीमा केली. मोंगल बेजरब मारिला. चार हजार घोडा पाडाव केला. शिव सरज्याचे भयें दोघे वजीर पळाले. पळतां पळतां हत्ती सुमार दहा सांपडले. ऐशी फत्ते करून पुढें चालले. तों इंद्राराम वजीर मोंगलांचा त्याचा लेंक जगजीवन व इंद्ररामाची बहीण [5]रायभोगीण कोंडली. तिणें दंतीं तृण धरून महाराजाची लेंक म्हणविलें. म्हणोन तिजला [6]कौल देऊन अनाथ करून महाराज माघारे गडास आले. आणि मालमत्ता आणलेचा हिशेब आकारून पाहतां पांच कोटी होनांची रक्कम जहाली. व घोडे पांच हजार आणिले त्यांची पागा केली. आणि घोडेचे उजवे चौकावर चौकडीचे डाग देऊन खूण केली.

पुढें ज्या ज्या मुलखांत आदलशाही व निजामशाहीमध्यें गड किल्ले होते ते घेऊन कितेक अवघड डोंगर बांके जागे होते तेथें गड बसविले. जागजागा

---

१. कोळवण=शहापूर तालुका ( जिल्हा ठाणें ).

२. नागावा=नागवणी.

३. बख्तर=कवच.

४. जिरे-टोप=जाळीचें शिरस्त्राण लोखंडी.

५. राय भोगीण याजबद्दल "राय बागीण" असें पाहिजे.

६. कौल=अभय; क्षमा.

गांवावर दीडगांवावर मुलखांत गड बसविले. गडा करितां मुलूख जत्न होता ऐसें समजोन गड बांधिले. कोकणांत कल्याण भिंवडी पासून राजापूर पावेतों देश काबीज केला. जागजागा पुंड, पाळेगार, देशक होते त्यांमध्यें जे युद्धास आले त्यांस युद्ध करून मारून गर्दीस मेळविलें, आणि ज्यांनीं कौल घेतला त्यांचें यथायोग्य चालविलें व प्राणानिशीं रक्षिलें. दंडाराजपुरी समुद्रामध्यें किल्ला निजामशाही आहे तेथें हबशी किल्लेदार याची जहागीर. तो खावंद त्या पाणियांतील आ प खु दी नें होऊन चाळीस पन्नास गुराबें करून व आरमारें सजवून मुलूख मारून जागा जतन करून राहिले. त्यांचे लोकांनीं महाराजांचे मुलखास उपद्रव लाविला. मग त्याजवर बाजी पांसलकर मावळा व दोन हजार माणूस ठेविलें. पांसलकर मोठा योद्धा, ज्याच्या मिशांवर मोठीं लिंबें ठेवावीं एवढ्या मोठ्या. त्याजवर राजपुरीहून काय सांवत पांच हजार स्वारांनिशीं युद्धास आला. त्याचे मोठें युद्ध रणखंदल जहालें. पासलकर व सांवत यांची गांठ पडली. तेव्हां एकास एकानीं पंचवीस जखमा करून दोघेही ठार जहाले. राहिलेले लोक दोहींकडील आपलाले जागेस गेले.

इतकेंत शहाजी राजे बेंगरूळाकडे होते ते विजापुरास जात असतां एकाएकीं चित्रदुर्ग विलायेंतींत बेदगिरी या गांवीं घोडेवरून पडोन कैलासवास केला. हें वर्तमान महाराजांस कळोन बहुत शोक केला. परम दुःख जहालें. नंतर उत्तरकार्यविधि यथाशास्त्र सांगोपांग संपादून दानधर्म अपार केला. आणि परम क्लेश करून महाराज बोलिले, "मजसारखा सविजयी पटुतर शककर्ता चतुःसमुद्रवलयांकित धराभुवनीं सत्कीर्ति संपादन केली पुढें सिंहासनाधीश्वर व्हावयाचा सिद्धांत केला असतां "दैवोविचित्रागति" होऊन आबासाहेब आम्हांस टाकून परलोकास गेले. पुन्हा दर्शन जहालें नाहीं. आम्ही वडिलांचे पुण्यप्रतापें दक्षिणेंतील चार पादशाह्या जिंकिल्या. अफजलखानासारखा यमधामास पाठविला. शास्ताखानास शासन करून आले मार्गें लाविला. दिल्लीपतीनीं कत्रिमें मिरजाराजा व जयसिंगराजा व हुजुरात पाठविली त्याशीं कार्याकारण सामोपचार संपादून, पादशाहाचे भेटीस दिल्लीस जाऊन, पादशाहा औरंगजेब याची तमा न धरितां तेथून पराक्रमें स्वराज्यास आलों. संपूर्ण मुलूख अद्दलशाही निजामशाही व कुतुबशाही घेतला. ऐसेच किल्ले कोट घेऊन शासन बैसविलें. सुरत मारिली तेथील ... बहुत आणिलें. पादशाही

७. देशक=देशमुख, देशपांडे वगैरे देशकामगार.

८. गुराब=एका प्रकारचें तारूं.

९. बाजी पासलकर-यास "फसलकर" असें ग्रांटड‍फ ... पण तें बरोबर नाहीं.

१०. विलायत=देश.

दोन सुभे बारा हजार स्वारांनिशीं आलेले बुडविले. तैसेच रजपूत उदाराम व गंगाराम लुटून फस्त केले. विजापुराहून दुसरे दोन सुभे रांगण्यास चालोन आले तेही मारून गर्दीस मेळविले. एकसत्ता केली. पुढें क्षात्र धर्म संपादून मुंजीबंधन करून सिंहासनावर बैसावें, हें सुख वडिलांस संपूर्ण दाखवावें, सेवा करावी, महायात्रा घडवावी, हा मनोभाव असतां मजसारखे पुत्राचे पराक्रम कांहीं दिवस राहून पहावयाचे होते. मी वडिलांपासून आल्यावर तमाम किल्ले व बांके आर्जिक जागे घेतले. चौऱ्यायशीं बंदरें घेतलीं. हबशी तुं ग मा र वलंदेज नास्र शिद्दी अरब इंग्रज चांचा फराशी यांस शिक्षास्पद केलें. देशक, पाळेगार, मवास हस्तीं काठिया देऊन दास्यत्वास लाविले. अद्दलशाही घेऊन बहामनी कांगो पादशाही बेदरची जेर जप्त केली व तानाशाह पादशहास ठायीं ठेविला व बहिरी निजामशाही तख्त दौलताबाद आज्ञांकित जहाला. दिल्लेश्वराचे वडील पुत्रास परम मित्रभाव संपादिला. नर्मदा पावेतों जप्ती आबासाहेब, बसविली. औरंजेबपादशाहा कांहीं सामान्य नव्हे. क्षितिइंद्र अटक, बद्रिकाश्रम, मारवाड, मेरतें, काश्मीर, चितोड, अयोध्या, अजमीर, चांदे, देवगड, बंगाल, सुजानपूर, काळापाहाड, असेरी या बावन्न पादशाहांस शिक्षा करून घेतल्या अशा मी पादशाहा दंग करून रात्रदिवस वोसणावयांस लाविला. माझे दहशतीनें अलमगीर कांहीं वांचतां दिसत नाहीं. तेथें वरकडांची कथा काय? अचंबा गोष्टी वडिलांचे पुण्यें करून व श्रीभवानीशंकर वरदें घडोन आल्या. कंकणांकित जगती कंपायमान केली. कैलासवासी थोरले संभाजी राजे यांस विजापूरचे पादशहांनीं विषाचीं वस्त्रें देऊन मारिलें त्याचा सूड घेतला. अशीं महत्कर्मे जीं जीं केलीं हा पराक्रम वडलांस श्रवण होतांच कृपाळू होऊन संतुष्ट चित्तें वस्त्रें अलंकार लष्करास येत होते. आतां मजला माया करून कोण पाठवील? मी एकटा, भाऊबंद नाहीं, वडिलांरहित जहालों. मी कांहीं वडिलांस संतोष पावविला नाहीं." म्हणोन महाराज ममता मोहें अतिशय प्रलाप करून संपूर्ण देहभावना विगलित होऊन अवसान खेत्ता केलें. चिंतार्णवीं पडले. श्रीमन्महाराज मातुश्री आईसाहेबांनीं वृत्त ऐकतांच कदलिस्तंभातुल्य भूमीतें अचेतना पडली. हृदय ललाट ताडूं लागली. आत्मा आकर्षण केला. महाराज कां रुसोन मजला टाकून गेले? महाराजांचे सेवेशीं मजपासून अपराध घडला किंवा क्लेश दिधले? ... वाहून शिवबास घेऊन पुणें प्रांतीं आलों. महाराज विजापूर प्रांतें ...ाहेल्यामुळें दर्शनाची अपेक्षा होती कीं, पुरुषार्थ भोगून आल्यास...खो शिवबानें दिगंतकीर्ति संपादिली. महाराजांस या गोष्टीचें

११. वोसणावयास=झोंपेंत ओरडावयास. | १२. खत्ता करणें=नाहींसें करणें, नष्ट करणें.

दिवसें दिवस कौतुक होतें. आतां शिवबाचें कौतुक कोण करील ? आणि शिवबा आतां पराक्रम कोणास वारंवार लिहील ? शिवबाचें वय लहान. पाठबळ कोणी नाहीं. एकटा पडला. महाराज मजवर राग कां केला ! माया अगदीं टाकिली. माझा उबग महाराज कां केला ! मी कां आलों ते समयीं महाराज मजशीं अणुमात्र बोलिले नाहींत ! कोणतें मी महाराज आठवूं ! आजि माझा सौभाग्यसमुद्र अवर्षण पडोन अगदीं आटला. सौभाग्यहीन मी जहालें. आतां हा प्राण महाराजांचे चरणांवरून लवणप्राय सतगा[१३] आहे, म्हणोन ममतातिशयेंकरून भाळ हृदय ताडून आईसाहेब रुदन करूं लागलीं. देहभाव अगदीं निघोन गेला. सर्व्ये करेंकरून सांवरून जवळ असणारांनीं उठवून बैसविलें. सावध होतांच चिरंजीवावरील ममतालोभ त्यागून खलु निश्चय परलोकास जावयास तत्पर जहाली. अग्निप्रवेश करावयाची सिद्धता मांडली. हें वृत्त शिवाजी महाराजांस कळतांच धांवत येऊन जवळ बसोन गळां मिठी घालोन मायलेंकरांनीं दुःखाचे उभाडे दीर्घस्वरें रुदन मांडिलें. साधन संपदा राज्याची आशा सोडली. आईसाहेबांनीं अग्निप्रवेशार्चा निशाच मांडली. पुत्राचेंही कांहीं ऐकेनाशी जहाली. तेव्हां महाराजांनीं परम दुःखें धाय मोकलिली. बापही गेले, मातुश्रीही जातात ! तेव्हां महाराजांनीं अवसान अगदीं सोडिलें. आणि मातुश्रीस आपले गळेची शपथ घातली. आणि चरणावरि मस्तक ठेविलें. चरण कांहीं केल्या सोडीनात. ऐसा प्रलय मांडिला. तेव्हां हलकोलाल जहाला. ते समयीं मातबर सर कारकून व मोरोपंत पेशवे व निराजीपंत व दत्ताजीपंत व अण्णाजीपंत व निळोपंत व उपाध्ये व बाळप्रभू चिटणीस व निळकंठराव प्रभू पारसनिवीस व मल्हार प्रभू मातबर सरदार व रायाजी पालकर व प्रतापराव सरनोबत व राघोमित्र मराठे व कितीएक लोक मुत्सद्दी यांणीं पदर पसरोन आईसाहेबांची प्रार्थना केली जे, " आपण अग्निप्रवेश केल्यानंतर संपादिलें राज्य आजि लयास जातें. महाराज कांहीं प्राण ठेवीत नाहींत. असा प्रकार घडतो. शहाजी महाराजांचें व शिवाजी महाराजांचें नांव जगीं नाहींसें होतें. या सर्व प्रकारांवरि साहेबीं दृष्टि देऊन, महाराजांस वोसंगीं[१४] घेऊन, मानस दृढ करून रहावें. हेका करून गेलिया वंशक्षय वडिलींच केला हे जगीं प्रसिद्धता दिसते. " तेव्हां अशा योगें सर्वांनीं सांत्वन करून आईसाहेबांस राहविलें.

तदनंतर दंडाराजपुरी येथील हबशी हा घरांतील उंदीर जैसा तैसा. ऐशियास कैसें करावें ! म्हणोन तजवीज करूं लागले. तेव्हां रघुनाथ बल्लाळ सबनीस यांणीं धैर्य करून, त्याजवर आपण स्वारी करितों म्हणोन

---

१३. सतगा=चळी. | १४. वोसंग=ओटी, मांडी.

बोलोन, पांच सात हजार पायलोक मावळे घेऊन राजपुरीवरी जाऊन तळेंघोंसाळें देखील सर्व देश मारून राजपुरी पावेतों जाऊन, समुद्र-किनारां आसपाशीं शिद्दीच्या फौजा आल्या त्याही मारून घालविल्या. तेव्हा राजपुरीकरांनीं वकील पाठवून सल्ला केला आणि शपथ प्रमाण देऊन भेटीस नेलें. भेटी जहाली. सल्याची बळकटी करून खस्त केलेंवरि हबशी यांणीं वस्त्रें व घोडा दिला. नंतर निघोन देशी आले. पुढें कांहीं दिवसांनीं रघुनाथपंत वारले. तेच दिवशीं सल्ला बिघडून देशास उपद्रव करूं लागले. मग महाराजांनीं व्यंकाजी दत्तो यांस नामजाद करून फौजेनिशीं रवाना केले. त्यांणीं जाऊन त्याचा मुलूख मारून फन्ना केला. मग शिद्दीनें आपले जातीचे घोडे स्वार पाठविले उभयतां युद्ध तुंबळ युद्ध जाहले. तीनशें स्वार मारिले. व्यंकाजीपंतांनीं बरी खस्त केली. बारा जखमा लागल्या. शिद्दीनीं जबरी पाहून सल्याचें नातें लाविलें. परंतु महाराजांनीं सल्ला केला नाहीं. त्याचे देशांत जागजागां गडकोट नवे राजपुरी नजीक बांके जागे होते ते घेऊन तेथें बांधोन कुल देश काबीज केला. ठाणीं ठेविलीं. मग त्याचाही इलाज चालला नाहीं. बळहीन जहाला. पांच हजार हशम सुभे ठेविले. राजपुरीस मुलूख नाहीं. धान्य वगैरे जहाजांतून नेऊन निर्वाह करूं लागले. यामुळें महाराजांनीं संभू गुराबें व तरांडी व तारा-मचवे व महागिऱ्या ऐशी नानाजातीचीं जहाजें करून, दर्या-सागर म्हणोन मुसलमान करून चारशें आरमारें सजवून सुभे केले. त्यांशीं व हबशी यांचे जहाजाशीं युद्ध होऊं लागलें. मग चोरून सामान पावूं लागलें. महाराजांचीं जहाजें जागजागां बंदरें मोंगलाई व फिरंगी, वलंदेज व फराशीस व इंग्रज वगैरे बावीस पादशाह पाण्यांतील आहेत त्यांची स्वारी बेदनूर सावदें व श्रीरंगपट्टण इत्यादि दर्या किनारेचीं शहरें मारून निर्वाह करून युद्ध करिते जहाले. व मालमत्ताही महाराजांस नानाप्रकारचे जिन्नस आणून देत होते. येणें रीतीनें सातशें जहाजें पाण्यांतील जहालीं. समुद्रांतीलही एक हात होऊन एक लष्कर जहालें. राजपुरी मात्र एक राहिली. याजकरितां पाण्यांत जागजागीं डोंगर पाहून येथें किल्ले बसविले. त्यासें एक अद्यापि निजामशाही चालत आहे. पाण्यांत गड बसविले

---

१५. नामजाद-करणें=नेमणें, नियुक्त करणें

१६ खस्त=मेहेनत, श्रम.

१७. गुराब (Grab)=एका प्रकारचें तारूं.

१८. तारा-मचवा—उताराचा मचवा.

१९. वलंदेज=डच.

२०. श्रीरंगपट्टन समुद्रतीरीं नाहीं. पण तत्संबंधी एकादें स्थळ असावें.

२१ त्यास म्हणजे राजपुरीस.

म्हणजे दर्या जेर जप्त आहे. पाण्यांतील राजे व पादशाह व मैवांस शक्तिहीन होऊन आयास येतात ऐसें जाणोन पाण्यांत पूर्वींच किल्ले वसविले. पाण्यांतील किल्ला यास जंजिरा म्हणावे. ऐसें कर्म करून किल्ले व जहाजें करविलीं. व पृथ्वीवरील किल्ले जोंपर्यंत तावत्काल आपलें नांव चालेल असा विचार करून अगणित किल्ले नूतन वसविले.

कोंकण कुडाळ देशांत खेम सांवत देसाई मोठा पुंड, तोलदार, बारा हजार हशमसह राहत होता. अम्मल अद्दलशाही. त्याणें विजापुरास सांगोन पाठविलें कीं फौज स्वारासमेत कोंकणांत पाठवावी म्हणजे आम्ही महाराजांवरि चालोन जातों आणि हा मुलूख वांचवितों. म्हणोन अर्जी पाठविली. त्याजवरून खवासखान सरलष्कर युद्धास मोठा दहा हजार स्वारांनिशीं कुडाळास पाठविला. सांवत हे त्यास सामील होऊन कोंकण बुडवीत चालले. ही खबर महाराजांस कळोन लष्कर हशमांची निवड करून नीट त्यांजवरि चालिले. फौज आलेचें समजलें. विजापुराहून बाजी घोरपडे दीड हजारांनिशीं घांट उतरून कोंकणांत राहिले होते त्यांजवर महाराजांनीं लष्कर पाठवून मोठें युद्ध होऊन त्यास पाडाव केलें. पुढें कुडाळांत खवासखानावर जावें आणि त्यास यासारखें बुडवावें तों त्यांणीं घोरपडे यांची खबर ऐकून त्या भयें पळोन घांटावर जाऊन नीट विजापुरास गेला. इकडे सांवतावर नामजाद रवाना केले. त्यांणीं जाऊन कितेक फौज मारिली. महाराजांचे फौजेशीं पुरे पडेना. तेव्हां फिरंगी मातबर सबब त्याचे देशांत गेला. इकडे कुडाळ देश हस्तगत जहाला. फिरंगी यांणीं महाराजांचे भयामुळें आश्रय दिला नाहीं. दुसरी जागा नसलेमुळें महाराजांकडे पितांबर शेणवीं हेजीब पाठवून कौल घेऊन शरण येऊन भेटला. आपण सांवत म्हणजे भोंसले यांचे गोत्रज, यास्तव महाराजांनीं आपलें चालवावें, अशीं कितीक ममतेचीं भाषणें केलीं. त्याजवरून महाराज कृपाळू होऊन कुडाळ महालची देशमुखी करार करून दिली. त्यांणीं ठाणें कोट बांधून कसबा कुडाळीं रहावें, जमाव करूं नये, असा तह करून ठेविला. त्यांचे सरदार राम दळवी व तानाजीसांवत यांस हशमाची हजारी देऊन, आपला चाकर करून, तिघे तीन ठिकाणीं नामजाद करून ठेविले. पुनः खेम सांवत यांची व त्यांची भेटी होऊं दिली नाहीं. या प्रकारें कुडाळ बांदें काबीज करून फोंडकोट येथें अद्दलशाही महंमदखान राजबिंडा सरदार जबरदस्त होता तो जागा वेढा घालून सुरंगानें बुरूज उडवून घेतला. खानास कौल देऊन विजापुरास जावयास निरोप दिला. तेव्हां महाराजांकडील

२२. मवास=लुटारू.

सरदार इब्राईमखान मोठा धारकरी लष्करचा हजारी बराबर होता त्यांणीं खस्त मेहनत करून फौंड घेऊन, कडवाड, सिद्धेश्वर, मिरज, आमलें, कदरें, सुपें, उडखडें, अकोट घेतले. वरकड वरघांटचे कोटही घेतले. गोकर्ण महाबळेश्वर सावर्दे येथवर सरदें[२३] लाविली. गोंवेचे फिरंगी यांस दबावून, त्यांजवळून तोफा नक्त जड जवाहीर घेऊन, आपलेंसें करून, त्यांस उदमाचा कौल देऊन आमदरफ्ती करावयास निरोप दिला. या प्रकारें सर्व कोंकण काबीज केलें. बिदनुरी शिवाप्पा नाईक राजा होता त्याचें शहर उसनूर म्हणोन थोर नामांकित समुद्रकिनारीं होतें. तेथील पालत आणवून घांट माथेवर जाऊन पहातां मार्ग नाहीं सबब जहाजें आणवून त्यांत बसोन एकाएकीं त्या शहराजवळ सूर्योदयाचे समयीं गेले. लोक बेफाम पाहून शहर मारिलें. एक दिवसांत लुटून फन्ना केलें. जशी सुरत मारून माल आणिला त्याप्रमाणेंच मालमत्ता आणिली. ती घेऊन देशीं आले. एकंदर मालाचा अजमास दाहा कोटी होनांचा जहाला.

तदनंतर कारंजकोट मोगलाईंत शहर होतें तेथून पालय आणवून महाराज यांणीं बराबर लष्कर घेऊन चालिले. जातां जातां औरंगाबादेची पेंठ मारिलीं. व ब्र्हाणपूरच्या पेठा मारून पुढें सात गांव मजल करून कारंजियावरि जाऊन तीन रोज मुक्काम केले. सर्व शहरांतील वाडे पाडून खणती लावून द्रव्य काढून जड जवाहीर सोनें रुपें व उंची कापड ऐसें घेऊन स्वारी करून चालले. मोंगलांचे सुभे जागजागां दिलेरखान बहादर व इंद्रमणि ऐसे उमराव फौजेनिशीं होते ते चहूं तर्फेनें चालून आले. युद्ध चाललें. मोठमोठे मोंगल मारून गर्दीस मेळविले. हत्ती घोडे मा हा ल पाडाव करून माघारे घालविले. महाराज सुखरूप देशीं आले. पाठीवरि दिलेलखान मोठा शूर बारा हजार स्वारानिशीं दहा बारा गांवा आंत होता तों महाराज राजगडास येऊन पोंचले. मालमत्तेची संख्या पाहतांच सात कोटीचा आकार जहाला.

पुढें राहिरीगड अदलशाही होता तो घेतला. महाराजांनीं जाऊन पाहिला तों मोठा उत्तम, चहूं तर्फा गडाचे कुबल कडे तासल्याप्रमाणें. दीड गांव. पर्जन्यकाळीं गवत देखील उगवत नाहीं. निघोरधोंडियाचा. दौलताबाद किंबहुना पृथ्वीवरि समतुलनेस अतिउत्तमोत्तम किल्ला उंच नेटका तळसुद्धां शोभिवंत, उपमेस दौलताबादही न पावे. ऐसा रमणीक पाहून महाराज बहुत समाधान पावले. तख्तास गड हाच करावा, ऐसा विचार करून ते क्षणीं तेथें घरें वाडे सदरा चौसोपे अठरा कारखाने यांस वेगळालीं, तैशींच राणीवशाचीं घरें पृथक्

२३. सरद–हद्द, सीमा.

व सरकारकुनांचीं घरें व गजशाला व अश्वशाळा व उष्ट्रशाळा व पालखीचे महाल व वहिली महाल, कोठी व थट्टी[१९] महालास व वसनागार, भांडारगृह व एकांत स्थळें, राजसभा, विलासभुवनें, उपरमाड्या व शिकारखाना तयार करून चुनेगची व चिरेबंदी बांधली.

महाराजांच्या राण्या पृथक्. त्यांमध्यें मोहिते यांची कन्या सकलसौभाग्यादिसंपन्न सईबाईसाहेब गरोदर होती. त्यांस पुत्र जहाला. तें [ मूल ] पालथें उपजलें. हें वर्तमान महाराजांस समजल्यावरि दिल्लीची पादशाही पालथी घालील असा पटुतर प्रतापी जहाला असें बोलोन मनांत पुढील भविष्य कळलें. ज्योतिषी गणक सिद्धांत वेदांतवक्ते ब्राह्मण व महापंडित व ज्ञानी मिळोन पुढील भविष्य वर्तविलें जे, हे थोर प्रतापी होतील. महाराजांनीं नांव राजाराम ठेविलें कीं, राज्यसुख आपणापेक्षां याचा आक्रम व नांवाची कीर्ति होऊन आपलें नांव रक्षील तरि एवढाच रक्षील. ऐसें बोलोन बहुत दानधर्म केला. ब्राह्मणांस संतर्पणें घातलीं. हस्ती भरून साखरा वांटल्या. वाद्य नानापराचा तुंबळ गर्जना करवून तोफेची सरबत्ती करून मोठा आनंद केला. सरकारकुनांस व सर्व लोकांस वस्त्रें देऊन पुत्रोत्साह संपादिला.

तदनंतर मोरोपंत पेशवे यांणीं त्रिंबकगड घेतला. त्यापासून सालेरी मुलेरी पावेतों कित्येक किल्ले घेतले आणि कित्येक नवे वसविले. कोंकण रामनगर वगैरे देश घेतले. त्या देशांतही गड बांधिले. अशी क्षितीधरी ख्याति केली. ही खबर दिल्लीस पादशहास सविस्तर समजली. आणि सुरत मारिली, सालेरी मुलेरी आदि किल्ले घेतले, खानदेश बागलाण गुजराथ वऱ्हाडदेश घेतला, ऐसें कळोन बहुत दुःखी होऊन अतःपर काय इलाज करावा? [ असे विचारीं पडले. ] तेसमयीं रोहिलखान याचा सुभा रवाना केला तोही नामोहरम होऊन आला आतां शाहाजादा पाठवावा तरि तिकडे मिळोन दिल्लीच घेईल. आपण खुद्द जावें [ तरि ] जातां येत नाहीं. न हू न शास्तीखानासारखें झालिया काय करावें? शिवाजी राजे जोंपर्यंत जिवंत आहेत तोंपर्यंत दिल्ली आपण सोडीत नाहीं. असा विचार करून येखलासखान व दिलेलखान यांस बोलावून आणून सव्वीस हजार जमावानिशीं जाऊन सालेरी घेऊन फत्ते करणें म्हणोन सांगोन पाठविलें. तैंच दिलेलखानास अहिवंत रवळा जवळा येथें दहा हजार स्वारांनिशीं पाठविलें. त्याणीं येऊन रवळा जवळा यास लागले, किल्लेवरून गडकरी यांणीं भारी युद्ध केलेमुळें किल्ले हातीं आले नाहींत. मोरोपंत पेशवे

---

१८. वहिली महाल-रथशाला, गाडीखाना.

१९. थट्टीमहाल-गोवाटिका, गो-शाला.

यांणीं कुमकेस मावळे लोक १२००० बारा हजार पाठविले. त्यांणीं जाऊन छापा घालून घाबरा केला. रामाजी पांगेरा म्हणोन हशमांचा नाईक हजार लोकांनिशीं जाऊन कणेरागडाखालीं दिलेलखान यांणीं फौजेनिशीं चालोन घेतलें. तेसमयीं पांगेरा यांणीं लोकांस विचारिलें, यांत कोणी यावेळीं निदान करावयाचे सोबती असाल त्यांणीं उभे रहावें. म्हणोन निवड करितां सातशें माणूस निघाले. ते घेऊन पायउतारा चालोन जाऊन चहूंतर्फें वेढोन एकघाई प्रहरभर टिपरी शिमगा खेळ खेळतात तद्वत् लढून बाराशें पठाण रणास आले. व पांगेरा वगैरे इकडील लोकांस एकेकांस वीस पंचवीस तीस जखमा तीर, बरची व सांगा व माडू वगैरे शस्त्रांच्या कहरी लागून मृत्यु पावले. दिलेलखानानीं तोंडांत आंगुली घालून मोठें आश्चर्य केलें, मग येखलासखान यांणीं येऊन सालेरीस शह घातला आणि फौजेसहित तेथें उतरला. हें वर्तमान महाराजांस कळोन कल् लष्करसह वरघांटीं सालेरीस जाऊन छापा घातला. कोकणांतून पेशवे हशमानिशीं रवाना केले. हे इकडून येतील तुम्हीं वरघांटींहून ऐसे दुतर्फा चालून घेऊन शत्रू मारून गर्दीस मिळविणें ऐशीं पत्रें पेशवे व प्रतापराव यांस पाठविलीं. त्याप्रमाणें उभयतां दोहींकडून सालेरीस येऊन पावले. आणि शत्रुसैन्यावरि चालून गेले. मोठें तुंबळ युद्ध हत्ती घोडे तोफा मोंगल पठाण अरब रजपूत वगैरे यांशीं जहालें. तेणें पृथ्वी कंपायमान होऊन गगनचुंबित धुळोरा उठला. तीन कोस औरस चौरस गर्दी जहाली. आपपर दिसेनासें होऊन ओळख एकमेकांची मोडली. ऐसें धुरंधर युद्ध, जसें कौरव पांडवयुद्ध [ तसें ] समरंगणीं जहालें. याप्रकारें मर्दुमीची निस्सीमता जहाली. हत्ती घोडे रणास येऊन दोहींकडील माणूस दहा हजार मेले. व जखमी बहुतच होऊन रणभूमीस अचेतन पडले. एक पादहस्तहीन कर्णहीन नासिकचक्षुहीन [ पडले ] व एकाचीं मस्तकें फुटलीं. रण हुंबूं लागलें. रक्तोदकें भूमीस सडाच घातला. धरादेवी शोणितकुंकुमें विराजली. भूतनाथ वेताळ पिशाचसेना घेऊन रणभूमीस प्रेतासनास उभा ठाकला. ऐसा प्रकार होऊन वाताहत होऊन गेली. अविंधांचीं साधनें जीं संपादिलीं तीं महाराजांस समरीं अर्पिलीं. बाकी न्यावयास कांहीं ठेविलीं नाहीं. एकजात हत्ती सवाशें सांपडले व उंट सातशें व घोडीं दहा हजार वस्त्रभाव व जडजवाहिर व वस्त्रें व शस्त्रें गुरें वगैरे हरजिन्नस बहुतच महाराजांचे हातीं लागला. बेवीस वजीर नामांकित धरिले. येखलासखान नबाब पाडाव जहाले. असे बावीस सुभे बुडविले. या युद्धीं महाराजांकडील प्रतापराव व आनंदराव व त्र्यंकाजी दत्तो व रूपाजी भोसले, सुरराव कांकडे व शिदोजी निंबाळकर व खंडोजी जगताप व गोविंदराव जगताप व संताजी जगताप व

मानाजी मोरे व विसाजी बल्लाळ व मोरो रघुनाथ व मुकुंद बल्लाळ व बाजे उमराव यांणीं जिवाभ्य खस्त केली. मुख्य मोरोपंत पेशवे व प्रतापराव सरनोबत यांणीं अंगेज केला. सुरराव कांकडे पंचहजारी मोठे समशेरबहादर धारकरी यांणीं रणांगणाचे ठायीं भारती अतिरथी वीरांप्रमाणें युद्ध केलें. ते समयीं शूरत्वाची वाग्मितैं अरीस गोचर करवावी हा मनोगतभाव विशेष असतां अकस्मात् श्रीरामचंद्रशरातुल्य जंबूरचा गोळा लागून ठार पडला. तो सामान्य योद्धा नव्हे. प्रत्यक्ष विश्वतोमुखीं नामाधिक जैसा किरीटी किंवा कर्ण किंवा द्रोणात्मज अश्वत्थामाच विलोकितां त्या प्रतिमेचा सुरराव युद्धीं पडला. अशी फत्ते जहाली. म्हणोन पेशवे व सरनोबत या दोघांनीं महाराजांस विनंतीपत्रें जासुदांसमागमें पाठविलीं. तीं पाहून आनंदाचा उदधि हृदयीं उचंबळोन गजशावकातुल्य डुलों लागले. संतोषास पारावार नाहीं. ब्रह्मांडकरंडा भरोन उरला. फत्ते जहाल्याच्या तोफा करवून शर्करा हत्तीवर भरून समस्तांस वांटिली. जासुदांस कृपाळू होऊन भरजरी मंदील व पैठणी पासोड्या व हातांत सोन्याचीं कडीं घातलीं. व एकेकास शंभर शंभर रुपये इनाम बक्षीस दिले. व तेच समयीं बाळाजी आवजी चिटणीस यांस आज्ञापत्रें लिहावयास आज्ञा केली जे, मोरोपंत पेशवे व प्रतापराव गुजर सरनोबत यांस बहुत शाबासकी देऊन लिहिणें. व वरकड लहान थोर सरदारांस समाधानपत्रें लिहिणें. त्याजवरून चिटणीस यांणीं महाराजांचा आनंद चित्तांत आणून पेशवे व प्रतापराव यांस लिहिलें तें येणेंप्रमाणें. राजश्री मोरोपंत पेशवे व प्रतापराव सरनोबत यांस आज्ञा केली ऐशिजे, तुम्ही विनंतिपत्र हुजूर पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ श्रवण जाहला. तुम्ही महत्कार्यकर्ते, धुरीण, अंगाचे कृतकर्मे, करते सेवक, हिंदु, केवळ महाराजांचे पंचप्राण, दुसरा अर्थ तुमचे ठायीं अणुमात्र नाहीं. तुम्हीं या समयीं जिवाची आशा न धरितां येखलासखान नबाब व दिलेलखान हफ्तहजारी हे पादशाही उमराव कांहीं सामान्य नव्हेत, दोघे पादशहाचे नावाजीसे कार्यकर्ते, पादशहाचे तर्कशींतील तीक्ष्ण तीर जैसे, घटोत्कचा सारखे बलोन्मत्त असतां, श्रीअंबा वरदें यवनाचा पराभव करून दिगंतकीर्ति सेवकपणाची तुम्हीं संपादिली. तुमची हिम्मत मर्दुमीची. सेवक असावे तर तुम्हांसारखे पटुतरप्रतापी [ असावे. ] धन्य तुमची! यवन लोक कालरूपी त्यांस महाकाल होऊन समरांगणीं शौर्य कर्माची निस्सीमता करून जैसा सूर्य चंद्रग्रहणीं राहू व केतुरूपें ग्रासावयास आला, किंवा रामायणीं सौमित्रें इंद्रजित् वधिला, याप्रकारें येखलासखान नबाब व दिलेलखान निवटिला. किंवा महाराजांनीं अफजलखान भुजाबळें

२०. वा[illegible]=चातुर्य, प्रभाव ह्याअर्थी. | २१. तर्कश=बाणांचा भाता.

बहादर स्वकरें मारिला, शास्तीखान अपमानें दवडिला, किंबहुना औरंगजेब तेजहीन केला, त्याप्रमाणेंच तुम्ही विरश्रीवैभवाची प्रौढता अरिजनास गोचर केली. महाराजांचे मनोरथ सिद्धीस गेले. जैसे गरुड हनुमंत बलोन्मत्त समर्थांचे निकटवर्ती सेवक तैसेच तुम्ही महाराजांचे सेवक. तुम्हांस उत्तीर्ण यासमयीं काय व्हावें? पहातां एक अधिक महाराजांची दया पूर्ण, येणेंकडोन सहविनयतेस व्हाल हाच अर्थ स्वामींनीं दृढ चित्तांत आणोन प्रसादवस्त्रें खासा महाराजांचा मंदील व चादरा, पटके व झगे सुरवारा व अलंकार कलगिया मोतियाचे तुरे व शिरोपेंच व कर्णमात्रा व पदकें व जडित नवरत्नांकित कडीं व हस्तमात्रा व घोडा १ व हत्ती १ एक मोरोपंत पेशवे व प्रतापराव सरनोबत यांस व लहानथोर सेवकांस गौरव महाराजांनीं करून पाठविला. आणि पत्रीं आज्ञा केली जे, अविंधांचे उमराव व वजीर मातबर लोक पाडाव झाले व जखमी शिपायांस वस्त्रें व घोडीं देऊन बहुमानें सोडून देणें " म्हणोन महाराजांनीं हुकूम केला. त्याप्रमाणें चिटणीस यांणीं राजमुद्रांकित लिहून महाराजांस अक्षरशाहा वाचून श्रवण करविलीं. पत्रार्थ महाराजांनीं चित्तांत आणून परम समाधान पावले. महाराजांचे चित्तांत जें जें होतें त्याप्रमाणें चिटणीस यांणीं परम चातुर्यता करून सगर्भ मनोल्हासाचीं आज्ञापत्रें पेशवे व सरनोबत व वरकड सरदारांस पाठविलीं. आणि चिटणीस यांजवर कृपाळू होऊन पालखी देऊन गौरविलें. आणि तुझिया लिहिण्याची साक्ष तुलाच, जो जो मजकूर सांगितला त्याचप्रमाणें कोठें अन्वय जाऊं न देतां लिहितोस, हें इतरांस होणें नाहीं; धन्य तुझें चातुर्य! महाराजांचे तूं केवळ अंतःकरण, सर्व विश्वास महाराजांनीं तुझे स्वाधीन केला आहे, इतरास जाबसाल मनसबा कर्तव्यता अणुमात्र कोणास श्रुत जहाला नाहीं, सर्व इजारत मनसुब्याची तुजवर आहे, अशी तारीफ महाराज करूं लागले. आणि चित्तवृत्ति याचे ठायीं रात्र दिवस सन्निध असावें याप्रकारें गौरव केला.

नंतर पत्रें रवाना जहालेलीं पावलेवरि आज्ञेप्रमाणें अविंधाचे वजीर उमराव मातबर लोकांस वस्त्रें व खर्चास व घोडीं देऊन आनंदयुक्त होत्साता सोडिलें. दिलेलखान सालेरीहून चहूं मजलीवर होता त्यांणीं ही खबर ऐकून माघारा पळून गेला. ही खबर दिल्लीस औरंगजेब पादशाहास कळोन तेसमयीं दिलगीर होऊन, तीन दिवस बाहेर आले नाहींत. चिंताक्रांत होऊन नगारखाना वगैरे वाद्यें बंद ठेवून बहुत अंजुर्दा आहेत म्हणोन अमदखान दिवाण यांस समजोन तेही जवळ

२२. अजुर्दा=कष्टी.
२३–२३. ह्या शब्दांचा संबंध बरोबर जुळत नाहीं.

नाहींत आणि यैस्तव बहुत कष्टी व श्रमी होऊन श्वास टाकून बोलले जे, "खुदानें यवनाची पादशाही दूर करून शिवाजी राजे यांस दिली असें प्रत्यक्ष दिसतें. आतां मौत[२४] येईल तरि बरें. शिवाजीची कीर्ति ऐकवत नाहीं. तेव्हां बहादरखान खुद्द पादशाहाचे बंधु[२५], यांणीं येऊन बहुतां रीतीनें समाधान केलें कीं, "तुम्ही दिल्लीस पादशाही खुशाल करणें. आम्ही शिवाजीवर जाऊन त्यास तंबी देऊन त्याचें लष्कर इकडील मुलखांत न ये असें करितों. नाना हुन्नर कळेल तैसें करून ठायीं ठेवितों. त्याची परवा तो काय? येविशीं कांहीं फिकीर न करावी. ऐसें समाधान करून पादशाहास तख्तावर बसवून नंतर त्यांणीं यांस नाजाजून वस्त्रें अलंकार व आपले गळेंतील पदकें व शिरपेंच व कलगी व जडावाचीं दोन कडीं हस्तकीं व उत्तम घोडीं ५ पांच व हत्ती पलखदंती तीन दिधले. तदनंतर दौलतही जाफा दिधली. आणि समागमें सत्तर हजार स्वार दिलेलखानसह दिधले. येणेंप्रमाणें फौज दक्षिणेस मोहिमेवरि पाठविली.

ते मजल दर मजल आल्याची बातमी महाराजांस समजतांच बोलिले जे, "बहादरखान पेंडीचें गुरूं आहे. त्याचा गुमान तो काय? त्यास आपल्या मुलखांत यावयास दोन वर्षें लागतील." मग अण्णाजी दत्तो सुरनीस यांणीं मालसांवत मावळे यांचे हजारी यांस सांगून पनाळा घेतला. चंदन वंदन सातारा नांदागिरी परळी हे किल्ले घेतले. महाराजांची स्वारी देश-पहावयास रायरीहून निघोन, वांईचा कोट येत येतां घेऊन, कऱ्हाड व शिरोळ व कोंल्हापूर वगैरे कोट आणि हुकेरी रायबागपर्यंत घेतला. मुलुख चौतर्फा सुटला. त्यांत आटोप कैसा होईल? तेव्हां पेशवे यांचे हवाला कल्याण भिंवडी पासून कोंकण वरघाट लोहगड जुन्नर बारा मावळें हरल्याघाटापासून केला. व अण्णाजीपंत यांचे स्वाधीन चेऊलपासून दाभोळ राजापूर कुडाळ बांदें व फोंडें अकोल पर्यंत केलें. वरघाट वांईपासून कोपळ तुंगभद्रा पावेतों देश नेमून दत्तोपंत वाकनीस यांचे स्वाधीन केला. व त्यास पनाळेस ठेविलें. ऐसें करून याखेरीज मोंगलाई देशांत सुभे ठेवून ते पेशवे यांचे स्वाधीन केले. कोट किल्लेदार व कारकून व लोक ठेवणें ते महाराजांनीं नजरेनें पाहून ठेवावे. कार्याचे माणूस पाहून तैनात जाजती हशमास करणें ते [करावी.] सर कारकुनाचे मुतालीक सर्वकाळ जवळ असावे. वर्षास हिशेब मुलुकाचा व रसद[२६] घेऊन सरकारकुनांनीं राजदर्शनास यावें. येणेंप्रमाणें कारभार करीत चालिले.

---

२४. मौत मरण.

२५. पादशहाचे सर्व सख्खे बंधु तर पूर्वींच नाश पावले होते.

२६. रसद=वसूल, सरकार तिजोरी.

पुढें विजापुराहून अबदुल करीमखान बारा हजार स्वारानिशीं महाराजांचे देशावरि रवाना केला तो फौजेनिशीं इकडे येऊं लागला. ही खबर महाराजांस कळोन कुल लष्कर प्रतापराव यास हुकूम केला कीं, बाहलोलखान आला हा चळवळ करितो यास मारून फत्ते करणें. ऐसें सांगोन रवाना केले. त्यांणीं जाऊन उबराणीस नबाब यांस फौजा चौतर्फांनीं कोंडून उभा केला. पाणी नसलेमुळें जेरीस येऊन हे आटपत नाहींत हें समजोन प्रतापराव यास सांगून पाठविलें कीं, "आम्ही तुम्हांवर येत नाहीं, पादशहाचे हुकुमानें आलों; परंतु सर्वस्वीं तुमचा आहें. महाराजांचे वचना बाहेर नाहीं." असा करार करून कुराणाची शपथ दिली आणि सल्लाह केला. तदनंतर महाराजांची फौज निघोन आली. हें महाराजांस समजलेयवरून आज्ञा पाठविली कीं, सख्य काय सबब केलें? आणि रागास आले. प्रतापराव फौजेनिशीं भागानगर चांदे देवगड शंभगिरी हा मोंगलाई देश मारून लुटून माघारे आले.

महाराजांजवळ निळो सोनदेव मजमदार होते ते मृत्यु पावले. यांचे वडील पुत्र नारोपंत शहाणे नव्हते. दुसरे रामचंद्रपंत उमदा सुलक्षण परम सुंदर बुद्धिमंत सर्वगुणसंपन्न चिन्हांकित पाहून, परम संतुष्ट होऊन बोलले जे, हा मोठे अदृष्टांचा, शहाणा, भाग्यवंत, कार्यकर्ता, धुरीण राज्याचा स्तंभ होईल. अशी परीक्षा केली. परंतु मूर्त ल्हान म्हणून नारोपंतास मजमू सांगून वस्त्रे भूषणें देऊन लौकिक संपादिला आणि स्वारीस समागमें चालविला.

मागती विजापुराहून बाहलोलखान पनाळे प्रांतीं पादशहानीं रवाना केला तो संपगांव प्रांतीं आल्याचें समजतांच महाराज म्हणों लागले कीं, हा घडोघडी येतो. मागती प्रतापराव यास फौजेनिशीं जाण्यास हुकूम केला. हुकुमाप्रमाणें जलदीनें जाऊन नेसरीवरि[29] होता त्यास गांठून मोठें युद्ध केलें. त्या लढाईंत प्रतापराव तरवारीचे वारानें ठार झाला. नवाब विजापुरास गेला. महाराजांची फौज पनाळे नजीक आली. ही खबर महाराजांस कळोन बहुत कष्टी होऊन आज एक बाजू खचली, फत्ते करणें विशीं सांगितलें तसें न करतां परत न येणेचे कारणानें खस्तें[30] करून प्राण वेंचून बरें म्हणविलें. आतां लष्करचा बंद करून चालवावें हा विचार प्राप्त होऊन दुसरा कोण करावा या विवंचनेंत महाराज लागले. तदनंतर लष्करांत येऊन कूच करून चिपळूण जागा श्रीपरशुराम आहे तेथें येऊन राहिले. फौजेची पाहणी करून लहान थोर कर्ते शिपाई लोकांस

२७. अबदुलकरीम याचें नांव बहिलोलखान.
२८. [illegible]—नजीक.
२९. "जेसरी" असेंही होईल.
३०. खस्त=श्रम, मेहनत.

खजाना फोडून वांटणी करून, सरनोबतीस योग्य अनसाजी मोहिते पागेंतील जुमला शहाणा मर्द सबुरीचा मोठा धारकरी चौकस पाहून त्याचें नांव हंबीरराव मोहिते ठेवून किताब देऊन दिलदिलासा करून त्याचे तांबीन लष्कर केलें.

दिल्लीहून बहादरखान व दिलेलखान फौजेनिशीं येऊन नगरास येऊन राहिल्याची खबर महाराजांस समजलियावरि किल्ले कोट गड यांस खबरदारीची ताकीद केली. आणि जासुदासमागमें नवाब बहादरखान याजकडे हरिजी घ्यावयास गुप्तरूपें पत्रें पाठविलीं. आणि पुढें जी तजवीज करणें ती करितां येईल म्हणोन लष्कर घेऊन मोंगलाईंत जाऊन खानदेश, बागलाण व गुजराथ, अमदाबाद व बऱ्हाणपूर व बऱ्हाड व माहूर वरकड देश नर्मदापर्यंत दाखल जहाला. जालनापूर देशांत स्वारी करून जप्ती बैसविली. मालमत्ता अगणित जमा करून चालिले. बहादरखान यांणीं फौज घेऊन हंबीरराव यांचे पाठीस लागला. तों महाराजांचे फौजेची [ गांठ ] पडली. तों मोंगल बहुत धास्तीनें घाबरा होऊन सात आठ गांवचे अंतरानें चालिला. दिलेलखान उताविळा होऊन फौजेनिशीं गांठ घातली. त्यास हंबीरराव यांणीं नजरेस न आणितां तोलदारीनें मालमत्ता घेऊन येऊन महाराजांस दिधली.

पुढें महाराजांची कीर्ति ऐकून वेदमूर्ति सकल वेदशास्त्रसंपन्न, प्रत्यक्ष वेदोनारायण, प्रख्यात तपोतेजस्वी महापांडित्य अग्रगण्य, संपूर्ण पांडित्यसमूहाचे अधिपच, द्विजकुलांत देदीप्यमान, संपूर्ण अमरांसहित अमरेंद्र मस्तकें डुलावीत आहे, त्रैलोक्यभुवनीं वंद्य, शापादपि शरादपि, जैसा प्रतिसृष्टिकर्ता विश्वामित्र, किंवा ..., पराशर, व्यास, भूरिश्रवा, कण्व, मेधातिथि, जयमिनी, ..य, कपिल महामुनी, शुक योगेंद्र,* गाधिज, मार्कंडेय, गौतम, मांडुक, पौतिक, अगस्तिच दुसरा भूमंडळाचे ठायीं, भारद्वाज, दुर्वास, भगिरथ, मांडव्य, भूतळाचे ठायीं दशग्रंथी चतुःशास्त्री प्रत्यक्ष श्रीवेदजातच

---

...च स्पष्ट मूळांत ... असें आढळतें ... ांत.

३१. ... अनसाजी ... बाबेंत.

३३. इतरत्र " हंसाजी ... तील बातमी.

३४. सबुरीचा=धिमा ... गर " असें आहे

३५. तांबीन= ... पण तें चुकीच. कारण तेथेंच बहादूरखान होता

* " तपोतेजस्वी " संस्कृत प्रौढ शब्द वापरण्याची हौस ग्रंथकार यांस फार, पण ते असे बरेच ठिकाणीं फसतात. " तपस्तेजस्वी " " योगींद्र " असें पाहिजे होतें.

३६. " शापादपि शरादपि " याचा मूळार्थ " शापानें व शरानें " दोन्हीकडून नाश करण्याची शक्ति ज्यास असे ब्राह्मण. " ब्राह्मं क्षात्रमुभे मयि " या अर्थी. येथें " मोठे शक्तिमान् " इतकाच अर्थ घ्यावयाचा.

मूर्तिमंत, स्वामींचें अकस्मात्[37] मनोजयप्राय देशावराप्रीत्यर्थ श्रीस्वर्गगामिनी भागीरथी अनुक्रमें मनकर्णिका यमुना श्रीसूर्यकन्यका प्रयागस्थळाहून भटगोसावी महातपो तेजस्वी यांचें आगमन जहालें. हें वृत्त श्रवण होतां महाराज अष्टप्रधान व मामादिक व सरदार व समस्त सेनासमुदाय [ यां ] सहित महाभेरी व नगारे व तुरतुरे, करणें माळू[38] व शिंगें व पणवा, नफेरिया, झल्लरी वाजंत्रें, मृदंग, शंख, पांवे, मोहरी[39] महावाद्यगजरें वेदशास्त्रसंपन्न राजश्री गागा भट्टजींस सामोरां जाऊन, चरणावरि मस्तक ठेवून शिरसा अभिवंदन साष्टांगें नमस्कार घालून, अत्यादरें श्रीगुरुराय मानोन, सन्मानें स्थळास आणून बिऱ्हाड अति उत्तम वास करावयास दिधलें. सर्व स्नानसंध्यादि [ कर्मे करण्यास ] यथायुक्त रमणीक स्थळ बावांस संतोषावह ऐसेंच योजून अर्पिलें. वरचेवरि परामर्ष करावया अष्टप्रधानांस आज्ञा केली जे, अणुमात्र साहित्य न्यून पडों न देतां सांगोपांग इच्छित आज्ञा करितांच शीघ्र वरचेवरि करीत जाणें.

तदनंतर दुसरे दिवशीं महाराजांनीं भटजींस राजमंदिरास नेलें. श्रीमन्महाराज मातुश्री जिजाऊ आईसाहेब यांस व सकल सौभाग्यादिसंपन्न सईबाई साहेबांस दर्शन करविलें. तदनंतर अभ्युत्थान देऊन, कनकासनारूढ करवून, संपूर्ण सेवकजनांस आज्ञा करून, पूजोपचाराचीं साहित्यें आणवून भटजींस सुगंधित स्नेहें[40] चमेली, सुगंधराज, मोगरेल, व गुलाबीअत्तर नानाप्रकारचीं व चुंवा[41], चंदन, केशर, कस्तुरी, अरगजा, मिश्रित करून उटणें केलें. तदनंतर उष्णोदकें स्नान घातलें. भरजरी तेजःपुंज महावस्त्रें चिरा[42] चादर बादली देऊन पूजोपचारास दुसरीं वस्त्रें शालजोडी इत्यादि प्रकारें कनकासनावरि रूढवोन कनकाभिषेक मुक्त माणकें पाच पेरोजें[43] लसणं,
नील प्रवाल मिश्रित करून केला. तदुत्तर सुगंधित अष्टगंधें
व कुंकुमागर व कृष्णागर, केशर, कस्तुरी, अर्पण केलें. सुमनं चंपक मालती
व गुलाब, शेवती, बकुल, पारिजातक, जाई, जुई, करवीर, कुंद व आरक्त कमळें व श्वेतोत्पलें व नीलोत्पलें व या विरहित कनकाब्जें व श्रीतुलशी द्विजराजांस
[अर्पून] महाराजांनीं पुष्पांजलियुक्त करकमलें चरणकम ... पूजिलें. तदनंतर

---

३७. मूळांत " अकमास्त " असें आहे तें हस्तदोषानें पडलें असावें.

३८. माळू=मृदंग ?

३९. " मोहरी पणवाभिदः " राज व्यवहार कोशी.

४०. स्नेह=तेल.

४१. चुवा ...

४२. चिरा=रु... ...न्याची एवजीं कलाबतू असते ... उपयोग करितात.... ...हसार.

४३. पेरोज=अस्मानी रंगाचा पाचू (?) ... ह्यांत सं... चा पागोट्यास्न विशेष. नीळ.

नवरत्नांकित मुक्ताफळें संयुक्त अलंकार व कर्णभूषणें व हस्तभूषणें व दिव्य पदकें पांच, एक वैडूर्याचें एक माणिकाचें व एक पाचूचे व नील लसणे गोमेद पुष्कराज [यांचें] व मुक्ताफळें संवेष्टित एकेक, याप्रमाणें व मुक्ताफळांच्या माळा, गोमांतकी सुवर्ण शृंखळा, पं च लू व जव्याच्या माळा व नवरत्नांकित वैडूर्य मध्यनायक रत्नें वेष्टित विराजला. कंठीं मुक्ताफळांची [माळा] लोलकसहित, तदुत्तर बाहुभूषणें व करपल्लवीं करमुद्रिका नवरत्नांकित सुतेज करचापल्य-चमत्कारें अंगठिया [दिधल्या.] तदनंतर धूपदीप नैवेद्य अर्पण करून षोडशगुणी तांबूल तबकीं भरून सन्मुख ठेवून दक्षणा होन पातशाही नाणें सुमार एक लक्ष दिधलें. तेणेंकरून भटजी चित्तापासून बहुत तृप्त जहाले. संतोषाचे उद्गार ब्रह्मांडकरंडां भरून [illegible]ले. आणि महाराजांस प्रफुल्लित मा-[illegible] तुम्ही हिंदू राजे त्रेत कृतद्वापारपासून संपूर्ण पृथ्वीचें राज्य [illegible] फेडून, त्रिभुवनीं कीर्तिस्पदता संपादिली असतां [illegible]डाला. संपूर्ण पृथ्वी यवनमय होऊन सिंहासना-[illegible]गति नाही. यजन याजन मखादिक [illegible] [illegible] प्रवर्तला. येणेंकडून धरा [illegible]न ज-[illegible]ले. पापाचरणाची अभिवृद्धि जहाली. दान[illegible] ब्राह्म[illegible]शी व श्रीदेवस्थानें व श्री[illegible] द्रव्यद्वारा संतुष्टविले. तदुत्तर संपूर्ण महास्थळांहून परम वेत्ते शिष्ट महातप ब्राह्मण पन्नास सहस्र किंवा लक्ष पर्यंत पत्रें प्रेषण करून आणिले. त्यांचा समुदाय भारी, याति भिन्नभिन्न, त्या सर्वांस शिधे व स्वदेशकांस अन्नसंतर्पण, मिष्टान्न भोजन दुग्ध व घृतपाचित सद्य ओदनें घमघमीत उष्ण भात वरान्ने विविध प्रकारचीं व फळशाखा व तैशाच भाज्या बहुत प्रकारचीं लवणें सांबारीं मेठकूट कायिका व दधि दुग्ध या प्रकारचीं षड्रस अन्नसेवनें द्विजसमुदाय अखंड समाधान पावले. ब्राह्मण घोष करून धार्मिक समाधान पावले.

तदुत्तर यथाशास्त्रे सुवर्णाचें सिंहासन सिद्ध करावयास गागाभटजींनीं महाराजांस आज्ञापिलें. तेच समयीं हुजरातीचे व देशांतील सुवर्णगार चतुर मयदानवी कला जाणते शिल्पक यथायुक्त परम चातुर्यता दाखवून सिंहासनीं हिरे माणकें पाचू पेरोज लसणे गोमेद नील प्रवाल हीं नवरत्नें व मुक्ताफळें संवेष्टित अमोलिक चातुर्यतेची निस्सीमताच केली. अष्ट सिंह अष्टस्तंभीं, तैशाच ठायीं ठायीं बैठका व पायरिया व विचित्रें रमणीक मनोरंजन विश्रांति सिंहासनाची

* चूर्ण=चुना.

यवनेश्वर औरंगजेब पादशाह हतभग्न होऊन वि लो क ना स सहजच लागेल. यवनेश्वरास एक वेळ नासाग्रीं *चूर्ण प्रताप-ऐश्वर्यं शिवनरेंद्र यांणीं लाविला पाहिजे. एवढा आमचा सर्व जनांचा हेतु परिपूर्ण केलियानें श्री संपूर्ण त्रिदशाधिप नर किन्नर भूधर पन्नगेश्वर सिद्ध चारण परम मोदार्दित होतील."

ऐसें महाराज ऐकितांच परम समाधान भटजींचे वचनावरून होऊन एतद्विषयीं मान्य जहाले. नंतर महाराजांचा वंश शोध करितां शुद्ध क्षत्री उत्तरेहून दक्षिणेस आले. हें एक घराणें उठोन आलियावरि दक्षिण काबीज केली. हे राजे चितोडकर राणे यांचे कुळींतील. यांस शास्त्रमतें राज्यपदाधिकार सिंहासन छत्र योग्य आहे. उत्तरेचे क्षत्री राजा जयसिंग व रामसिंग व भाऊसिंग व रूपसिंग व राजा मिरजा व चिमणाराजा व विरोचनराजा व गुलाबसिंग व कृष्णसिंग व पुरुषोत्तमसिंग राजा व बल्लाळसिंग व प्रेमसिंग व धर्मसिंग व ——
सिंग राजे रजपूत काश्मीर अयोध्या वरते भद्रावर [illegible]
चितोडा व भिसी या घराणियांतील क्षत्रियांस व्र[illegible]
[illegible] केला. याजकरितां व्रतबंध क्षत्रियांस ये[illegible]
स्तव म[illegible]जांचा व्रतबंध करावा म्हणजे [illegible]
जहालियाविना छत्रसिंहासनास अधिकार ना[illegible]
[illegible] गोप्रसव करून व्रतबंधयुक्त [illegible]
[illegible] हाहाकारे जहा-
छत्रचामरें व आतपत्रें व मयुर[illegible]संतर्पणें [illegible] व वाळ्याचीं व्यजनें यवनास उद्युक्त जहालीं. छत्रे यवनाचे मस्तकीं विराजलीं. याजकरितां अवतार तुज श्रीभवानीशंकरांनीं या धराभुवनीं निर्माण केलें आहे. तुम्हीं पराक्रमें दक्षिणेतील चारी पादशाह प्रतापें जिंकिले. तदनंतर दिल्लीचा औरंगजेब सार्वभौम यास ठायीं ठेविला. संपूर्ण पादशाही सुभे दक्षिणेंत आले ते बुडविले. आणि नेस्तनाबूद केले. तेणें पादशहाचें बळ अगदीं कमी होऊन विचारी पडला. धन्य तुमचे पराक्रमाची! संपूर्ण धरा जिंकून जनेश्वर तुम्हीच प्रमाण. यास संशय नाहीं. लक्ष घोडा व तीनशें साठ किल्ले व मुलूख व साधनसंपदा अमोघ असतां तुम्हांस तख्त नाहीं. यास्तव तुम्हांस तख्तारूढ करावें, संपूर्ण अधिपाधिप तुम्हांस याजमीं छत्रपति म्हणवून तुमचें राज्य व्हावें, ही इच्छा मनापासून उत्कंठीत जहाली आहे. राजा, तुम्ही सिंहासनाधीश्वर जहालियाविना जगीं भूषण प्रताप नाहीं. एतद्विषयीं ईर्षा संपूर्ण ब्राह्मणवृंदास लागली आहे. येणेंकरून

४४. कर्णमात्रा—कानांतील मुद्रा.—भिकबाळी, चौकडा इ०. हस्तमात्रा=हस्तमुद्रा, आंगठ्या इ०.

४५. "नेस्तनाबूद"=नाईनाट.

ठेवी निर्मिली. सुवर्ण वजन परिमित तीन खंडी बत्तीस शेर व बत्तीस मासे, तिलकियांतच संपूर्ण रचना चित्रविचित्र तरू फलें पुष्पें सहित वल्लरी विविध प्रकारच्या व बुट्टे चौकडिया पुष्पें भातभांतीचीं[४६] तैशींच पक्षिकुळें हंस मयूर व मैना नुरियाँ[४७] बदकें रावे व बहिरी-बाज कबुतरें लगड लाहावे तित्तुर मुजिया चंडोल चिमणिया व कोकिला, कांडेसर तैशींच श्वापदें चित्ते, शागोष, हरणें, सांबरें, शशक, सिंह, शार्दुल, चितळें तैशींच बत्तीस पुतळिया व अश्व गज हीं सांगोपांग निर्मिलीं. पुतळ्या मनुष्याकृति परम सुंदर अवयव भिन्न भिन्न स्वदेशींच्या तैशाच गोमांतकी लावण्यलतिकाच कटाक्ष नटनाटक संगीत तंतुवाद्यें घेऊन उभ्या ठाकल्या. इत्नी कळाशी शिल्पिकें दाखविली. सजीव मच्छ ऐसा भाव तैसेच कूर्म हींही जळचं ठायीं ठायीं निर्मिलीं. यदर्थी चतुरें संक्षेपें[४८] न घ्यावा. फिरंगी पूर्तकाळी चि , कारागिरी चातुर्याचें कसब अधिक कुशलता आहे. यदर्थी लेखकास दूषण न ठेवावें. नवरत्नें युक्तायुक्त स्थळीं कोंदणीं चातुर्यतेनें सांगोपांग गोचर त्यास सप्रिग रूढवून अचल कलिमकें राजवाटिकाहीं सिंहासनीं अति उल्हासें निर्मिली. महाराजांचे आरूढतेचें स्थळ अष्टपैलू कंठबाकार रत्नखचित पाचू वैडूर्य माणिक नीळ हीं महारत्नें ठायीं ठायीं दैदीप्यमान उडुगणप्राय विलोकित न साक्ष नच. चौकटिया चौफेरा तसैच वोठंगणें[४९] हींही जडित योग्यतेन्वीं ठायीं ठा ेड कि या निर्मोन जडिलें. सिंहासनाचे वोट्यावार उत्तम पंच कमलें अष्टपे र्णाचीं जडित नवरत्नाचीं सिद्ध जहालीं. रायरी किल्लियाचें नांव रायगड ठे. . महाराजांचें तख्तायोग्य गड सुभावना[५०] बांका, दुजी दौलताबादच विलोकितां, किंवा दौलताबादेपेक्षांही अधिकोत्तर, महाराजांनीं चित्तानुरूप तख्तास करार केला. उपसाहित्यें शास्त्रसंमताप्रमाणें गागाभटजींचे आज्ञेप्रमाणें आणविलीं. अष्टोत्तरशत तीर्थोदकें येणेंप्रमाणें नांवनिशीं, श्रीभागीरथी गया यमुना प्रयागतीर्थ सरस्वती कंबुग्रीवा शोणभद्रा शिवभद्रा पुष्कराजतीर्थ पयोष्णी चंपावती मनकर्णिका शरयू गंडकी कूर्मावती वैतरणी जयंती पिनाकी कपिला अघनाशिनी नीलिनी अर्चनी धर्मणी कुंकुमती भद्रावती तापी नर्मदा महिकावती गरुडगंगा सिनावती नीलगंगा कमलावती सर्वराजतीर्थ गौतमी गदातीर्थ भीमा चंद्रभागा हयग्रीवा इंद्रायणी घृतवती श्री कृष्णा वेणा करा तारकानदी हैसवती वारुणावती पंचगंगा रंकतीर्थ जयंती गोमती पद्मावती कोटीतीर्थ व लक्षतीर्थ बेदावती दुग्धावती भोगावती

---

४६. भातभातीची=जातीजातीचीं.

४७. नुरिया=पोपटाच्या जातीचा एक पक्षी.

४८. "आक्षेप" ह्याअर्थी.

४९. ओठंगणें=टेंकण.

५०. सुभावना=सुंदर, सुरेख.

वाराणशी, घटप्रभा, मलापहारिणी, वशिष्टाश्रमतीर्थ तुंगभद्रा कावेरी फल्गू वरदा मंदाकिनी गायत्री सावित्री बाणगंगा कुशावर्ततीर्थ मैनावती द्वारावती धनशयगंगा पर्णावती कोनेरीतीर्थ चर्मिणी मत्स्यगंगा मुक्ततीर्थ वराहगंगा पितृउल्हासिनी, नरसिंहतीर्थ, मंदारतीर्थ, लोणारतीर्थ पापनाशिनी महंकावतीतीर्थ नारायणतीर्थ पापहारणा, चक्रतीर्थ, पुष्पावतीर्थ, व्यासवती, आकाशगंगा, वामवती, शिवनदी, रामतीर्थ, व सरोवरतीर्थ, व महासमुद्र तीर्थराज एकूण अष्टोत्तरशत घट सुवर्णाचे भरून नृपास अभिषेकास सिद्ध केले.

तदनंतर अष्टभागीं कलशांस सुवर्णाचे तांब्रे केले व संपूर्ण सिद्ध ब्राह्मण वेदस्मृति पारंगत तपोतेजस्वी अपर सूर्य, भानु, अग्न्यादपि शारादपि ब्राह्मणांनीं व अष्टप्रधान यांणीं आम्रपर्णसंयुक्त उदक सुवर्णकलशीं भरून राजे यांचे वेदोक्त मंत्रेंकरून मस्तकीं अभिषेक केला. तदनंतर यथाविधि उत्तम नक्षत्र पाहून चंद्र गुरु योगिणी यथास्थित विलोकून, घबाड वोहरा अमृतसिद्धियोग ज्येष्ठमास शुद्ध त्रयोदशी मंदवासर आनंदनाम संवत्सरीं परम सुमुहूर्तीं महाराजांस मंगलस्नान करवून तदुत्तर श्रीशंभुमहादेव श्रीतुलजाभवानी कुलदैवत कुलगुरु व वेदशास्त्र परायण समस्त श्रेष्ठ श्रेष्ठ गागाभट व महातीर्थींचे ब्राह्मण अपरसूर्यांचे पूजन नवविधा भक्तीनें करून दिव्य अलंकार वस्त्रें दक्षणा समस्तांस अर्पण करून त्यांस सांष्टांगें चरणीं अभिवंदोन नमस्कार केले. तदनंतर महाराजमस्तकीं पुन्हा पट्टाभिषेक ब्राह्मणांनीं व अष्टप्रधानांनीं महातीर्थोदकें क्षेत्रोक्षेत्रींचीं सुवर्णकलशीं भरून ठेविलीं होतीं त्या उदकेंकरून मंत्रोच्चारें अभिषेक केला. तदनंतर पोषाक दिव्य भरजरी, बादली मंदील, अंगझोळेंही[५१] बादली, व चादरही भरगच्ची बादली व पटका बुट्टेदार व सुरवार किनखापी व अलंकार मस्तकीं कलगी सलंब व मुक्ताफलांचा तुरा, शिरोपेंच जडित वैडूर्याचा व कर्णमात्रा हुरमुजी मुक्ताफलांच्या, तदनंतर कंठाभरणें कंठीं मुक्ताफलें वेष्टित लोलकसहित सुतेज विराजलीं. व शुद्ध मुक्ताफलांच्या माळा व सुवर्णगोमांतकी सलाख व जव्याच्या माळा व मोहनमाळा नाभिपदक नवरत्नांकित-मध्यें नायक पाचूचा जैसा उडुगणसमूहांत पूर्ण कलाधर[५२] तद्वतच नवरत्न मुदांत अमोघ प्रभेनें शोभायमान पावला. कटिसूत्रीं गोफ रत्नजडीत पंचलडू विराजला. व हस्तकीं शुद्ध वैडूर्य व पाचूजडित व मुक्ताफळें संवेष्टित सर्जाचीं हस्तकडगें हस्तकीं घातलीं. व जडिताचीं बाहुभूषणें व हस्तपल्लवीं अंगोठिया नवरत्नांकित हस्तचांचल्यकरितां चंद्रिकाच तेजसमान. भाळीं केशरी आडवें गंध व कस्तुरी अक्षत व गंधातलवटीं शाम टिकली व नानाप्रकारचीं परिमल

५१. अंगझोळ=आंगरखा. | ५२. कलाधर -चंद्र.

द्रव्यें गुलाबीअत्तरादि कुंतलीं लाविलीं. अबीर अरगजासहित व गुलाबी उदकें वस्त्रावरि सान सान तुषारें सिंचलें. आधींच महाराज परम सौंदर्य सुकुमार द्वितीय प्रभाकरच नवरत्नांकित अलंकार हेमवस्त्रें दैदीप्यमान विद्युत्प्रभेतुल्य, महाराजांस विलोकितां संपूर्ण जननेत्रांस अपूर्वावह भासून समस्तांचे चक्षु भृंगप्राय जहाले. आधींच महाराज बत्तीस लक्षणी सांगोपांग सौंदर्य गौरवर्ण विराजले. भाल उत्थान, भृकटी धनुष्याकृति, सुरेख सलंब चक्षु व उँक्ष-नयनातुल्य, महाराजांचें आनन वर्तुळ चंद्रबिंबातुल्य, दंत आरक्त शोभायमान सुतेज वैडूर्य कणच, तैसेच ओष्ठ आरक्त समसमान हनुवटी रेखित. तैसेच कर्ण सलंब त्वचेंतून तमारिप्रभा गोचर होऊन येत आहे. तैसेंच  रस्थान प्रशस्थ. बाहु-दंड गजशुंडप्राय व कटी सिंहाकृति. तैसेंच करपल्लव पंक  पासमान. तैशाच जानुजंघा चरणकमलें आरक्त शेंदूर वर्णातुल्य. ऐसें महाराजां  शरीर स्वयं हस्तकें हर्षोत्कर्षचित्तें विधिनेंच निर्मिलें. महाराज अवतारी श्रीविष्णुअंश जगपालनास वैकुंठभुवनाहून या मृत्युलोकाचे ठायीं आगमन मन्वाकृति केलें. महाराज विष्णुस्वरूपें विराजले हें प्रमाणच स्वयं भगवानच वदोन गेला. यद‍् बचन. "नराणांच नराधिपं." हें अनृत म्हणावयास विधीसही सामर्थ्य नाहीं. तेथें इतर मानवी जनांस कोठील ? यदर्थीं श्लोकः—

> शीवाजी नृपती समर्थ  वनीं श्री विष्णुची साम्यता ॥
> ऐसें श्री विधि बोलता  दिनीं आहे सदां योग्यता ॥
> झालें पातक आगळें [illegible] संपादिलें ॥
> दुष्टां संहारिलेंच जाण नि [illegible] ॥
> शहाजीचा सुत हा महेंद्र अवनीं सर्जा शिवाजी सदां ॥
> कीर्तीची गरिमा भरोनि उरली अन्यत्र नाहीं कदां ॥
> जैसा कर्णहि धर्म भूपति [ तसा ] त्यां तुल्यता हा असे ॥
> सर्वज्ञांबुनिधी निरूपम जगीं सौंदर्यता वीलसे ॥ २ ॥

ऐसा महाराज गरीबनैवाज सिंहासनारूढ व्हावयासि सिद्ध जहाले. ते समयीं समस्त पूज्य ब्राह्मण समुदायासि वंदोन श्रीमन्महाराज मातोश्री जिजाऊ आईसाहेब यांचे चरणावरि मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार घातला. आईसाहेबांनीं दयाहस्तक मस्तकीं ठेविला. यदर्थीं श्लोकः—

> बापा तूं शिवबा प्रतापनिधि रे सिंहासनीं रूढणें ॥
> शत्रू जिंकुनि आवघे अतिरथी दुष्टांसि निर्दाळणें ॥
> श्री अंबावरदें जयासि वरणें साम्राज्य कीजे सदां ॥
> देवब्राह्मणपूजनीं रत असें अन्यत्र नाहीं कदां ॥ १ ॥

५३. उक्ष=वृषभ. * गरीब-नवाज=गरीबांवर कृपा करणार.

शिवबा तूं अवरंगजेब निकरें दंडीं प्रतापें रणीं ॥
दिल्ली घेउनि सिंहासनावरि रुढें तात्काल येचक्षणीं ॥
श्री तुळजा कुळदेवते स्मरुनियां सत्कीर्ति संपादिजे ॥
स्वकरें शस्त्र धरूनियां निजबळें धार्मीकता रक्षिजे ॥ २ ॥

याप्रमाणें आईसाहेबांनीं आशीर्वाद दिधला. मातुश्री साहेबांची आज्ञा घेऊन सिंहासनारूढ व्हावयास वेदशास्त्रसंपन्न समस्त ब्रह्मवृंदांनिकटीं महाराज शिवनृपाल आले. नंतर त्यांणीं मस्तकीं दयाहस्त ठेवून, आशीस् वेदोक्त मंत्रोच्चारें देऊन, पीत अक्षता मस्तकीं हर्षोत्कर्ष मानसें सिंचिल्या. नंतर समस्त ब्राह्मणांची सिंहासनारूढ व्हावयाविशीं आज्ञा घे. तदनंतर श्रीभवानीशंकराचें व वडिलांचें स्मरण करून, सिंहासनास साष्टांग नमस्कार घालून, श्री छत्रपति नरचूडामणि हिंदुपति पादशाह सिंहासनारूढ जहाले. ते वेळीं लक्ष लक्ष ब्राह्मण मंत्रघोषाचा उच्चार करून जयजयकाराची ध्वनी केली. सर्वांस परमानंद याच्या कोटीच जहाल्या. कित्येक महाराजांस सांडणीं बलैंय दूर केल्या. नवरत्नादि मुक्ताफळें व सुवर्णकमळें पुष्पें विविध आमोदित सुमनें चंपक मालती व जाई जुई शेवती व बकुल पारजातक व गुलाब व नीलोत्पलें व सीतोत्पलें व आरक्तोत्पलें व अनेक भातींभातींचीं सुमनें व [illegible] त्रे विविध प्रकारचीं आणिलीं. द्व य पा व क या कलियुगीं द्वितीय असाध [illegible] ग शौर्यकर्माचरणें महाराजांनीं संपादन केलीं. तख्त म्हणजे [illegible] गागाभटजींनीं प्राप्त केली. नरेश्वराभिधान महाराज पावले. [illegible] स्तंभ सुवर्णमंडित रत्नखचित विराजले. त्यास्तंभीं अष्टप्रधान उभे ठाकले. पूर्वी कृता त्रेता द्वापार युगाचेंठायीं.

श्री

श्रीस्वस्तिश्री राज्याभिषेक शकें १ आनंदनाम संवत्सरे ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शिवछत्रपति सिंहासनाधीश्वर जहाले."[५६]

पद्धतीप्रमाणें षोडश महादानें इत्यादि केलीं व सुवर्णसुमनें व आमोदित सुमनें महाराजाचे मस्तकीं अभिषेकप्राय घातलीं. महाराज सिंहासनदीक्षा ग्रहण संपादून क्षितींद्र विराजले. धन्य शहाजीराजे भोंसले व जिजाऊ आईसाहेब! या कलियुगीं अन्य तुलनेस नाहीं. शिवाजी महाराज विष्णु अवतारी. " नाविष्णुः

५४. सांडणी=ओंवाळून टाकिलेले पदार्थ. बलाय=आलायबलाय, दृष्ट.

५५. भातभातीची-अनेक जातींची.

५६. या शब्दापुढें सुमारें ४।६ बोटें रुंदीची जागा कोरी सोडून मग पुढील मजकूर लिहेला आहे. ही जागा चित्र काढण्यासाठीं टाकलेली असावी.

पृथ्वीपतिः " यांणीं मन्वाकृति अवतार पितामाता यांचे उदरीं धरून कीर्तिध्वजा अवनीतळवटीं लाविल्या. जैसा श्री कौसल्यातनय श्रीरामचंद्र कीं देवकी उदरीं श्रीकृष्ण, तदनंतर कुंतीपुत्र धर्मराज, भीमराज, अर्जुन किंवा गांगेय भीष्मराज, तद्वत् जिजाऊ उदरीं शिवनृपाल नरचूडामणि विराजला. विक्रमोपराक्रमी अमानुषी स्वर्गीं श्रीदेवेंद्र अमरांसहित व किन्नर गंधर्व व सिद्धचारण व पवनाशनेंधिप[५७] व असुर व ऋषेश्वर व स्थावरजंगमादि अंतरिक्ष लोक आदीकरून परमानंदें राज्याभिवृद्धीस्तव आशीर्वाद अर्पिले. पुण्यश्लोकी शिवाजी महाराज छत्रपति अधिपाधिप होऊन सर्व जनांस संतोषविलें. पुण्यश्लोक राजे सूर्यवंशी ऋतुपर्ण, दशरथ अज दिलीप व रघु तदनंतरि रामचंद्र व सोमवंशीभरत, ययाति, नहुष, मांधाता, शिबी चक्रवर्ती धर्मराजे यवनाश्व व मयूरध्वज, नैषध, व हरिश्चंद्र[५८] व विक्रम भूप शालिवाहन कानडाराजा भवर या पद्धतीनें शास्त्रमर्यादेनुरूप शिवाजी महाराज छत्रपति सिंहासनाधीश्वर न्हाले. त्यापद्धतीप्रमाणें अष्टस्तंभीं अष्टप्रधान बद्धांजलि उभे ठाकले. उजवे बाजूस धर्माध्यक्ष पंडितराव. डावे बाजूस मुख्य प्रधान. तदनंतर त्यां खालते स्तंभीं उजवे बाजूस सेनापति. डावे बाजूस मजमदार. उजवे बाजूस सुमंत पर मुलकी. डावे बाजूस सचिव. त्या खालते उजवे बाजूस मंत्री म्हणजे वांकनीस. डावे बाजूस न्यायाधीश. एकूण अष्टप्रधान येणेंप्रमाणें पद्धतवार लिहिले. असें महाराज तख्तारूढ लियावरी अष्टप्रधान तत्पर केले. येणेंप्रमाणें नांवनिशी बीतपशील.

| [ डावी. ] | [ उजवी. ] |
|---|---|
| १ मोरो त्रिमल मुख्य प्रधान. | १ रघुनाथ पंडितराव राजाध्यक्ष. |
| २ रामचंद्र निळकंठ अमात्य मजमदार. | २ हंबीरराव मोहिते सेनापति. |
| ३ अण्णाजी दत्तो सुरनीस. | ३ त्रिंबक सोनदेव सुमंत म्ह० डबीर. |
| ४ निराजी रावजी न्यायाधीश. | ४ दत्ताजी त्रिमल वांकनीस. |
| ४ | ४ |

८

एकूण अष्टप्रधान महाराजांनीं नूतन स्थापिले आणि नांवें ठेवून शास्त्रसंमतें स्तंभ नेमून दिले. त्याप्रमाणें ते उभे ठाकले. बाळाजी आवजी प्रभु चिटणीस व निळकंठ येसाजी प्रभु पारसनिवीस व जसाजी प्रभु सबनीस व दादाजी प्रभु निंशिंदे[५९] वसनागार व यादव काकाजी निशिंदे समस्त कारखाने यांचा,

५७. पवनाशन=सर्प. त्याचा अधिप शेष
५८. हरिश्चंद्र तर सूर्यवंशी होता.
५९. निशिंदा=निविसिंदा=लिहिणारा.

अष्टप्रधान यांचे मुतालिक व हुजरे प्रतिष्ठित व वाडियांतील मुलें व वरकड बाजें लोक सर्वही ययापद्धतीप्रमाणें सर्वही उभे राहिले. छत्र जडावाचें व सभोंवती मोतीलगझझ्लरीसंवेष्टित महाराजांचे मस्तकावरि धरिलें. छत्रपति ऐसें नांव जगीं समस्तांस आणविलें. सिंहासनाधीश्वर जहालियाची नवीन सुवर्णाची नवरत्नांकित मुद्रा केली. महाराजांनीं नवीन शिवशक धराभुवनीं प्रगट केला.

पूर्व राज्यपद्धतीप्रमाणें वेदशास्त्रसंपन्न गागाभटजींनीं समस्त ब्राह्मणांचें संमतें निर्णयार्थ करून राजपत्र लिहावयाची पद्धत केली येणेंप्रमाणें:—

स्वस्तिश्री राज्याभिषेक [ शके ] आनंदनाम संवत्सरे ज्येष्ठ शु॥ त्रयोदशी मंदवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिवछत्रपति सिंहासनाधीश्वर स्वामी यांणीं समस्त-राजकार्य-धुरंधर राजमान्य राजश्री मोरेश्वर पंडित प्रधान यांसि आज्ञा केली ऐसीजे. येणे प्रमाणें बाकीचें सप्तप्रधानांस लिहावयाची पद्धत. सेनापति समस्तसेनाधुरंधर याप्रमाणें राजपत्रें. तदनंतर मध्यमास राजमान्य राजश्री व कनिष्ठास कोनांडियाचे बाजूस पेशवे यांचा शिका व खालतें महाराजांचें मोर्तब. ही सेवक लोकांची पद्धत. व वैदिक ब्राह्मणांची पद्धत, सकलशास्त्रसंपन्न राजश्री गागाभटजी स्वामीचे सेवेशीं प्रति राजश्री शिवछत्रपति कृतानेक साष्टांग दंडवत प्रणाम. व जटिल गोसावी यांसि श्री गुरुमूर्ति तपोनिधि हणमंतगिरि यांसीप्रति राजा शिवछत्रपति सिंहासनाधीश्वर नमोनारायण. मग मजकूर लिहावा. वतनदारास व देशमुख व दे[illegible] , यांसि कोनाडियाचें पत्र तीन ओळी संपूर्ण चवथा ओळ तीन रकानें [illegible] नाडेस जागा ठेवावा, तेथें पेशव्यांचा शिक्का व खालते महाराजांचें मोर्त[illegible] परगणियास व गांवास अभयपत्र येणेंप्रमाणें. महाराजांचा थोरला शिक्का काग[illegible]ाचे माथां मोर्तबाखालते कोनाडेचा कागद बाजूस शिक्का पेशवेचा, ज्रोडगिरी कागदाची असेल तेथें पेशवे यांचें मोर्तब. येणेंप्रमाणें होऊन कागद लखोटे करून रवाना करावे. स्वतिश्री राज्याभिषेक शके १ आनंदनाम संवत्सरे ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी मंदवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति सिंहासनाधीश्वर स्वामी यांणीं देशमुख व देशपांडे परगणे जालनापूर सरकार दौलताबाद यांसि आज्ञा अभयपत्र ऐसाजे ऐशी पद्धत. अशा पत्रावरि निशाणें सप्त प्रधान यांचीं, शिक्का पेशवे यांचा. सरकारकुनास निशाण मुजुमदाराचें, बहुत लिहिणें तर सुज्ञ असा. सचिवाचे बार व बार मजमूचे समंत मंत्री यांचे बार, येणेंप्रमाणें कोनाडियाचे कागद पावणा. रकान्यांत महाराजांचें नांव आणूं नये. नांव आलें तर कागद फिरला. परमुलखास वरचे नांवचीं पत्रें, पाळेगारांस व मांडलिकराजे यांसि प्रति उपरि

६०. कोनाडा=कोपरा.

म्हणोन म्हणावें. दकारी कागद लिहावें. याप्रमाणें पद्धत. तदनंतर मजमूचें अंगभूत चिटणीस परंतु चिटणीस म्हणजे महाराजांचे अभिमुखकमल. बाळाजी आवजी यांजवर कृपा. ते लोक विश्वासू व लिहिणेंही जिव्हाळियाचें. धंदा मजमूकडील. फडणिशीचा व चिटणिशीचा कायदा. त्या अन्वयें पत्रें लिहावीं. येणेंप्रमाणें कोणा एकास गांव व जमीन इनाम दिल्ही नाहीं किंवा दिधलियां महाराजांचा माथे शिक्का याची सनद त्यांचे नांवें फडणिसांनीं लिहावी दुसरें पत्र लिहूं नये. देशाधिकारी व जिल्हेदारास व गांवास पत्रें चिटणिसांनीं लिहावीं. वरकड स्वराज्यांतील जाबसाली चिटणिशीकडील पत्रें व गडकिल्ले यांसि पत्रांचे जाबसाल गडनिसांनीं लिहावे. तदनंतर परकी राज्यांतील पत्रें दबीर यांणीं लिहावीं. पारसनिविसांनीं पादशाहास व वजिरास व बाजे मुसलमान नबाब व संस्थानी असतील त्यांस लिहावीं. तदुत्तर ब्राह्मणांस पत्रें पंडितराव यांनीं लिहावीं. व इनसाफ मनसुफी हिल्लाहरकतीमुळें जे निवडेल त्याचा मोहजर मात्र न्यायाधीश यांणीं लिहावें. ताकीदपत्रें न लिहावीं. हा चिटणिसांकडील कायदा. गडकरी यांचे नांवचीं उत्तरें मात्र गडनिसांनीं लिहावीं. हवालदार व कारखानीस व सबनीस जे दिवाणनिसबतीचे मामलेदार आहेत त्यांस पत्रें चिटणिसांकडील. हा कायदा समस्तांस समक्ष महाराजांनीं करून दिधला. त्यांचे त्यांनीं करा रे करावे. सर्वांनीं एकरूप असावें. कायदे करितां फाट घ्यावयास प्रयोजन को[illegible]ी नाहीं. ही महाराजांची मुख्य आज्ञा. हा पाया राज्याचे बंदोबस्ताचा घा[illegible].

तदनंतर संपूर्ण रयतेस पाचारून कौल दिधला. येणेंप्रमाणें व्यवस्थायुक्त महाराजांनीं केलें. यदर्थी श्लोक:—

शीवाजी नृपती प्रतापनिधि हा सिंहासनीं रूढला ।
जैसा विक्रम भोज जाण अवनीं अत्यंत वीराजला ॥
पृथ्वी जिंकुनि सार्वभौम पद हें संपादितों निश्चयें ।
नाहीं पीडणही प्रजांस अगदीं व्हावें तुम्हीं निर्भयें ॥ १ ॥
जाणा धर्महि नैषधापरि असे शाहूजी सुनू भूपती ।
कीर्तीची गरिमा भरूनि उरली आमोघता ये क्षिती ॥
प्यारे कौल प्रजांप्रती वदतसे म्हाराज अत्यादरें ।
न मनारे भय अंतरीं अनुदिनीं दंडीन दुष्टां त्वरें ॥ २ ॥
शीवाजी नृपती समर्थ भुतळीं मानूं नकारे भया ।

---

६१. हिल्ला हरकत=अडथळे.
६२. माहजर, महजर—निवाडापत्रक, मिनिट.
६३. फाट=तुटातुट, भांडण.

दिल्हा कौल प्रजांस जाण प्रभुनें आमोघ केली दया ॥
पाच्छाचा शक मोडिलाच निकरें चिंता न कीजे मनीं ।
कीजे कीर्दे[६४] महामुरीच चपळें दीवा सदा यामिनी ॥ ३ ॥
शीवाजी [ नृपती ] प्रजांस वदतो घ्या कौल माझा क्षणी ।
तुमच्या रे प्रतिपालनास अवनीं म्हाराज मी रे धणी ॥
दिल्लीपासुनि जिंकिलें निजबळें हें राज्य जाणाच रे ।
केला हीन हि पाच्छहा मुढमती श्रीअंबिकेचे वरें ॥ ४ ॥
जोडोनी कर आवघ्याच वदती जाणा प्रजा भूपती ।
श्रीरामें वर दीधलाच सदयें पाहें बहुतां रिती ॥
तैसें पालन ह्या जगींच करणें हे प्रार्थना जी पदा ।
कीर्तीची गरिमा भरूनि उरयी अन्यत्र नाहीं कदा ॥ ५ ॥
श्रीरामावत कौल देउनि आम्हां संरक्षणें भूपती ।
धार्मीका गुण-सागरा प्रभु जगीं ऐशा प्रजा बोलती ॥
पडतां संकट दर्शनास चपळें द्यावें आम्हां सर्वदा ।
कीजे दाद विलंबता च नलवीं ही प्रार्थना जी पदा ॥ ६ ॥
देणें कौल असाच जाण अमुतें म्हाराज चूडामणी ।
भूपा क्लेश हरूनियां सुख दिजे तं .क चिंतामणी ॥
इत्यादीकहि सेवकांकरिं अम्हां नको सर्वथा ।
तूझा कौल नृपा कदापि न कि. भूमंडळीं हो वृथा ॥ ७ ॥
ऐकूनी शिवभूपती वदतसे जाणा प्रजांतें अती ।
चिंता हे न किजे कदापि हृदयीं अन्यत्र नाहीं गती ॥
ऐसें बोलुनियां सनेम वचनें संतुष्टवीली प्रजा ।
माथां ठेवुनि हस्तकासि सदयें दिल्ही समस्तां रजा ॥ ८ ॥
असा कौल [ तो ] देउनीयां प्रजांला । नृपा अंतरीं तोष अद्भूत झाला ॥
प्रभूची लिला वर्णिली चित्रतेनें । अती आदरें हो रघूनाथजीनें ॥ ९ ॥

[ नंतर ] संपूर्ण सेवक लोकांस महाराजांनीं ज्यांचीं स्वरूपें [ जशीं ] तदनुरूप गौरव केला. संपूर्ण ब्राह्मणांस पात्रापात्र पाहून अपरमित द्रव्यदक्षणा दिधली व अनुपदें वस्त्रें भूषणें दिधलीं. कित्येकांस इनामत अजरामर गांवें व भूमि करून दिधली व समस्त ब्राह्मणांस षड्स भोजनें घालून प्रार्थना केली कीं, आम्हांस व राज्यास कल्याण चिंतून वृद्धीतें पाववावें. तें समयीं समस्त ब्राह्मणवृंदांनीं मंत्रोच्चारें कल्याणप्रदतेस आशीर्वाद अनेक दिधले. महाराजांनीं मस्तकीं वंदिले

६४. कीर्द=जमीन लागवडीस आणणें.

नंतर समस्तांस सन्मानयुक्त निरोप दिधले. तसेंच दर्शनाम संन्यासी व शेवडे जंगम जोगी फकीर बहुरूपी भाट गवई व डैंवरे ह या सु मागधजनास वस्त्रें व द्रव्यद्वारा खैरात देऊन समस्तांस संतुष्टविलें.

नंतर या समर्थ कार्यास अध्वर्यु महाऋषींसमान व्यासोंनारायण वसिष्ट, भारद्वाज, अत्रि, वामदेव, मांडव्य यद्वत [तद्वत्] सकलवेदशास्त्रसंपन्न राजश्री गागा भटजी. दीक्षाग्रहणीं गुरुवर्य यांची नवविधा पूजा करून कनकासनीं रूढवोन नवरत्नें मुक्ताफळें व सुवर्णमिश्रित अभिषेक केला. तदुत्तर गंधाक्षता परिमलद्रव्यें व विविधप्रकारांतर मोदित सुमनें व सुवर्णकमलें [यांणीं] पूजा केली व दिव्यवस्त्र अलकार रत्नखचित लखलखीत त्रिषुप्रभेप्राय किंबहुना चंद्रिकेप्राय ज्योत्स्नाप्रकाशक अर्पिली. व सुवर्णनाणें होन सुमारी १००००० एक लक्ष दिधले. या विरहित याज्ञिक संबंधे दक्षणा होन सुमारी ६०००० साठ हजार-तदनंतर वारू अरबी सुमार १० दहा व हत्ती पलखदंती सुमार २ दोन व छात्रा १ एक व पालखी १ एक व चामरें दोन तदुत्तर सुवर्णकलश १० दहा व समया रुपेच्या ३ तीन सुवर्णताटें दोन व रुपेचे हांडे दोन व तांबेचे सुमार ५ पांच व रुपेच्या घागरी सुमार ५ पांच व सुवर्ण तबकें ३ तीन व रुपेचीं ताह्मनें सुमार ५पांच. अलंकार कलग्या २ दोन व मोतियांचे तुरे २ दोन व शिरोपेच जडिताचा १ एक व कंठी जडिताची १ एक व मोतियाची एक एकूण दोन व मोतियांची माळ १ एक व जवांची १ एक व पदकें ३-पाचूचें १ एक वैडूर्याचें १ माण... ...तीन व कर्णभूषणें चौकडा एक व हस्तकडीं जडित नवरत्नखचित एक व साधी जोडी १ एक एकूण जोड दोन व अंगोठिया सुमार पांच नडावाच्या व सनगें एक कळस्पाकी व एक बादली भरजरी व एक बळींवगची सोनेरी व एक रुपेरी जरी व एक साधा एकूण जोड दोन व शालजोड्या सुमार ५ पांच व पाटावे सुमार ५ पांच येणेंप्रमाणें वस्त्रें व शेजेस जमखीने सुमार ५ पांच व तिवाशा ५ पांच व लेपें सुमार ५ पांच व पलंगपोस ५ पांच तदनंतर मंचक रुपेचा एक व म्हैशी सुमार २५ पंचवीस व गाई सुमार ५० पन्नास व दासी सुमार १० दहा व धरादत्त इनाम गांव सुमार १० दहा गंगातीरीं व कृष्णातीरीं याप्रमाणें संभावना महाराजांनीं अतिहर्षोत्कर्षे केली. एक वर्षपर्यंत ब्राम्हण समुदाय घृतदुग्धपाचित षड्रसान्नें कडून संतुष्टविले. तशीच दानदक्षणा भूमिग्रामअर्पण पुत्रपौत्रीं करून धर्माधिपच या कलियुगीं महाराज जहाले. कर्णादि, विक्रम, भोज, दिलीप, रघु,

१५ बहिरोबाचा किंवा जोतिबाचा भगत तो "डवर."

१६. जमखाना=सत्रंजी, गालिचे.

पंडुपुत्र धर्मराज यांणीं महाराजांचें कौतुक विलोकून मस्तकें डुलविलीं. ब्राह्मणद्वारा महाराजांनीं महायाग संपादिले. चंडिका व कोटी वाजपेयें व सोमादिक यथाविधि संपादिले. संपूर्ण श्रीदेव अग्निमुखें तृप्तता पावले. दीक्षाग्रहणीं यज्ञकंकण महाराजांनीं धर्मनृपप्राय किंवा जनमेजय व धु बं ध न करून याग सिद्धीस नेले. मख कर्मादि [ यास ] अध्वर्य गागाभटजी व्यासासमान, प्रत्यक्ष वेदोनारायण, तदनंतरी शापादपिशारादपि वेत्ते ब्राह्मण ऋत्विज श्रुति पारंगत यागीं अग्रगण्य होऊन स्वाहा स्वधा घोषें वेदज्ञात तृप्तीतें पावले, श्रीदेवंता सानुकूल जहाली, महाराजांचे इच्छित मनोरथ सिद्धीस अंबेनें पावविले, जैसा धर्मराजें राजसूय यज्ञ संपादिला, किंवा रघुराजें धरा दत्त करून संपूर्ण धरा ब्राम्हणांस दान दिधली, किंबहुना जनमेजयांनीं सर्पसत्र अचंब संपादिलें यद्वत् [ तद्वत् ] कलयुगीं महाराजांनीं दानधर्मांची निस्सीमताच केली. महाराजांची धन्यता भोंसल्याच्या कुळीं प्रत्यक्ष श्रीविष्णु अवतारी सर्व यवन औरंगजेबासहित हतभग्न केला, संपूर्ण कंकणांकित जगती प्रतापें जिंकिली, क्षात्रधर्म संरक्षण करून धर्माधीश होऊन सिंहासनारूढ जहाले. जैसा युधिष्ठिरशक व विक्रमशक व शालिवाहनशक तद्वत् शिवशक महाराजांनीं या कलयुगीं नवीन चालविला. हा अर्थ श्रीविष्णु अंशाविना होऊन येतो कीं काय! सज्ञानसागर तेच जाणवतात, अज्ञिकांस भ्रम भास अवघा या प्रकारें महाराजांनीं ब्राह्मणांची यथाविधि संभावना केली.

तदनंतर अष्ट प्रधानांस आयुधें व .....वयाकरितां सरंजाम अमुक दिधला व लक्ष लक्ष होन एकेकास बक्षीस दिधले व एक हत्ती व अरबी घोडे सुमार ५ पांच नग वस्त्रें भरजरी व तसेंच अलंकार भूषणें. ऐशी कृपा महाराजांनीं करून देणें दिधलें. महाराज शहाजी कुमार शिवनृपति क्षात्रत्व पावोन सिंहासनाधीश्वर हिंदुपाति पातशाह जहाले. हें प्रतापकर्मांचें वर्तमान पृथ्वीतलवटींच्या भानुप्रभेप्राय विस्तीर्ण जहालें. संपूर्णजनांस परम उल्हास होऊन अपरमित संतुष्टता प्रजा पावल्या. यदर्थीं श्लोक.

झाला नाथ अनाथतारक जगीं शाजीसुनू भूपती ।
पृथ्वींतील प्रजा समस्त हृदयीं आनंद हा मानिती ॥
आतां हे भयकल्पनाच अमुतें नाहीं कदां निश्चयें ।
शीवाजी नरनायका जय असो श्रीअंबिकेचें दयें ॥ १ ॥
सिंव्हासनारूढ नृपाळ झाला । आनंद हाची अवघ्या प्रजांला ॥
ऐसा धणी हारिहरें दिधला प्रतापी । केलेच येवन बळें. मुढ अप्रतापी ॥२॥
अमित्रांस क्लेश वाटून आले. हें तपशीलवृत्त बाहादरखान, बादशाहाचा

काका, यांस कळतांच पुढें भीमातारीं येऊन छावणी केली. तदनंतर औरंगाबाद येथील वकिलांनीं तपशीलवार अर्जी लिहून दिल्लीस पाठविली. हें वृत्त पादशाहास कळतांच तख्तावरून उतरून जनानियांत अंतःपुरांत गेला आणि परम रागें दोन्ही हात भूमीस घालून आपले देव पीर पैगंबर इलाही रहमानुर [रहीम], इनशा अल्ला हुताआला परवरदिगार याचें नाम स्मरून परम खेद केला. दोन दिवस अन्न उदक सेविलें नाहीं. आणि सखेद श्वासोच्छ्वास टाकून बोलिला जे, "खुदानें मुसलमानांची पादशाही दूर करून मराठियांस मेहेर करून पृथ्वीचें तख्त शिवाजी महाराजांस दिधलें. आमचा गुन्हा जाहला. बारवी सैदी आजच भरली. म्हणोन बहुत खेद केला. अभिनव मोहाचे पर्वत मानिले. मग थोर थोर अमीर वजीर यानीं नानाप्रकारें समाधान करून, शपथ घालून तख्तावरि बैसविलें. तसेंच विजापूर व वरकड पादशाहांस वर्तमान कळोन खेद जाहला. आणि चौऱ्यायशीं बंदरचे अधिकारी ही वर्तमान ऐकून परम चिंतार्णवीं पडले. एतद्विषयींचा मनांत दुर्जनांनीं खेद केला, स्वजातीय संपूर्ण क्षत्री रजपूत राजे अजमेरीचा सवा जयसिंग व चितोडचा राणाजी महाराज नरसिंह रामानगरीचा रामसिंग व बडा रामसिंग व चिमणाराजा व भीमचंद व कृष्णसिंग व पुरुषोत्तमसिंग व आनंदसिंग व धर्मसिंग इत्यादि संपूर्ण रजपूत राजे यांस अगणित आनंद जहाला.

इकडे महाराज तख्तीं बैसोन राज्यकारभार करीत चालले. निजामशाही देश [illegible] ज केला. संपूर्ण मोंगल [illegible] पी केली [illegible] शाह पादशाहांनीं सल्लाह करून निराजीपंत [illegible] विचक्षण शुद्ध स्वामीकार्यकर्ते यांस नेहमीं महाराजांकडील हेजिबीस [illegible]न प्रतिवर्षी महाराजांस करभार देऊन स्नेह संपादिला. वरकड किरकोळ [illegible]डलिक राज्यें महाराजांनीं प्रतापें घेतलीं. कितेकांनीं [illegible]भार देऊन अंकित होऊन राहिले. तुंगभद्रेपासून कावेरी नदीपर्यंत कर्नाटक सौंधें साधावें हा हेतु बहुता रीतीनें महाराजांनीं धरिला. त्यास सरलष्कर पाठवून साध्य करावें तरि दिवसगत लागेल. यास्तव आपणच जावें असा सिद्धांत करून गोखंड गांवीं बहादरखान गलीम आहे तो पाठीवर चालोन येईल अगर आपण गेल्यावरि उपसर्ग करील म्हणोन त्याजकडे निराजीपंत

---

६७. जनानिया=जनानखाना.

६८. पीर=साधु पुरुष. पैगंबर=ऋषि, प्रणेता ( महंमद ). इलाही=ईश्वर. रहमानुर रहीम=अत्यंत दयावंत. इन्शा अल्ला हुतआला=जर सर्व शक्तिमान् ईश्वराची इच्छा असेल तर. परवर दिगार—पोषक, पोशिंदा, पालन करणारा.

६९. बारावी सदी=बारावें शतक. मुसलमानांच्या देवानें बारा शतकें हिंदुस्थानचें राज्य कराऊ असा वर आपल्या भक्तांस दिला होता अशी समज जुने मराठी लेखांत अनेक स्थळीं आढळते.

न्यायाधीश द्रव्य अलंकार रत्नखचित देऊन पाठविलें. आणि अंतरंगी सख्य केलें. आपणास कर्नाटक घ्यावयास भारी फौजेनिशीं जावें लागेल एक वर्ष पर्यंत तुम्ही राज्यांत कांहीं उपसर्ग न करणें ऐसें सांगोन ठायीं ठेविलें. आणि सेना निवडून पागेपैकीं पंचवीस हजार स्वार व रघुनाथ नारायण सर कारकून समागमें महाराजांनीं घेतले. पेशवे व सुरनीस व वरकड लष्कर राज्य-संरक्षणास ठेवून विचार केला जे, द्रव्य पाहिजे ते खजिन्यांतील वेंचूं नये, नूतन संपादून व्यय करावा आणि गैरजप्त देश साधावे. ऐशी तजवीज करून भागानगरचें पादशाहींत द्रव्य उदंड आहे तेथें निष्ठुरता करावी तर ते करभार देतात याजमुळें सख्य करून भेटी घ्यावी. भेटी अंतीं सर्व अनुकूल करून देईल. ऐसा विचार करून प्रल्हादपंत हेजीब तेथें होते त्यांस लिहिलें. त्यांणीं पादशाहास कळविलें. नंतर तानाशाहा यांणीं चित्तांत बहुत शंका धरिली. जैसा अफजलखान बुडविला, शास्तीखान पराभविला, तदनंतर दिल्लीस जाऊन औरंगजेब पादशहास विक्रमोपराक्रम दाखविला; ऐसा एखादा अनर्थ जहाला तरि काय करावें ! यास्तव भेट न घेतां जें मागतील तें द्रव्य देऊं" ऐसें पादशाहानीं सांगितलें. मग पादशाह व दिवाण अकांणा मादंणापंत यांस शपथ देऊन भेटींत कांहीं अपाय नाहीं, स्नेहाचे रीति भेट घेऊन जातील ऐशी बळकटी होऊन दरम्यानानीं प्रथम भेटी घेऊन नंतर महाराजांनीं भेटावें. असा निश्चय करून प्रथम दिवाण भेटून आले. मग महाराज लष्क-रसह मजल [illegible] तें [illegible]गानगरची हद्द लागली [illegible]ळा रयतेस उपसर्ग करूं नये, तसनस करूं न[illegible]. ऐशी ताकीद केली. कोणी अमान्य करील त्याचें पारपत्य होईल ऐसें [illegible] मुक्काम जेथें होईल तेथें खुष खरेदी सर्व पदार्थ घ्यावे. जुलूम जास्ती [illegible] करावा. हें वर्तमान पादशाहास कळोन संतुष्ट जहाला. महाराजांस दोन चार गांव पुढां सामोरे यावें ऐसें केलें. तेव्हां महाराज परम चतुर, स्वकार्यासि दक्ष, अष्टपैलू, साधक, सबब शपथ घालून सांगोन पाठविलें कीं, तुम्हीं पुढें सर्वथा न यावें. त्याजवरून पादशाहा परम संतुष्ट जहाले. अकांणा मादंणा हे पुढें येऊन महाराजांस घेऊन शहरास गेले. महाराजांनीं तमाम लष्करास ताकीद करविली. मातबर सरदार व हुजुरात पागा शिलेदार यांस स्वमुखें आज्ञा केली जे, आज उत्तम रीतीची तयारी करणें. त्याजवरून सर्वांनीं भरजरी बादली मंदील व चादरा

---

७०. गैरजप्त-न जिंकिलेले, ताब्यांत न आणलेले.

७१. अकांणा व मादंणा हे दोन बंधु मोठे मुत्सद्दी होते. ते दोघे मिळून गोंवळकोंड्याचें राज्य चालवीत होते.

७२. दरम्यान=मध्यस्थ.

बादली व झगे भरजरी एकीकडून केले. अलंकार सोनियाचीं कडीं तोंडे व चौकडे पदकें मोहनमाळा तुरे कलग्या शिरपेंच ऐशीं भूषणें घातलीं. तसेंच घोडेशृंगार जीन भरजरी, सकलादी चुंयटया कंडे पट्टे हुमे कलगिया सर्जे सडका व जरी पाखरा. कर्णीं गुच्छ लाविले. घोडे एकापरीस एक बलोन्मत्त भांत भातीचे तरुण नटनागर उड्डाण करीत चमत्कारें वायुवेगें समान. हत्ती पलखदंती काळे कानळासारखे उत्तम उन्मत्त पंचरंगें रंगविले. आरक्त शेंदुरें डवरिले, पाखरा भरजरी व कंठीं घंढा सांखळी व जडावाचे टकांचे तदनंतर भाळीं सुवर्णाचीं पिंपळपानें अश्वत्थपर्णातुल्य विराजलीं. वरती भरजरी निशाणें. गजस्कंधीं हस्तकीं अंकुश सजवून महात आरूढले. तदनंतर महाराजांचे पालखीपुढें चौफेर बारा हजार मावळे सदट बलोन्मत्त स्मश्रू पिंगट, एकापरीस एक धराईत बंदूक बरची व सांगावाले व इटेकरी व पटेकरी व बाणेकरी व हस्तकीं तीक्ष्ण फिरंगा जेनबी व हेलबी व मकरबी कत्या कोयते मांडु गुर्दे निमचे व ईसपात व दुदुमे येकेल्या व कांबिटे समशेर बहादर महाराजांचे विश्वासू. त्यां वरी दिवसेंदिवस कमाल मेहेरबानगी. सर्वांस लोक पाहून कोणास कडीं सोंरूपेची, कोणास चौकडे व मोहनमाळा व सरदारांस सकलादी व खुतणीचे [illegible]ळणें व इजारा व नाइकास भरजरी चादरा समस्त लोकांस ताडपदरी व पैठण[illegible]आसोड्या व जुमलेदार व नाईक व सरदार यांस जरी मंदील व लोकांस [illegible] कुसुंबी *तिव[illegible] [illegible] लिबास केले. महाराजांनीं रत्नखचित अलं[illegible] देदीप्यमान व वस्त्र अगदीं भरगच्ची बादली व पदकें संवेष्टित मुक्ताफळ[illegible] माळा ऐसा भरपोषाख केला. दृष्टीं नवरत्नखचित फिरक्यांची ढाल, [illegible] श्री तुळजा फिरंग, सुवर्णजडीत

---

७३. एकीकडून=झाडून, एकसा.

७४. चुयट्या=घोड्याच्या आयाळींच्या वेण्यांस लाविलेल्या फितीच्या सकलादीच्या किंवा साटिनच्या धांगोट्या.

७५. कंडे=कंठभूषण, कंठे ( घोड्याचे )

७६. हुमे=अश्वावतंस, घोड्याचे तुरे.

७७. सर्जा=मोत्यांचें अगर सोन्याच्या मण्यांचें वर्तुलाकार भूषणविशेष.

७८. सडका=चौरी.

७९. भातभातीचे=नानाप्रकारचे.

८०. टकोचा=टोंगी.

८१. जुनबी=दक्षणी.

८२. हेलबी हालबी=चंद्रयुक्त, चंद्र काढलेल्या.

८३. मकरबी मगरबी=पाश्चात्य, पश्चिमेकडून आलेले.

८४. कत्या, कतिया, कत्ती=करबालिका.

८५. माडू हरणाच्या शिंगास पोलादी टोपणें बसवून केलेलें शस्त्र.

८६. इसपात ?

८७. कमाल=पूर्ण, भरपूर.

८८ खुतणीचें=अर्धे रेशीम अर्धे सूत यांणीं विणलेलें पट्टेदार कापड खुतण ( कांबूलप्रांत ) येथें तयार होतें तें.

८९ ताडपदरी, ताडपत्री=एका प्रकारचें रेशमी, चौकडीचें कापड.

* तिवट=पागोटें.

९०. लिबास=पोशाखाची तऱ्हा.

परजेंची. वाम हस्तकीं बिचवा वाघनखें. जरीचे झगियाचे अंतरभागीं नैरवरी बारी-क कडियाची लोखंडी [13]जिरे. मस्तकींचे मंदिलांत नरवरी लोखंडी तोडा. तदनंतर कटिमंडळीं पेटीवरि भरजरी बुट्टेदार पटका. कमरेस जडित पर-जाचा खंजीर. याशिवाय बारीक हत्यारें गुप्त रक्षिलीं. महाराज गजराज प्रचंड हस्तिपृष्ठीं अंबारींत आरूढ जहाले. सरकारकून खवासखानेंत बैसोन मोरच-लें उडवावयास लागले. हस्ती संपूर्ण अलंकार शृंगारिले. तगटी पाखरा व कंठीं सुवर्ण सांखळ्या घंटायुक्त मस्तकीं टकोंचे जडिताचे. चहूंपदीं सु-वे तोडे. भाळीं सुवर्ण पिंपळाचीं पर्णे. शुंडादंड मस्तकपर्यंत आरक्त शेंदूरें रंगविला. तदनंतर शुंडा आननीं शृंखला दिधली. शिवाजी महाराज छत्रपति सिंहासनाधीश्वर द्वितीय गगनवासी प्रभाकरच, [ज्याणें] भूतलवटाचे-ठायीं स्वता येऊन महाराजांचे आननीं वास केला. धराधीप समर्थ नरचूडा-मणि हिंदूपति पादशाह यापुढें राजवाहनाचा घोड़ा कोतवाल सुमार ५० पन्नास सुवर्ण अलंकारें विराजलेला. कडेपट्टे सडका चवंटया इरवला सर्जे बुमे कल-ग्या सुवर्ण तकटी जीन व कांहीं जडित न रत्नांकित, पायीं सोन्याचे तोडे, रिकिब्या जडित, पाखरा भरजरी, पृष्ठीं गेंद संनियाचे जडित, याप्रमाणें घोडे अरबी व इराणी व हबशी व मारवाडी व देश व कच्छी याप्रमाणें पुढें नट-नागर वारियासही परते करणार. नांवनिशीवितपशील:—

| | | | |
|---|---|---|---|
| १. श्रीवर्धन. | १. नटनागर. | १. भवानीप्रसाद. | १. मोतिराज. |
| १. चितोडा. | १. गुणसागर. | १. हयराज. | १. मार्तंडप्रसाद. |
| १. गंभीर. | १. अधीर. | १. सारंगमधुकर. | १. माणिकराज. |
| १. तोंजी. | १. कुमेत.§ | १. हरगाण. | १. हिरा. |
| १. कंदर्प. | १. पर्वतराज. | १. तुरकी. | १ ताजी. |
| १. पवन. | १. मलकाची. | १. दलजित. | १. हबशी. |
| १. निळीमुंगशी. | १. गंडबहीर. | १. कणमण. | १. गरूड. |
| १. चिंतामणि. | १. वरुणराज. | १. गोवर्धन. | १. दूरराव. |
| १. सरनाईक. | १. घोडीकंठमाळ. | १. शामकर्ण. | १. सौदामीन. |
| १. सालोत्री. | १. चांदणी. | १. बहिरबाज. | १. परी. |

---

११. परज=मूठ.
१२. नरवरी=नरवरास होणारीं.
१३. जिरे जाळीदार कवच.
१४. खवासखाना=परिचारकाची जागा
१५. ताजी=अरबी.
१६. निळा—शुभ्र.
१७. सालोत्रा,—'शालिहोत्र' (अश्व-शास्त्र) या शब्दावरून हें नांव दिलें असावें.
§ कुमेत=पिंवळया रंगाचा Bay horse.
१८. "लालकाचा"? लालरंगाचा?

१. कागोदा. १. मैनावती. १. मदन. १. नागीण.
१. अबलक. १. मंदाकिनी. १. हणमंत. १. जयंती.
१. सर्जा. १. जर्दी.

---

५०.

घोडे एकेचाळीस व मींदवाना नऊ एकूण कोतवाल पन्नास व हत्ती राजवाहनाचे शृंगारिले पंधरा. नांवनिशी बितपशील:—
१. उत्तमगज. १. बलखुद. १. ऐरावत. १. बालसुंदर.
१. महंकाल. १. कालपाहाड. १. मनरंजन. १. गजराज.
१. गजियाबीज. १. वीरभद्र. १. शंभुप्रसाद. १. श्रीभवानीप्रसाद.
१. खंडेराव. १. कर्पूरगौर. १. नंदराज.

---

५१.

एकूण हत्ती पंधरा सन्मुख महाराजांचे दलभारीं विराजले. तदनंतर महाराजांचे पुढें चोपदार व महालदार व भाट गर्जना करूं लागले. भेरी व नगारे व तुरतुरे कर्णे हमामा झल्लरी पावे मृदंग वाजंत्रें ऐशीं नानाप्रकारचीं वाद्यें वाजों लागलीं. नादें अंबर कोंदलें. भाट ब्रीदें पढों लागले येणेंप्रमाणें महाराजांचीं:—

सब दुनयेके आफताब शहाजी छत्रपति शिवराज ॥ श्रीशंकर विष्णु अवतार विराजत हैं राजनमों शिरत. ॥ बीजापूर हैदराबाद बांकी अच्छी दौलताबाज ॥ जोर बर जोरसे काफरकू मार डालकर किया अपना काज ॥ १ ॥ वह महाराज शिवराज ॥ धृ० ॥ अफजल हुवा बल बहादर हुवा गाफिल ॥ शिवराजनकू नही तमा ज्यानी दौलतसे किया फैसल ॥ शाबास कख्यातन कीई शास्ति हुवा बद मस्त ॥ नवरंग दीलसे दिलमों मंगता है भिस्ते ॥ २ ॥ ऐशी महाराजांची कीर्त वर्णावयास लागले.

तदनंतर सुमुहूर्त पाहून पादशाहाचे भेटीस नगरामध्यें चालिले. पादशाहानीं संपूर्ण नगर शृंगारिलें. चौफेर बिदीस कुंकुम व केशराचे सडे रंग बिरंग घातले. व बरकड त्या रांगोळ्या गुलालाच्या व अबीराच्या घातल्या. व गुढिया तोरणें व निशाणें नगरामध्यें लाविलीं. नगर नागरीक लोक कोट्यानुकोटी उभे महाराजांस पहावयास लागले. व समस्त नारीजन पडदियांतील

---

९९. मादवाना, मादयाना=घोड्या.
१००. आफताब्=सूर्य.
१. शिर-ताज्, सर-ताज्=शिरींचा मुकुट.
२. भिस्त, बेहेष्त=स्वर्ग.

पठाण व मोंगलांच्या व मराठियांच्या स्त्रिया पडदे जाळीचे त्यांतून पाहूं लागल्या. आणि पाहून परम समाधान पावून एकमेक बोलूं लागल्या जे, मा देखो तमाशा ! अक्कलसे नजर करो, महाराज बडा. इस दुनयेमें दुजा नहीं. बाकी तसबीर पीर पैगंबर इलैाहीकी. राजा तुम् जीता रहो. जानी दौलत सब रःकरीर. ऐसा मुसलमान व रजपूत कायत खत्री व *पारशी यांचे स्त्रियांनीं संतोषरूपें दुवा दिधला. ब्राह्मण मराठे व अठरा पगडजातीचे बायकांनीं आशीर्वाद देऊन सोनेरूपेचीं पुष्पें मस्तकीं महाराजांचे उडवोन बैलादुरी व सैतगें करून ओवाळिलें. त्यांस वस्त्रें व द्रव्य दिधलें. गोरगरीब फकीर अनाथ यांस खैरात केली. स्वारी गर्जना करीत सेनासंभार सहित चालली. जैसा नंदनवनास श्रीदेवेंद्र चालिला, किंवा दशानन राक्षस चमू घेऊन निघाला, अथवा श्रीरामचंद्र विजयी होऊन अयोध्याभुवनीं प्रवेशला, किंबहुना यादवसेनेसहित श्रीकृष्ण धर्मराजाचें दर्शन घ्यावयास इंद्रप्रस्थास चालिला, कीं पंडुआत्मज सिंहासनीं विराजला, यद्वत् शिवछत्रपति तानाशाह पादशाहाचे नगरीं प्रवेशला. थोकत थोकत मिरवत महाराज निघि चालिला. पादशाहाचे दादमहालास पावले. वाद्यांचा एकच गजर लागला. पादशाहास महालाखालें उतरों नका, आपणच येतों, म्हणोन शपथ घालून सांगोन पाठविलें. मग पादशाहा वरीच राहिले. महाराजांनीं आपले लोक कमरबस्तीनिशीं जामग्या पेटवून महालाखालींच उभे केले. आणि जनार्दनपंत व प्रल्हादपंत व सोमाजी नाईक वसनागरचे यांसह वर गेले. तो पादशाहा पुढें येऊन क्षेमालिंगन होऊन एकासनीं बसले. मादंणा व अकांणापंत बैसले. वरकड उभे राहिले. उभयतांचे स्नेहाचें बोलणें जहालें. पादशाहाच्या स्त्रिया समस्त झरूक्यांतून पाहून थक्क जहाल्या. पादशाहा खूष जहाले. समग्र एक प्रहर बैसोन, महाराजांचे पराक्रमाच्या गोष्टी ऐकोन, नंतर कितेक नानापरीचे अलंकार रत्नजडित अमोलिक व भरजरी वस्त्रें व हत्ती पांच व घोडे सुमार दहा व लोकांस वस्त्रें देऊन महाराजांस निरोप दिधला.

तदनंतर महाराज आपले स्थळास चालिले. महालाखालीं रघुनाथ नारायण व हंबीरराव व वरकड सरदार लष्कर ठेविलें त्यास समागमें घेऊन चालिले.

---

३. साधुपुरुष, पैगंबर महमद आणि ईश्वर यांच्या नंतर याची (राजाचीच) तसबीर चांगली.

४. सर्व दौलत आणि तूं निरंतर शाबूद रहा.

* 'पारशी' असें मूळांत स्पष्ट आहे. पारशी स्त्रिया तेथें त्यावेळीं कशा आल्या ?

५. बलादुरी= हात ओवाळून कानाशीं बोटें मोडणें.

६. सतगा=बळी.

७. जामग्या=बत्त्या, तोडे.

मार्गीं येतां मागती लोकांस खैरात केली. हें महाआश्चर्य मानून, स्वारी उभी राहून, जनांचा तमाशा पाहूं लागले. यावरि पादशाहाचें मन स्थिर जहालें कीं राजे प्रामाणिक, वचनाप्रमाणें अंतर पडों न देतां आपणांस रक्षिलें. क्रिया जतन केली. पादशाहास आश्चर्य वाटून प्रल्हादपंत यांजवरि मेहेरबानी करून बक्षिसें दिधलीं. कीं तुम्ही प्रमाणीक म्हणोन नावाजिलें आणि निरोप दिधला. दुसरे दिवशीं मादंणापंतीं महाराजांस परम अत्यादरें समारंभ करोन मेजवानीस घरास नेलें. आणि आपले मातुश्रीचे हातें स्वयंपाक करवून जवळ बैसून भोजन करविलें. नंतर अलंकार वस्त्रें हत्ती घोडे नजर करून स्वस्थळापर्यंत जाऊन पोहोंचतें केलें. तदुत्तर पादशाहानीं मादंणापंतास बोलावून नेऊन सांगितलें कीं, महाराजांस जें काय पाहिजे तें देऊन संतुष्ट करून निरोप द्यावा. ऐसें ठरवून सुमुहूर्त पाहून पुन्हा मागती महाराजांस आणिलें. आणि द्रव्य जडजवाहीर मोठे रत्नाचे अलंकार हत्ती घोडे अपरमित देऊन गौरविलें. कारकून व सरदार यांचा मुजरा जहाला. तदनंतर सरदारांचे पराक्रम पाहून सर्वांस वस्त्रें भूषणें दिधलीं. आणि सर्व प्रसंगीं आपणास साह्य असावें ऐसें बोलणें निश्चयाचें जहालें. तेसमयीं महाराजांनीं पादशाहास आपण चित्तांत अन्यभाव न कल्पितां शपथ देऊन व शपथ पादशाहापासून घेऊन, परस्परें ऐक्यरूपता होऊन, पादशाहांनीं महाराजांस निरोप दिधला. प्रतिवर्षीं करभार देणें तो प्रल्हादपंतास नेहमीं आपणाजवळ आमचे निसबतीनें असो दिजे ऐसें बोलिले. राजे आपले स्थळीं आले. नंतर भागानगरचे मोठमोठे सरदार पंचहजारी हप्तहजारी यांणीं जवान्या केल्या. ऐसा बहुमान जहाला. महाराज एक महिना तेथें होते. तेथून द्रव्य वस्तभाव जडजवाहीर घेऊन आबादानी जहाली.

तदुत्तर चंजीकडे सैन्य समुदाय घेऊन चालिले. श्रीशैल्यपर्वतास जाऊन दर्शन व नीलगंगेचें स्नान तीर्थविधी[ हीं ]संपादिलीं. स्थळ विलोकून परमानंद पावले. कैलासच दुसरें ऐसें भासून तेथें शरीर अर्पावें ऐसें योजिलें. तेवेळीं श्रीतुळजापुरनिवासिनी महाराजांचे अंगीं संचारून बोलिली जे, "तुजला या गोष्टीनें मोक्ष नाहीं. हें कर्म करूं नको. पुढें तुझे हातून धर्मकृत्य कर्तव्यता उदेली आहे." ऐसें समजोन सांगोन अदृश्य जहाली. नंतर सावध जहालियावर हें वृत्त महाराजांस सरकारकुनांनीं श्रुत केलें. मग शिरकमल अर्पण करावयाचें राहिलें. पुढें कर्नाटक देश साधावा म्हणोन चंजीस जाऊन वेढा घातला. आंत खान खान विजापूरकरांचा वजीर याचा पुत्र रूपखान नासर महमदखान होता. त्याशीं राजकारण करून कौलानें बाहेर काढला. आणि फत्ते केली. व त्रिमळी

महाल म्हणोन आहे तेथें खैरखान लोदी वजीर विजापूरचे पादशाहाचा हजार पठाण हत्ती सामान द्रव्य अगणित होतें तो चालोन आला, त्यास युद्ध करून जोरावारीनें धरिला. पांच हजार घोडा व बारा हत्ती पाडाव केले. जड जवाहीर भारी हस्तगत जहालें. युद्ध कांहीं सामान्य ऐसें जहालें नाहीं. नेस्तनाबूद अमित्रास करून यश महाराजांनीं संपादिलें. आणि महाराजांचे धाकटे बंधु व्यंकोजी राजे यांणीं चंदावरचें राज्य साधून राज्य करीत असतां त्यांणीं आपले कारकून घेऊन कावेरी तीरीं आले. बंधु बंधूंची भेटी जहाली. व त्यांजकडील कारकून काकाजीपंत पिंगळे व कोनेर महादाजी मजमदार जगंनाथपंत व व्यंकाजीपंत वगैरे भेटले. नाटकशाळेचे पुत्र भिवाजी राजे व प्रतापजी राजे व रायभान राजे व वरकड सुहृद वगैरे भेटले. महाराज बहुत संतोषी जहाले. परस्परें मेजवानी व देहणगी जहाली. मग महाराजांनीं व्यंकोजी राजे यांस प्रश्न केला कीं, “ आम्हीं वडिलांचा निरोप घेऊन, पुणेस जाऊन राहिलों. तदनंतर श्रीभवानीशंकरवरदें व वडिलांचे पुण्यप्रतापें पराक्रम करून, राज्य साधून, दिगंत कीर्ति केली. अदलशाही व कुतूबशाही व बेदर भागानगर तहद नर्मदापर्यंत स्वराज्य कर्नाटक आदीकरून संपादिलें. दिल्लीस जाऊन औरंगजेबाची भेटी पराक्रमें करून घेऊन कौतुक दाखविलें. बावीस पादशाही अमीर तेजहीन करून गर्दीस मेळविले. शास्तीखानास शास्त केली. प्रथम आहुतीस अफजलखान भुजाबल बहादर याचें अवदान दिधलें. दिल्लेश्वराचे काका व शाहाजादे यांस आली वाट भुलविली. औरंगजेबास पाणियांत दिसत आहें, अटके अलीकडे लौकिक संपादून कीर्ति स्व... रूढविली. औरंगजेब हीन केला माझिये बळाचा क्षयरोग दिल्लेश्वरास लागला. याजमुळें वांचतां दिसत नाहीं. या कलियुगीं कृतात्रेताद्वापाराचे पुण्यश्लोक राजे श्रेष्ठ श्रेष्ठ धर्मादि रघु दिलीप विक्रम भोज भरत ऋतुपर्ण यांचे पंक्तीस श्रीगागाभटजीनें लक्ष ब्राह्मण मेळवून, यथाशास्त्रें जडित रत्नखचित सुवर्णाचें सिंहासनारूढ करून मुंजीबंधनें क्षात्रत्व संपादिलें. सार्वभौमपदास पात्र केलें. हा कीर्तीचा ध्वज लाविला. श्रीअंबावरदें सत्तावीस पिढ्या राज्य वंशपरंपरा प्राप्त जहालें. हा महिमा श्रीकृपेचा. तुम्हीं नवें राज्य चंदावरचें साधिलें. ऐशियास वडिलांचे बारा बिरुदें, आपण वडील पुत्र आणि पराक्रम दिवसेंदिवस अधिकोत्तर केला, बारा बिरुदें करावया काय अशक्य? परंतु वडिलांचे वेळचीं आहेत तीं, वडील आपण, आपणाजवळ असावीं म्हणून मागितलीं. त्यांणीं दुराग्रह करून दिल्हीं नाहींत. तन्मुळें परम रागें चंदावर प्रांत जेर केला. परंतु व्यंकोजी राजे यांणीं महाराजांचें वचन मान्य न केलें. वैषम्यता उत्पन्न जहाली. व्यंकोजी राजे यांचे कारकून व

कारभारी यांणीं त्यांचे पोटांत भय घातलें कीं, तें खलेल करून बिरुदें घेतील व जबरदस्ती करितील. ऐसें सांगोन रात्रीं पळविलें. नंतर दुसरे दिवशीं महाराजांस वर्तमान कळोन आश्चर्य केलें कीं, काय "निमित्त पळोन चंदावरास गेले ! आम्ही काय त्यास धरीत होतों ! आम्हास बिरुदें घेऊन काय करावीं ! आम्हीं अष्ट दिशेस बिरुदें लाविलीं आहेत. वडिलांची वस्तु यास्तव सहज मागितली. नाहीं दिल्ही तरि द्यावी. उगेच पळाले. ते धाकटे बंधु धाकुटणाची बुद्धि केली, आणि त्यांजकडील सरदार व कारकून सांपडलेले आणून त्यांस वस्त्रे भूषणें देऊन चंदावरास पाठविलें. संताजी राजे ‡महाराजांचे कसालेदार मर्द कार्यकर्ते पुत्र, परम पराक्रमी, समशेर बहादर, महाराजांचे भेटीस आले. भेटी जहाल्यावरी त्यांस कर्नाटक प्रांतीं हजार घोडियांची दौलत देऊन नावाजून फौजेनिशीं ठेविलें. तदनंतर वेलूरचे कोटांत अदलशाही ठाणें होतें. तो कोट म्हणजे पृथ्वीवर दुसरा अाम्यनेस नाहीं. कोटा सभोंवते खंदकांत जितें पाणी भरपूर. हजारों सुसरी व मोठेमोठे मासे व कांसवें तैशींच अनेक उदकांतील जलचरें. त्या कोटाचे फांजीवरून दोन गाड्या जोडोन जाव्या. अशी मजबुदी पडकोटाची. फांजीस फेर कळासुत्री फिरंकिया. त्यांस गोळा लागतांच फांजीस व कोटास लागावयासी गरज नाहीं. कोंकण प्रांतीं समुद्र तीर कल्याण भिवंडीपासून कुडाळपर्यंत जंजिरे. त्यांत जैसा सिंधुदुर्ग राजियाचा जिव्हाळियाचा किल्ला, तैसा कर्नाटक प्रांतं वेलूरचा किल्ला. त्या कोटास वेढा घालून महाराजांनीं फत्ते केला. परंतु आणखी जागजागां कोट होते ते घेतले व आणखी नवेही वसविले. ऐसे शंभर किल्ले व कोट [ वसवून ] त्या प्रांतें बारा लक्ष होनांचें राज्य साधिलें. चंजी म्हणजे विजापूर भागानगर तैशी तख्ताची जागा. तेथें महाराजांनीं रहावें. परंतु इकडील राज्य उदंड, संरक्षण जहालें पाहिजे, या कारणें चंजीस रघुनाथ नारायण यांस मजमू सांगोन कर्नाटक प्रांतींची देखरेख करणेची यख्तयारी देऊन चंजीस ठेविलें. नूतं फौज असावी म्हणोन हंबीरराव सरनोबत सेनेसहित ठेविलें. आणि राजे यांणीं आनंदराव व मानाजी मोरे हे दोघे सरदार फौजेसहवर्तमान समागमें घेऊन चंजीहून निघोन घांट कार्बीज केला व कितेक गड वसविले. तदनंतर पुंड पाळेगार मारून गर्दीस मेळविले. ते प्रांतीं रंगो नारायण महत्कार्य कर्ता म्हणोन प्रांत स्वाधीन करून ठेविले. त्यांचे परामर्षास लोक कोल्हार प्रांतीं मानाजी मोरे यांस फौजेनिशीं ठेविलें. मग आनंदराव बरोबर घेऊन महाराज कोपलांस

‡ महाराजांचें-शहाजी महाराजांचें.
८. फांजी=प्राकारवेदिका, तटाची गच्ची.
९. घाट=कर्नाटकांतून मद्रासेकडे जातांना लागतो तो.
१०. मूळांत 'कपोलास' असें आहे.

आले. तें स्थळ व लक्ष्मेश्वरचा कोट घेतला. खानगौंडा देसाई पळोन गेला. तेथून संपगांव प्रांतांत येऊन बेलवाडी कर्याती[11] मार्गें येत असतां तेथील देसाईण लालबी इणें कही कांबाडाचे[12] बैल नेले. हें वर्तमान कळोन बेलवाडीस वेढा घालून सत्ताविसावे दिवशीं कोट घेऊन देसाइणीस धरिलें आणि शिक्षा केली. बेलवाडीस वेढा असतां वर्तमान आलें कीं, बाबुलीखान जमावानिशीं इकडे येऊन कोल्हापूर तारळें प्रांतीं उत्पात करितो. त्याजवरि निळोजी कोठे[13] यांसि फौजेनिशीं रवाना केलें. त्यांणीं येऊन तुरंबनजीक गांठून त्यास बुडविला. हें वर्तमान महाराजांस कळतांच नौबत सुरू करून शर्करा वांटून संतोष केला. इतकेंत जासुदांनीं फत्तेची खबर आणिली त्यास सोनेंचीं कडीं वस्त्रें दिधलीं आणि निळोजी कोठे यांस भरजरी वस्त्रें व रदक, तुरा मोतियांचा व कलगी व कडीं व हत्ती १ एक व घोडे २ दोन बहुमान पाठविला. वरकड सरदार लोकांनीं खस्त मेहनत केली त्यांस गौरवाचीं वस्त्रें व राजमुद्रांकित आज्ञापत्रें पाठविलीं. तदनंतर बेलवाडीहून कूच करून पनाळियास आले. निराजीपंत [यांस] बहादरखान[14] [याचे] हेजिबीस ठेविले होते तेही खानाचीं वस्त्रें भूषणें घेऊन आले.

कर्नाटक प्रांत हंबीरराव सरनोबत सर्अभ्य रघुनाथ नारायण मजमदार ठेविले. हें वर्तमान कळोन व्यंकोजी राजे यांणीं आपली फौज व बाजे[15] पाळेगारांची फौज मिळवून हंबीरराव यांवर चालोन आले. फौज चौपट आणिली. नंतर युद्ध जहालें. महाराजांचा पुण्यप्रताप अधिक आणि भाग्योदय विशेष. हंबीरराव यांणीं मोठें युद्ध केलें. लोक एक हजार पडले. व्यंकोजी राजे यांजकडील चार हजार घोडे पाडाव केले. अशी फत्ते जहाली. पाडाव केले सरदारांस वस्त्रें व घोडे देऊन निरोप दिला. पुढें रघुनाथपंत व हंबीरराव चालोन चंजावराकडे आले. मग व्यंकोजीराजे यांणीं भले मनुष्य पाठवून सख्य करावें ऐसें केलें. त्यांणीं सविस्तर विनंति महाराजांस लिहिली. त्याचें उत्तर व्यंकोजीराजे धाकटे आहेत, मूल बुद्धि केली तरी बंधुच, त्यांस रक्षणें. राज्य बुडवूं नये. असें पाठविलें वरि सल्ला व्यंकोजीराजे यांणीं करून द्रव्य उदंड दिधलें. मग हंबीरराव यांस सेनेसहवर्तमान निरोप देऊन या प्रांतीं पाठविलें. रघुनाथपंतीं दहा हजार स्वार व पागा शिलेदार जमा करून कर्नाटक प्रांतांत निर्भय राहिले.

---

११. कर्यात=महाल.
१२. काबाडाचे=ओझ्याचे.
१३. 'कांटे' कीं 'कोठे'. ?
१४. बहादूरखान दिल्लीचा सरदार.
१५. बाजे=इतर किरकोळ.

हंबीरराव महाराजांजवळ आले तेवेळीं नांवाजून बक्षिसें दिधलीं आणि पुढें महाराजांनीं अवघें सैन्य घेऊन जालनापूर शहर मोंगलाईंत होतें त्यास जाऊन, वेढा घालून, पेंठ मारून, शहर लुटून फन्ना केलें. तेथील फौजदार व जेजईचा दरोगा या प्रांतींचा होता, तो कैद करून धरिला. तेथें द्रव्य व सोनें, रुपें, कापड, जडजवाहीर, घोडें व हत्ती उंटें पैदास्त करून मोंगलाई फौजेशीं युद्ध जहालें. शिदोजी निंबाळकर महाराजांकडील पंचहजारी पडला. तदनंतर तीन दिवस युद्ध जहालें. रणमस्तखान शिकस्त केला. तों त्याचे कुमकेस केशरसिंग बडा रजपूत व सरदारखान व बाजे उमराव ऐसे वीस हजारनिशीं येऊन तीन कोशांवरि राहिले. मग केशरसिंग यांणीं अंतरंगें सांगोन पाठविलें कीं, उभयपक्षीं भाऊपणा आहे. आमची गांठ पडली नाहीं तों तुम्हीं कूच करून निघोन जाणें. हें वर्तमान कळोन महाराज तेथून कूच करून निघोन जावें तर लष्कर [16]जडगीर जहालें होतें. मार्गानें कैसें जावें ऐशी तजवीज केली. ते समयीं बहिरजी नाईक जासूद याणें कबूल केलें कीं मोंगलांची गांठ न पडतां लष्कर घेऊन साहेबांचे ठिकाणास पाववितों. त्याणें रात्रदिवस अवकाश न करून कोठें मुक्काम न करितां पट्टा किल्ला तेथें लष्कर आणिलें. बहिरजी नाईक याजवरि महाराज संतोषी हो[illegible]न त्याजकडे [illegible]गरजील होतें तें माफ करून आणखी बक्षिसें उदंड दिधलीं. मग [illegible]कर घेऊन देशास आले.

पुरंदरा नजिक असतां ज्येष्ठ [illegible] संभाजी राजे रुसून मोंगलाईंत जाऊन दिलेलखानास भेटले. त्यांणीं बहुत सन्मानें ठेवून घेऊन दिल्लीस लिहिलें कीं, शिवाजी राजे यांचे पुत्र [illegible]ले आहेत. त्यांस नांवाजावें म्हणजे राज्यांत फूट होऊन महाराजांचें लष्कर फुटोन येईल. किल्ले कोट साधतील. असें हिनावह लिहिलें. त्याजवरून पादशाहानीं विचार केला कीं राजे यांचे पुत्रास नांवाजिलें असतां पादशाहींत फितवा करून बुडवील. याजकरितां नांवाजून हुजूर आणोन कैदेंत ठेवावें. ऐसा विचार करून दिलेलखान यांस हुकूम पाठविला कीं, संभाजी राजे घेऊन हुजूर येणें. तों या पूर्वीं दिलेलखानाचे वकिलांनीं जहालें वर्तमान लिहिलें. तें येऊन पावतांच इमानास खोट न करिता संभाजी राजे यांस सुचना करून पळविलें. ते पनाळेस आले. हें वर्तमान महाराजांस पुरंदरी कळतांच संतोष पावोन पुत्राचे भेटीस पनाळेस गेले. पिता पुत्र भेटून बहुत आनंदयुक्त होऊन म्हणों लागले कीं, "लेंकरा, मज सोडून कोठें गेलास! औरंगजेबाचा आपला दावा. तुजला दगाच करावा, परंतु श्रीदया करितांच उठोन आलास. थोर कार्य जहालें. आतां दोघे

१६. जडगीर-भारावलेलें जड झालेलें | ( लुटीच्या भारानें. )

पुत्र ज्येष्ठ तुम्ही, कनिष्ट राजाराम. ऐशियास हें सर्व राज्य आहे याचे दोन विभाग करितों. एक राज्य चंजीचें अहद तुंगभद्रा [ दुसरें ] आलीकडे गोदावरी नदीपर्यंत. त्यास तूं वडील पुत्र तुजवरि कर्नाटकचें राज्य देतों. तुम्हीं दोघे दोन राज्यें करणें. आपलें उतारवय जहालें यास्तव श्रीचें नामस्मरण करून सार्थक करीत बैसतों. ऐसें बोलले. तेव्हां संभाजी राजे यांणीं उत्तर दिलें कीं, आपणांस वडिलांचे पायांची जोड आहे. आपण उगेच दूध भात भक्षून वडिलांचे पायांचें चिंतन करून राहीन. दुसरें दैवत नाहीं. त्याजवरून महाराज संतुष्ट होऊन बोलले कीं, कुल राज्य आपलें देखील कर्नाटकही आपणास सारें दखल आहे. खजाना काय आहे ! व सरकारकून मक्तेसर कोण कोण ! लष्कर पागा शिलेदार किती ! सरदार काय ! गड कोट किती ! हशम काय ! समुद्रांतील जहाजें किती ! व पाणियांतील जंजिरे किती ! तो कारखाने सहित आकार केला बितपशील:—

कारखाने सुमार १८ अठरा व बारा महाल जिन्नसवार संख्या.

अठरा कारखान्यांचीं नांवें.

| प्राकृत. | संस्कृत. | प्राकृत. | संस्कृत. |
|---|---|---|---|
| १. खजिना. | १. भांडारगृह. | १. जामदारखाना. | १. वसनागर. |
| १. पीलखाना. | १. गजशाला. | १. जिरादखाना. | १. शस्त्रशाला. |
| १. फरासखाना. | १. वस्त्रगृह. | १. अबदारखाना. | १. जलस्थल. |
| १. मुदबखूखाना. | १. पाकालय. | १. नगारखाना. | १. वाद्यगृह. |
| १. शरबतखाना. | १. फलस्थल. | १. उष्ट्रखाना. | १. उष्ट्रगृह. |
| १. सनापखाना. | १. पर्णशाला. | १. तालीमखाना. | १. बलगृह. |
| १. शिकारखाना. | १. श्वापदस्थळ. | १. तोफखाना. | १. यंत्रशाळा. |
| १. दारूखाना. | १. | १. जजदारखाना. | १. |
| १. देकारखाना. | १. धर्मगृह. | १. लकडखाना. | १. काष्ठगृह. |
| ९. | ९. | ९. | ९. |

बारामहालांचीं नांवें सुमारीं.

| | | | |
|---|---|---|---|
| १. पोतेमहाल. | १. कोठीमहाल. | १. पागामहाल. | १. दरुनीमहाल. |
| १. टंकसाळमहाल. | १. थट्टीमहाल. | १. सौदागिरीमहाल. | १. इमारतीमहाल. |
| १. शेरीमहाल. | १. चौकीमहाल. | १. हवेलीमहाल. | १. पालखीमहाल. |
| ३. | ३. | ३. | ३. |

१२.

खजाना नाणेंवार व कापड हरजिनसी सुमार.

सुवर्ण नाणें हरभांत* सुमार.

१०००० गंबार.
०००० पुतळ्या.
०७०८ शिराई होन.
७४६५३ सणगरी होन.
०४५०० देवराई होन.
१०००० जडमोल होन.
१००००० कावेरी होन.
००००० पामनाइकी होन.
००००० तुती होन.
१०००० फलमा नाणें जिन्नस.
५००५०० कित्ता नाणें जिन्नसवार न.

| | |
|---|---|
| १ अपारजी. | १ त्रिसुरी. |
| १ त्रिमरी. | १ चंदावरी. |
| १ बीलमभी. | १ तुलजुमी. |
| १ हणमंतराय. | १ महंमदशाही. |
| १ येलुरी. | १ व्यंकटराई. |
| १ देवनहाली. | १ सर्जाफलम. |
| १ रामराय. | १ गुंडगौड. |

चक्रे संख्या सुमार एकूण नाणें. २५००५००.

साधे व धारवाडी.
५०००० एलोरी होन.
५०००० निशाणी होन हुकेरी व
२००००००० या विराहित जवाहीर डागिने पदकें व माळा व कडीं शिरोपेच द र १मोरचलें कंठे पट्टे व तबकें

सुवर्ण नाणें हरभात सुमार.

२००००० मोहोरा.
१००००० सतमी.
१३६४६४५ पादशाही होन.
२६४०३० अच्युतराई होन.
१०४० रामराई होन.
१००००० धारवाडी.
२००००० सैल्याघटी.
३००००० अदवानी होन.
१०००००० साधें सोनें व नग कांबी वजन खंडी १२॥ आकार रुपये दहा लक्ष.

रुपये नाणें हरभात सुमार.

५००००० रुपये.
१००००० रयाळ.
२००००० अस रुपया.
२५०००७० दाभोळी लाहरी.
१०००००० चवल्या करया.
५००००० बसरी करया.
१०००००० साधे रुपें व मिनेगारी भांडीं वजन खंडी ५० एकूण.
१००००००० कापुड सोनेरी बादली सोरीवली व वंगची तगटी व खुमाशी व रेशमी व रुपेरी भरजरी व श्वानरामी व किनखापी व बुट्टेदारी साधें सकलाद व कळस्पाकी व बंदरोबंदरींचीं तऱ्हेदार हरभात पंचरंगी शिवाय धान्य अपार.

* हर-भात=हरजातीचें.

व खंजीर बिचवे यांच्या मुठी व स्त्रियांचे अलंकार व हरजिन्नस व निसर्ती रत्नें हिरे व पाचू नील माणकें लसणे पैरोज प्रवाळ व मोती मिळोन रुपये दोन कोटी जवाहीर.

घोडे राऊत लष्कर पागा शिलेदार येणेंप्रमाणें.

८०००० खासपागा महाराजांची. २५००० शिलेदार पागा पतकें.

एकूण एक लक्ष पांच हजार.

पागेचे सरदारांची नांवनिशी येणेंप्रमाणें बितपशील.

| | | |
|---|---|---|
| १ हंबीरराव सरनोबत. | १ निळोजी काठे. | १ अम्रोजी भालेकर. |
| १ अनंदराव हप्तहजारी. | १ संताजी घोरपडे. | १ धनाजी शिगडा. |
| १ नेतोजी पालकर. | १ तैलंग राऊ. | १ संभाजी अरेराव. |
| १ मानाजी मोरे. | १ तुकोजी निंबाळकर. | १ बुवाजी पोंवार. |
| १ स्वरूपजी भोंसले. | १ एकाजी खांडेकर. | १ परसोजी भोंसले. |
| १ गोंदजी जगताप. | १ निंबाजी पाटोळा. | १ कृष्णाजी घाटगे. |
| १ खंडोजी जगताप. | १ शमणखान पणी. | १ परशराम पवार. |
| १ संताजी जगताप. | १ गंगाजी शिर्के. | १ बनाजी बिर्जे. |
| १ धनाजी जाधव. | १ मालोजी निंबाळकर. | १ मालोजी मचाळे. |
| १ नेतोजी काठकर. | १ कृष्णाजी पवार. | १ कानोजी दिवेकर. |
| १ दादाजी काकडे. | १ धर्माजी निगडे. | १ आपाजी तांबे. |
| ११ | ११ | ११ |

३३

शिलेदार व मुलखाचे सुभेदार.

| | | |
|---|---|---|
| १ बहिरजी घोरपडे. | १ नेमाजी शिंदे. | १ परसोजी शितोळे. |
| १ मालोजी घोरपडे. | १ रायाजी गडदे. | १ बाजी नळगे. |
| १ चंदोजी बिरदेवडे. | १ देवजी उघडे. | १ रायाजी नळगे. |
| १ जानराव वाघमोडे. | १ बहिरजी बऊगले. | १ मालोजी नळगे. |
| १ बळवंराव देवकांते. | १ हिरोजी शेलके. | १ कानोजी खापणे. |
| १ अमरोजी पांढरे. | १ केरोजी पोंवार. | १ जिवाजी उचाले. |
| १ काळोजी थोरात. | १ खंडोजी अवळे. | ६ |
| ७ | ७ | |

२०

अष्ट प्रधान यांजवरि राज्यभार हे देशस्थ ब्राह्मण निजामशाही यांणीं महाराजांचे राज्यांत त्रिकर्णचित्तें सेवा केली. जिवाभ्य कृतकर्मे संपादून दुष्ट यवनांस व इतर जनांस मर्दुमीनें व बुद्धीनें धाडस करून महाराजांचे ... स तत्पर होऊन सेवास्वधर्मे महा... ांस पदोपदीं संतोषप्रद केलें. ...स्थ ब्राह्मण निखालस, महाराजांचें ...याभीष्टवृद्धीस जिवाची तमा न ...तां झटले. व तैसेच प्रभु लोक. दोहीं यातीविना लेखनवृत्तीस महत्कर्म कृत्यास महाराजांनीं तिसरे ...ीचा पराक्रम राज्यांत होऊं दिला ...हीं. उभयतां याप्रमाणें चालले. ...चालीय नव्हेत. जे महाराजांनीं ...ढविले आणि हृदयचे पंक [ ज ] ...य गणिले. त्यांस माझे वंशीं कोणी पुत्रपौत्रादि वंशपरंपरा माझा शक सत्तावीस पिढ्या चालला आहे त्यापर्यंत महाराजांची आज्ञा मस्तकीं ममवंशिकांनीं वंदन करून पालन केलिया ...ा राज्याची अभिवृद्धि होऊन त्याचें कल्याण होईल. यदर्थी संदेह नाहीं. इतर यातीस व कुडाळकर मत्स्यहारी ब्राह्मणांस विश्वास देऊं नये. तोही बरें करणार नाहीं. कुडाळियांसि म्हणाल आप्त त्यांचा कुत्रा बाप, हें प्रमाण महाराज बांदेचे मुक्कामीं व प्रभू लोक याजवर महाराजांचा कुल विश्वास. इतबारी म्हणोन अठरा कारखानियांचा नविशिंदी महाराजांनीं सांगितल्या. चिटणिशी व कारखानिशी व खासनिशी व पारसनिशी व मुलकी हवाले व मुलकी मजमू व पहाडी किल्ले यांच्या व कोट यांच्या कारखानिसा, जंजिरे आदीकरून व चिटणिशा सुभ्यांच्या व सरदारांच्या व अष्टप्रधानांच्या व मुलकी फडणिशा व लष्करच्या जमेनिशीं व जमेची मजमू, दरुनी महाल व दौलत व बंकच्या सबनिशा व तरांडियाच्या सबनिशा व त... डियांतील मत्ता जे सांपडेल त्याची देखरेख लिहिणें, तरांड्याचा सर्व लिहिण्याचा व चौकशीचा धंदा प्रभु लोकांनीं करावा. जे जे धंदे प्रभूंस महाराजांनीं नेमिले हे दुसरेस प्रयोजन नाहीं. विश्वास सर्व प्रभु लोकांवर व देशस्थ ब्राह्मणांस व वरकडांस महाराजांची आज्ञा भंग करून धंदा द्यावयास कोणांस ममवंशीं प्रयोजन नाहीं. हे शपथ प्रतापदुर्गनिवासिनी श्री तुळजा भवानीचे चरणावर हस्त ठेवून बाळाजीआवजीस महाराजांनीं अंतर्यामापासून दिधली. हें प्रमाण. यासि अन्यथा जो म्हणेल त्यास जय सर्वथा येणार नाहीं. गड व कोट व महाराजांसंनिध प्रभु लोक यांजपासून का-

---

१७. ह्या मजकुराचा पुढें मागें संबंध नसतांच लिहिलेला आहे त्यावरून तो मागाहून घुसडलेला असावा.

१८. निविशिंदा=लेखक, लेखकाची असामी, नेमणूक.

१९. कुचालीय=वाईट चालीचे ?

बोलले. जो कुडाळकरांचा विश्वास ध-
रील तो समुळीं बुडेल ह्मणोन म-
हाराजांनीं हुजुरातीत व देशांत व
लष्करांत एकंदर सेवा सांगितली.
शेणवी लोकांचा वीट महाराजांनीं घे-
ऊन यांवर कृपा करील त्यास श्री
अंबेची शपथ असे. एवढा वीट

डीची तफावत होणार नाहीं, हा नाभि
कमळापासून महाराजांनीं निशा होऊन
देशस्थ ब्राम्हणांचे व प्रभू लोकांचे
मांडीवर महाराजांनीं उसें ठेविलें आहे
बेफिकीर महाराजांनीं दोहीं यातीवर
कारभार संबंधें हे आपले शुद्ध जा
बेइमानीचा डाग लागों देणार ना

महाराजांस करावयास काय कारण म्हणाल तर महाराजांची चढाई कुडाळ लखम सावंत देसाई याजवर जहाली. महाराजांनीं कुडाळ देश व पंचमह काबीज केले. मर्दनगड ते समयीं घेतले. सिवेश्वर कडवाळ व बारे काबीज केला. फिरंगी जबरदस्त यास जेरजप्तीस महाराजांनीं आणून गोट पाणियांतून व थडी धरून केले. तेसमयीं कुडाळकर देसाई यांचा कारभ सबनीस अनंत शेणवई होता. त्याचे विद्यमानें फिरंगी याचा तह रह कर असतां महाराजांस हितशत्रुत्व दारू न, त्याचे मिलाफास मिळोन, विश्वास दा वून बेफाम असतां वजनदार गणोजी तांडेल याचे कायत तो त्यासमयीं महा जांस निदानीं कार्यास आला. अनंत शेणवई याचें जालें वृत्त निवेदिलें. ते महाराज सावध जहाले. चित्तांतच गोष्ट महाराजांनीं गुप्त ठेविली. तेच सम फिरंगी यांचा सल्लाह करीत असतां वैशाख बहुल सप्तमी रविवार मध्या रात्रीचे समयीं अनंत शेणवी माहीत पुढां होऊन, दहा हजार फिरंगी तळावरि ठेवून एकाकीच महाराजांचा डेरा रोंखून आले. महाराज बा तमीमध्येंच राखण होते. गणोजी तांडेलानें चालोन आले म्हणोन रात्रीं गुप्तरूपें इशारत दिधली. महाराज गोठ सोडून तेच क्षणीं फौजेनिशीं अदकोश पर्यंत मजबुदीनें उभे राहिले. फिरंगी यांणीं येऊन एकाएकीं डेरा रोखून स बत्ती केली. इतकियांत प्रातःकालचा समय झाला. मोरोपंत व हंबीरराव व मावळे लोकांनीं हर हर महादेव शब्द करून चालोन घेतले. फिरंगी यांचीं पाणियांतून झुंजणार घोडे राऊत पाहून अवसानें खत्ता जहालीं. पेशव्यांनीं व हंबीरराव सरनोबत व बाजे सरदारांनीं निःशंक घोडीं घालून फिरंगियांचा मोड केला. युद्ध भारी जहालें. तेथें लोक बहुतच ठार पडले. कित्येक जखमी झाले. फिरंगी अगदीं कापून काढिला. दहा हजार टोपीकरांत हजार बाराशें पळोन गेले. त्यांपैकीं कांहीं पाण्यांत उड्या टाकून बुडाले. व कांहीं निघून गेले. खासा महाराजांस जिवानिशीं दगा करावा ऐसाच मजकूर झाला होता. परंतु श्रीअंबेची कृपा तेव्हां काय होणें! ऐशी दुर्बुद्धि अनंत शेणवी यानें

ली होती. या लोकांचा विश्वास धरूं नये. राज्यास अपाय झाला होता. ऐसें ाराज मोरोपंत पेशवे व नेताजी पालकर व हंबीरराव सरनोबत व चिटणी- व पारसनिवीस यांजवळ बोलिले. ऐसे मर्दाने माणूस महाराजांजवळ होते णोन शत्रूचा पराजय जहाला. यश संपादिलें. फिरंगियांस धास्त पडली. ंचा मुलूख बारदेश मारून जाळून सत्यानाश केला. लष्कर आभर जहालें. ट नागावा सोनें, रुपें, व पुतळी व हरजिन्नस कापड, मिरे, खोबरें, सुपारी, ारीक, खजूर, लवंग बेमुबलग सांपडली. गुरें ढोरें व पागा माणसांचे बंद रिले. कांहीं करुणा चित्तांत आणिली नाहीं. फिरंगी सांपडतांच जिवें मारिले. फिरंगी साहुकार जे सांपडले त्यांस आणून खंड बांधला. पंच लक्षांचा प सरकार रुजू जहाला. कुडाळकर देशमुख खेमसांवत बं.जिद येऊन म- जांचे आज्ञेप्रमाणें हालखुद मर्यादेनें राहिला. कुडाळ फोंडे बांदें साकळी री तुचाळी येथें ठाणीं महाराजांनीं सरकारचीं घातलीं. देसाई यानें जो तीचा हक्क [ तो ] मात्र घ्यावा. बारदेशांतही ठाणीं घातलीं. चहूंकडून याासि चौकीच बसविली. तेव्हां फिरंगी ाविने स्थल हरयत्नें करून राजे ल यास काय उपाय? अनंत शेणवी याचे सांगणें वरून आपले पदरीं नी आली म्हणून फिरंगी विचारीं पडिले. आणि आपला परिहार लेहून ांगोन पाठविलें जे, अनंत शेणवी याचे गोष्टीवरून भ्रष्ट जहालों. येविशीं आला असेल तो क्षमा करावा. जो तोफा द्यावयाचा नेम केला आहे त्या ाणें प्रतिवर्षीं देतों. म्हणून सभ्य मनुष्य पाठवून तहनामा लिहून पाठविला. महाराजांस पुतळी सोनेची वीस हजार व वस्त्रे व तुतरी व तबकीर पूर्तकाळी शिसे व प्याले व बंदरी रावे व नुरया, गोमांतकी आंबे व नाना जिन्नस ठावळ पाठविली. सल्लाह जाहला. चौऱ्यायशीं बंदरीं महाराजांचें शासन चा- ू नंतेंर.

सेनासंभारीं हस्ती व छावे गणती सुमार २००० दोन हजार.

पागियांतील तरांडीं जहाजें येणेंप्रमाणें सुमारी.

| | | | |
|---|---|---|---|
| ३० गुराब थोर. | ५० गुराब लहान. | ६० तारवें. | १५ जूग. |
| १०० गलबतें. | १० होडिया. | २५ पाल. | ५० मचवे. |
| १५० महागिऱ्या. | १५० होड्या लहान. | | |

---

२० बजिद=विजित, शरण.
२१ हालखुद=यथावश्य, जसा पाहिजे

२२ हा मजकूर मोजदादीच्या यादीमध्यें कसा घुसडला गेला तें समजत नाहीं.

जमाई तारखे एक हजार ल्हान थोर यांसि सरदार मर्दाने

| | | |
|---|---|---|
| १ दरया सागर. | १ मायनाक. | १ इब्रामखान. |

हशम मावळे खलक असामी १००००० एक लक्ष हशमांचे सर यांची नांवनिशी येणेंप्रमाणें:—

| | | |
|---|---|---|
| १ येसानिकम सरनोबत. | १ येसजी दरेकर. | १ सूर्याजी मालुसरा. |
| १ बाळाजीराव दरेकर. | १ गणोजी दरेकर. | १ सोनदळवी. |
| १ भिवाजी दळवी. | १ चांगोजी कडू. | १ कोंडाजी कदम ( ! |
| १ कुडाळकर. | १ त्रिंबक वाजी प्रभू. | १ शेवाळे. |
| १ कोंडाजी फर्जंद. | १ तानसांवत. | १ तानाजी तुंदुसकर |
| १ मुपाजी सुपेकर. | १ दत्ताजी इंदूळकर. | १ कृष्णाजी भोंसले. |
| १ पिलाजी कैंगसे. | १ ला[ क ! ]लधडा. | १ भिवाजी पोवार. |
| १ बिरोजी मराठे. | १ मुधाजी बेणकणा. | १ रायाजी मोरे. |
| १ मालसांवत. | १ हिरोजी भानगिरा. | १ विठोजी कडू. |
| १ तुळाजी कडू. | १ इंद्रोजी गारवडे. | १ तिमाणाजी भणग |
| १ जावजी मोहन. | १ रामदळवी. | १ मागोजी फर्जंद |
| १ बाल सांवत. | १ तानसांवतमावळे. | १ तानाजी दरेकर. |
| १ महादजी फर्जंद. | १ अण्णाजी मचाला. | १ जनाजी नळगा. |

सरदार एकूण ३९ एकूणचाळीस.

अष्टप्रधानांची नांवनिशी ज्यांवर महाराजांचा राज्यभार विश्वासू प्रभू लो यांचा हवाला महाराजांचा सर्व जिव्हाळा यांचो थोर्कें नांवनिशी:—

## अष्ट प्रधान.

| | |
|---|---|
| १ मोरो त्रिमळ मुख्य प्रधान. | १ निराजी रावजी न्यायाधीश. |
| १ दत्ताजी त्रिमळ मंत्री. | १ हंबीरराव मोहिते सेनापति. |
| १ रामचंद्र निळकंठ अमात्य. | १ त्रिंबक सोनदेव सुमंत. |
| १ अण्णाजी दत्तो सचिव. | १ रघुनाथ पंडितराव दानाध्यक्ष. |

√ ८

## प्रभुलोक इतबारी सेवक.

| | | |
|---|---|---|
| १ बाळाजी आवजी चिटणीस. | | १ निळकंठ येसाजी पारसनिवीस. |
| १ त्रिंबक विठ्ठल खासनीस. | | १ महादाजी नारायण. |
| १ चंदो नारायण. | १ कृष्णाजी बाहिरव. | १ बापोजी निळकंठ |
| १ गणेश शिवदेव. | १ रायाजी जनार्दन. | १ चंदो बिरदेव. |

२३. 'सणस' तर नव्हे. | २४. थोक=ठोक, मोठमोठा, ठोक

| | | |
|---|---|---|
| संक्राजी राम. | १ रामाजी भास्कर. | १ नागोजी बल्लाळ. |
| काकाजी लक्ष्मण. | १ रायाजी. | १ राघो बल्लाळ. |
| जसाजी. | १ गोविंद. | १ दादाजी. |

महालो महालचे मातबर सुभेदार येणेंप्रमाणें ब्राह्मण नांवानिशी.

| | | |
|---|---|---|
| बाळाजी अनंत. | १ नरसो गोपाळ. | १ त्रिंबाजी रामचंद्र. |
| त्रिमाजी पंत. | १ भिकाजी गोपाळ. | १ हो गो नरहर. |
| कृष्णाजी सोमनाथ. | १ नरसो गोपाळ. | १ गंगाधर त्र्यंबक. |
| मोजी नरहर. | १ कृष्णाजी अनंत. | १ विठ्ठल कृष्ण. |
| : रघुनाथ. | १ तिमाजी भगवंत. | १ दत्ताजी दामोदर. |
| राम पंत. | १ पुरुषोत्तमपंत. | १ दामो अनंत. |
| ो संभाजी. | १ लिंगो नारायण. | |
| जी राम. | १ व्यंकटाद्रीपंत. | १ बाळाजी मोरेश्वर. |
| ाजी द प ट शा. | १ जनार्दन कोनेर. | १ सुंदर दत्ताजी. |
| माजीपंत. | १ होनो नरहर. | |

२८

कूण अठ्ठावीस सुभेदार राजापूर नागोठणे पेण पनवेल जुवें राजापुरी ड बारा मावळें कुडाळ फोंडें तुचाळी व वाघरा व खारेपाटण बऱ्हाणपूर करून बऱ्हाड देशपर्यंत मुलुखाची जशी महाराजांनीं केली. सुभेदार व दार मजमदार चिटणीस फडणीस हुजुरून नेमून दिले.

ड पाहाडी व कोट जंजिरे सोडविले. अहद रायगड तहद तळकोंकण ब ीपासून गंगथडी कर्नाटक विजापूर भागानगर बेदर व दौलताबादेपासू-ंदर जमाई नांवनिशी येणेंप्रमाणें तपशील.

| | | |
|---|---|---|
| पहाडी किल्ले. | १३ जंजिरे पाणियांतील. | १०८ भुईकोट. |

३६१

तपशील.

पहाडी किल्ले उत्तरप्रांत.

| | | | |
|---|---|---|---|
| खुद्द रायगड. | १ रोहिडा. | १ लोहगड. | १ श्रीमंतगड. |
| लकाद्रीगड. | १ रवळागड. | १ कांचनगड. | १ ब हु ळा. |
| तकागड. | १ पद्मगड. | १ सुधाकरगड. | १ मंडणगड. |
| दगड. | १ भिंगलगड. | १ ढोमगड. | १ मनरंजनगड. |

| | | | |
|---|---|---|---|
| १ पांडवगड. | १ सुमरीगड. | १ सुंदरगड. | १ वारूगड. |
| १ भूषणगड. | १ मचींद्रगड. | १ केळनागड. | १ त्रीरहंसगड. |
| १ कमलगड. | १ राजहंसगड. | १ प्रौढगड. | १ वनगड. |
| १ मतगड. | १ दुमदुर्ग ऊर्फ. | १ भुजबळगड. | १ नलदुर्गगड. |
| १ मयूरगड. | १ सबळगड. | १ मोहनगड. | १ तुंगगड. |
| १ पट्टागड. | १ सोनगड. | १ मृगगड. | १ सबळगड. |
| १ तिकोनागड. | १ खोलगड. | १ रुद्रमाळगड. | १ कोयळागड. |
| १ श्रीवर्धनगड. | १ मित्रगड. | १ बलवंतगड. | १ बहिरवगड. |
| १ भूपाळगड. | १ सारगड. | १ सगुणगड. | १ वासवटाग |
| १ करनाटकगड. | १ सदाशिवगड. | १ अहिरागड. | १ वर्धनगड |
| १ माहुलीगड. | १ कचेरीगड. | १ विराटगड. | १ कांचनग |
| १ महीधरगड. | १ रत्नगड. | १ लोहनगड. | १ वळोंदग |
| १ कांगोरीगड. | १ नागोरीगड. | १ वरताडागड. | १ प्रचीतग |
| १ महिपतगड. | १ वसंतगड. | १ पेवगड. | १ अहिवंतग |
| १ अचलागिरीगड. | १ पुरंदरगड. | १ मणोलगड. | १ सुरंगगड |
| १ तोरणागड. | १ शङ्खजगड. | १ सालेरीगड. | १ सालोत्रीग |
| १ जवळागड. | १ त्र्यंबकगड | १ प्रतापगड. | १ बळराजग |
| १ मर्दनगड. | १ मदनगड. | १ मोरगिरीगड. | १ गुणवंत |

पाहाडी किल्ले दक्षणप्रांत.

| | | | |
|---|---|---|---|
| १ भूधरगड. | १ सामानगड. | १ वल्लभगड. | १ भिंवगड. |
| १ कळानिधिगड. | १ पारगड. | १ पवित्रगड. | १ पावनगड. |
| १ बहिरवगड. | १ मनोहरगड. | १ बसतासगड. | १ नरगुंदगड |
| १ पराक्रमगड. | १ गजेंद्रगड. | १ कठोरगड. | १ भूपालगड |
| १ रामसेनगड. | १ कुंभगड. | १ सटगागड. | १ सेवकगड |
| १ गंधर्वगड. | १ रामदुर्ग. | १ भीमदुर्ग. | १ सीखोनग |
| १ चतुरगड. | १ नगगड. | १ हडसरगड. | १ पर्वतगड |
| १ सिद्धगड. | १ भोरपगड ऊर्फ. | १ घनगड. | १ मशीगड. |
| १ बेदरगड. | १ भास्करगड. | १ मदनगड. | १ हरिश्चंद्रग |
| १ लालबेलगड. | १ सुमनगड. | १ सरसगड. | १ माणिकगड |
| १ बिसापूरगड. | १ प्रबळगड ऊर्फ. | १ देवगड. | १ यशवंतगड |
| १ खालारीगड. | १ पैजारगड. | १ अलमलगड. | १ पालकगड |
| १ रमोजीगड. | १ ऐंबलगड. | १ पालगड. | १ परसगड. |

| | | | |
|---|---|---|---|
| धवलागिरीगड. | १ खालारीगड खुर्द. | १ जयवंतगड. | १ नारायणगड. |
| अहेरागड. | १ धामालगड. | १ कैलासगड. | १ विजलीगड. |
| ंद्रगड. | १ कुरूडगड. | १ नरसीगड. | १ गुलाबगड. |
| ्णलौकिकगड. | १ धराजगड. | १ रसाळगड. | १ प्रसिद्धगड. |
| विशालगड. | १ पनाळागड. | १ गगमगड. | १ कोप्नळगड. |
| सातारागड. | १ चंदनगड. | १ वंदनगड. भारपैगड. | |
| ज्जनगड ऊ- | १ सिंहगड. | १ कल्याणग तायवडागड. नादगारा. | १ प. |
| र्फ परळी. | १ मलंगगड. | | |
| ट्टागड. | १ त्र्यंबकगड. | १ सिलेमानगड. | १ परजगड. |
| तोंडलागड. | १ कांचनगड. | १ हरिहरगड. | १ मांढवगड. |

कोट येणेंप्रमाणें:–

| | | | |
|---|---|---|---|
| ोगल. | १ बंकापूर. | १ खारेपाण. | १ कोट वसमंत. |
| कोट माहूल. | १ कोट खटाव. | १ कोट वाई. | १ कोट कऱ्हाड. |
| कोट पुणें. | १ कोट हुमी. | १ कोट पैठण. | १ कोट बीड. |
| कोट कंपूर. | १ कोट फोंडें. | १ कोट ेडवाल. | १ कोट लंबर. |
| ोट अम्मल. | १ कोट मंगरूळ. | १ कोट ेवेश्वर. | १ कोट हल्याळ. |
| कोट फेलूर. | १ कोट सुपें. | १ कोट ळवंगें. | १ कोट कैंबर. |
| ाट कृष्णगिरी. | १ कोट चाकणा. | १ कोट वाड. | १ कोट धारापूर. |
| कोट मिरज. | १ कोट धारवाड. | १ कोट म | १ कोट जंगमी. |
| कोट शिराळें. | १ कोट शिरोळ. | १ कोट ेलनदी. | १ कोट रायबाग. |

३६

समुद्र पाणियांतील जंजिरे बितपशील.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कुलाबा. | १ रत्नागिरी. | १ विजयदुर्ग. | १ सिंधुदुर्ग. | खांदेरी. |
| उंदेरी | १ पद्मदुर्ग. | १ गहनदुर्ग. | १ सुवर्णदुर्ग. | राजकोट. |
| अंजनवेली. | १ सरजाकोट. | १ खाकेरी. | | |

एकूण १३

**किता कोट:—**

| | | | |
|---|---|---|---|
| ाट कुडाळ. | १ कोट हवनूर. | १ कोट शिरस्ली | १ कोट डबळ. |
| कोट जानबपाल. | १ कोट कलबगी. | १ कोट कमल. | १ कोट यादवाड. |
| ोट लक्ष्मीश्वर. | १ कोट पारनरी. | १ कोट कल्याण. | १ कोट जागनूर. |
| कोट ससवड. | १ कोट कोडमटकल. | १ कोट बागलाण. | १ कोट त्रिमळी. |

१ कोट सावलगी. १ कोट जालकापुरी. १ कोट भरंडी. १ कोट येलापू
१ कोट धाराशीव. १ कोट धारूर. १ कोट परळी. १ कोट तांबने
१ कोट चौल. १ कोट महाड. १ कोट बिसगड. १ कोट कबूर
१ कोट गलघडेल. १ कोट येदगिरी. १ कोट तांत्रवल्ली. १ कोट बाराम
१ कोट ..रुघटकी. १ कोट पैठण. १ कोट जालनापूर.

**कर्नाटकीं नवे जुने गडकोट कोल्हार व वरघांटचे बितपशील**

१ नंदी... १ चेनगड. १ ब्राम्हणगड. १ भास्करगड.
१ ग... १ मिचलागड. १ प्रकाशगड. १ कर्नाटकीभूषणग
..गड. १ टिमकुरगड. १ अंबाजीराईगड. १ दुर्गगड.
१ वडत्रगड. १ कैवारगड, १ कर्नाटकी मल्हारगड. १ रणगड

१६

श्रीरंगपट्टणचे सरहद्दीचे गड व कोट बितपशील गड सुमारी.

१ कल्पगड. १ कर्नाटकी सुं रगड. १ महीनंदगड. १ रंजनगड
१ प्रमोदगड. १ कर्नाटकी नोहरगड. १ मनरंजनगड.

७

कोट सुमारीं,

१ कोट धर्मपूर. १ को तळमरी. १ कोट गरुड. १ कोट कांबट
१ कोट गांडापूर १ ट धारापूर. १ कोट अंजूर. १ कोट कानक
१ कोट त्रिकापूर. १ ट शामल. १ भवानदुर्ग. १ कोट वाहीर
१ कोट काजगी.

१३

कर्नाटक प्रांतींचे कोट सुमारी.

१ कोल्हार कोट जुना. १ कोट बिदनूर. १ कोट बिराड. १ कोट बुंदी.
१ कोट मल्कादर. १ खेतुरपाळ. १ कोट कुंजर. १ कोट कोल्हा
१ सिंदुरका.

९

घांटाखालें कोट प्रांत जगदेव कर्नाटक याची नांवनिशीं.

१ जगदेव गड. १ वरुण गड. १ कवल गड. १ कर्नाटकी गगन
१ सुदर्शन गड १ महारज गड. १ कृष्णगिरीगड. १ रमच गड.
१ सिद्ध गड. १ कमलार्जुन गड. १ जवादी गड. १ कस्तुर गड.

मल गड १ कर्नाटकी प्रबळ गड. १ मार्तंड गड. १ बहिरव गड. दाली गड. १ मेल गड. १ रज गड.

१९

त येलूरचे चंजी चंजावरचे गड पहाडी किल्ले सुमार.

जरा गड. १ कैलास गड. १ प्राण गड. १ महिमली गड.
गड. १ मुखवी गड. १ ऐरावती गड. १ अर्जुन गड.
र्नाटक गड. १ देव गड. १ पिलिवल्ली गड. १ सप्तसागर गड.
जावर गड. १ गर्जन गड. १ कलह गड. १ राजगड.
न गड. १ मन्मथ गड. १ हणमंत गड. १

१९

कोट येलूरचे चंजीचे तपशील.

ट येलूर गड. १ कोट बसनूर. १ कोट अर्कोट. १ कोट देवाणा दरगा.
पाल. १ कोट वृद्धाचा १ कोट त्रिनोमाली. १ कोट त्रिकोलूर.
ट अवरसू. १ कोट काळा. १ कोट वलनूर. १ कोट त्रिपादी.
बारा कोट म्हणजे एक चंजी किल्ला १.

तेरीज १३

कूण स्वराज्यांतील व अविंदाचे व रायळाचे व पाळेगाराचे व कर्नाटक चे व विजापूर पादशाहाचे व भागानगरकर तानाशहाचे व बेदरकर व ो ो पादशाहाचे तख्त दौलताबाद बहेरी कुतुबशाहाचे व कोकण करून जंजिरे पाहाडी किल्ले व भुईकोट अहद तख्त शायरी पासून तैलं- गोमा नर्मदा तहद कर्नाटक चंजीचे वरचे सरदी श्रीरामेश्वर पर्यंत जमाबंदी.

तेरीज एकंदर.

पहाडी किल्ले. १०८ कोट सुमार. १३ जंजिरे समुद्र पाणियांतील.

३६१ जमाई.

ल्ले पाहाडी दोनशें चाळीस व कोट एकशें आठ व पाणियांतील जंजिरे गप्रमाणें महाराजांनीं आपले स्वसत्तेचे करून राज्याचा बंदोबस्त केला. गूरत्वेंकरून जोरावारीनें औरंगजेब ठायीं टेकून दिल्लीची पादशाही क- वढा मात्र हेतु चित्तीं धरिला आहे. श्रीअंबा करील तें प्रमाण. ऐसें ज ज्येष्ठ पुत्र संभाजी राजे यांजवळ बोलिले.

दनंतर संभाजी राजे यांस परम ममतेनें युक्तीचे मार्गें शब्द लाविला जे,

२५. मवास = लुटारू लोक.

"तुम्ही राज्याधिकारास योग्य शहाणे विचक्षण सर्व गुणें बुद्धिमंत सालंकृत स्वर सुंदर असतां आमची ममता न धरितां अतिशय राग करून अमित्र दिलेलख याजकडे रुसून जाऊन राहिलां. दिलेलखान म्हणजे काय! तुम्ही हिंदुप पादशाह कांहीं सामान्य नव्हे. दक्षण हस्तगत करून दिल्लेश्वरास हतभग्न ला. रात्रदिवस चिंताप्रवाहीं [ पडून ] तख्त सोडून निस्तेज जहाला. वीस उंमराव पादशाह व शहाजादे यांसि शिक्षास्पद करून ठायीं ठेवि अटक बद्रिकाश्रमपर्यंत कीर्तिध्वज अचळ लाविला. चौऱ्यायशीं बंदरें कां केलीं. छपन्न पादशाहा विचारीं पाडिले. नर्मदेपासून श्रीरामेश्वरापर्यंत ए सत्ता केली. मवास पाळेगार व दक्षणेंतील चार पादशाह बुडविले. विक्रमें राक्रम करून शत्रु अगदीं निर्नाम केले. देशक दास्यत लाविले. अदलशाही व कुतुबशाही किल्ले व ठाणीं व कर्नाटक ठाणीं व किल्ले तमाम पाळेगारांचे घेतले. चंजी चंजावर आदीक तैसेच पाणियांतील जंजिरे कांहीं सामान्य नव्हेत, बाके दुर्घट जागे ट करांचे घेतले व नवे बांधिले. तदनंतर आपण औरंगजेबाचे दावे याजकारितां अजिक जागा पाहिजे म्हणोन या विवंचनेंत असतां श्रीअंबेनें द करून समुद्रांत जागा उत्तम नेमिला. राजापूर प्रांतीं महाराजांची स्वारी ग ली. संपूर्ण जंजिरे समुद्रांतील पाहिले, परंतु महाराजांचे चित्तांत ते न आले. यापेक्षां अधिकोत्तर स्थळ पाहिजे. तेव्हां समुद्र किनारां प पहात चालले तों अकस्मात जागा समुद्रोदरीं पाहिला. पाहून महाराजास सं जहाला. चौऱ्यायशीं बंदरीं ऐसा जागा नाहीं. तेव्हां तानाजी व मानाजी गंगाजी व सावजी कोळी होते त्यांस महाराजांनीं सन्निध पाचारून आणि आणि आज्ञा केली. तो जागा पाहून मार्ग कोणे प्रकारींचा याचें ठिकाण पा येणें, म्हणोन आज्ञा होतांच कोळी मजकुरांनीं जिवाची तमा न धरि नाना यत्नें लाग करून मार्गाचा ठिकाण पाडून येऊन कळविलेवर महाराज जेनिशीं त्या जागेचे नजीक समुद्र थडीस गेले. जागा पाहिला. मार्ग कठ सर्पाकार, तरांडी होडी मात्र चालते. सभोंवतें सारे खडक. दुसरी तरांडी द कोशपर्यंत यावयासि अगदीं गति नाहीं. तेव्हां तो जागा महाराजांचे नि मानला. कोळी मजकुरावर महाराज मेहेरबान होऊन चौघांस सोनेचीं व व मंदील पैठणी पासोड्या व किनखापी तुंबे[६] पायांतील देऊन बक्षीस शाही होन सुमार १०० प्रमाणें दिले व चौघांस गांव तेच क्षणीं वंशपरं देऊन गौरविलें. आणि तांडेल-कर्माची सेवा सांगितली. तदनं

---

तुंबा=तुमान.

मुहूर्त पाहून पाथरवट असामी पांचशें व लोहार असामी दोनशें आणून इ दोनशें खंडी खरेदी करून टांक्या हातोडे व पहारा व अडू वगैरे करविले. नंतर धोंडे काढवून पायाचे व इमारतीचे टांकी लावून तयार ले. कांहीं आरपार छिद्रें पाडून मुस्तेद[७] केले. व पांच खंडी शिसें आणून रेचा पाया शोधून घातला. श्रीगणेश पूजन व समुद्र पूजन करून तरां-तून धोंडे व सामान नेऊन काम चालीस लाविलें. शर्करा वांटल्या. ब्रा-भोजनें घातलीं. समुद्रास दक्षणा सुवर्ण नाणें होन १०० अर्पिले. व ार्थे व फळावळ सुवर्णाचें श्रीफळ पाणियांत अर्पण केलें. बाधें ला. . वस्त्रें मंदील चादर वाहिलीं. तदनंतर महाराजांनीं हुन्नरवंत पाथरूट मुस्तेद करावया कोळी व कामाठी व बाजे लोक मिळोन तीन हजार व वरकड जंजिरियाचें आरमार आणून पाणियांत गांव दोन गांवचे तीनें सामान सुद्धां व तोफा व दारूगोळा सहित ठेविले. तडीस पांच मावळे लोकांची चौकी नेमिली. व गोंव्येकर फिरंगी यांस ताकीद केली ील फिरंगी हुन्नरवंत कांबील जंजिरियाचें कामकाजांत म्हणोन आणविले. दिवसेंदिवस जंजिरा मुस्तेद करावयासि कोटी हो. उदक महाराजांनीं सोडिलें. इमारत पक्की तळ शोधून बांधावयासि दी. धोंड्यांत आरपार आडून घालून पक्कें काम पाणियास जुम्मैस न ऐसें बांधिलें. पुढें काम गच्ची पक्कें होत चालिलें. बांधावयाची सारी महाराजांनीं सांगितली. त्या कामावर नेहमीं गोविंद विश्वनाथ प्रभू सु-कुंभार जुवें यांत कुडाळकर पेशजीचे वतनदार शहाणे मनुष्य होते ही नांवाजून कामावरि ठेवून महाराज रायगडास आले. तिसरे वर्षी मुस्तेद होत आला. महाराजांस गोविंद विश्वनाथें खबर पाठविली. त्या-. महाराज पनाळियास येऊन तेथून बावडे घांट उतरोन कोंकणांतून पहावयास गेले आणि सुमुहूर्त पाहून आंत प्रवेश केला. तोफा झाल्या. वांटली. तदनंतर वास्तु करून ब्राह्मण संतर्पण पांच हजारांचें करून. क्षणा यथासांग संपादून पाथरूट यांचे नाइकास वस्त्रें व सोनियाचीं धलीं. आणि गोंवेचे हुन्नरवंत फिरंगी यांस नांवाजून कपतान वे ांस भरजरी वस्त्रें व सोनेचीं कडीं देऊन निरोप दिधला. तदुत्तर गो-विश्वनाथ प्रभू सुभेदार यास नांवाजून प्रसादिक वस्त्रें मंदील नाबदी[३२] व

मुस्तेद–कायम, स्थिर.
श्रीफळ=नारळ.
बाजेलोक=इतर माणसं.

३०. काबील=हुशार.
३१. जुम्मस=धास्ती, भीति.
३२. नाबदी–उसाचें कांडें. त्यासारखा ?

चादर भरजरी व झगा मंदिलाचा व मोत्यांचा तुरा व चौकडा व सोनेचीं क
व खासा हुद्देतील फिरंग्र [३३]जेनबी नवटाकी अति उत्तम देऊन पाठी यापट
बहुत प्रकारें नावाजिलें. आणि हे लोक शहाणे इतबारी परम युक्तिवान् च
भरंवशाचे म्हणोन जंजिरा पाहोन मोठा आनंद जहाला. त्यास पारा
नाहीं. मग त्याचें नांव सिंधुदुर्ग ठेविलें. आणि शर्करा सर्व जनांस वांट
तदुत्तर मामलेदार तीन हजार माणूस ठेवून ठेविले. त्या मावळे लोकांस
इक्या व सरनाइक्या व तट सरनोबत असे हुद्दे देऊन पुत्रपौत्रादि वंश पर
वेतनें शाश्वत केली. आरमारें सजलीं. चौऱ्यायशीं बंदरांत हा जंजिरा मे
अठरा टोपीकरांचे उरावर शिवलंका अजिंक जागा निर्माण केला. ज
सुवर्णाची लंका दशाननाची, तेथेंही यत्न चालिला, परंतु येथें अयत्न
शत्रूचें किंमपि भय नाहीं. महाराज अवतारी यास्तव प्राप्त जहाला. प
याचे मारास बुरूज करवणें असोन नाना प्रकारें यत्न केला. परंतु उ
चालेना. याजकरितां महाराज चिंतासागरीं पडले. पुढें गति कैशी क
म्हणोन श्रमी असतां चैत्र शुद्ध पौर्णिमा भृगुवारीं मध्यरात्रीस महाराजांचे
श्रीअंबेनें संचार करून म्हणो लागली जे, " अरे लेकरा, येविशीं
न करणें. तूं चित्तांत योजिलें कार्य सिद्धीस पावेल. येविशीं श्री साग
प्रार्थना करून सिंधु तटाकीं दर्भासन घालून तीन उपोषणें केलिया स
प्रसन्न होऊन मार्गा सरेल. हें प्रमाण. यदर्थीं संशय नाहीं. " ऐशी श्री
आज्ञा करून तत्क्षणीं गुप्त जहाली. महाराज सावध होऊन स्वप्नावस्था का
नाईक व बाळाजी आवजी प्रभू चिटणीस यांस बोलावून आणून स
वृत्त श्रीदेवीचे कृपेचें सांगितलें. तदनंतर महाराजांनीं समुद्रतीरास जा
यथाविधि पूजन करून साष्टांगें प्रणिपात घालून एकाग्रचित्तें आसनावर
हार तीन उपोषणें केलीं. तिसरे दिवशीं रात्रीं सागर ब्राह्मणरूपें
येऊन चमत्कार दाखविला जे, " तुज प्रसन्न जहालों. जे इच्छा केल
परिपूर्ण सिद्धीतें पाववीन. चिंता न करणें. उपोषण न करितां
विसर्जन करून स्वस्थ रहाणें." अशी आज्ञा होतांच प्रातःकाळीं महारा
दर्भासनावरून उठोन नवविधा भक्तिभावें पूजा करून सुवर्णपात्रीं कर्पूर
पाजळोन सागरास महाराजांनीं वोंवाळिलें. नंतर द्वयकरकमल जोडून सा
अभिवंदन प्रार्थना केली, " समर्थें अमोघ कृपा सदैव करून यवन और
शत्रुभयास्तव उदरांत जागा दिधला पाहिजे कीं, समर्थांचा दासानुदास
वीत आहें. समर्थ दयाळू होऊन मानाभिमान धरून दर्या बुरूज

३३. जनेबी=दक्षणी.

..या म्हणजे चित्तास संतोष होईल. एवढी प्रार्थना ऐकावी." ऐशी प्रार्थना ..तांच पंधरा हात सागर माघारा सरला. बुरूज बांधावयास जागा दिधला. ..र्थ समुद्रकृपेनें घडतांच जयजयकाराची ध्वनी संतोषचित्तें जहाली. त.. ..तर दर्या बुरूज तयार केला. महाराजांवर श्रीअंबेनें व समुद्रानें अद्वितीय ..केली. या कंकणांकित जगतींत अठरा टोपीकरांस व औरंगजेब पाद.. ..स ऐसा जागा अप्रतिम नाहीं. सागरानें सरूप होऊन निरुपम महास्थळ ..राजांस प्राप्त केलें. संपूर्ण जंजिरियांत प्रमुख अधिक हा सिंधुदुर्ग महा.. ..चें हृदयकमलच. ही प्रमाणताच. यदर्थीं श्लोक.

महाराजांनीं मालवणास सिंधुदुर्ग बांधिला तो सर्व जंजिऱ्यांत प्रमुख झाला वर्णन.

सिंधूदुर्ग असेच कौस्तुभ मणी झारत्न वीलोकितां ।
नाहीं आन विधी च [ यास ] वंदला याची च या योग्यता ॥
देवादी असुरांप्रती हि भुधरां दिव्या नसे सागरें ।
तो हा शिवनृपास लाभ घडला श्रीशंकराचे वरें ॥ १ ॥
सिंधूदुर्ग समर्थ जाण मणि हा वीराजला भूतळीं ।
दुष्टांचें भय आगळें म्हणुनियां संरक्षिला म्हाजळीं ॥
सुवर्णांकित द्वारका तदुपरी लंका नये तूळितां ।
कौस्तूभाहुनि आगळा चि गरिमा त्याची च त्या योग्यता ॥ २ ॥
सिंधूची उपमा सिंधूसि च असे तैसी च त्या हो नभा ।
ऐसा अर्थ विलोकिजे च विदुषें आमोघ [illegible]भा ॥
जंजीरा महि मूल्य [ वान ] मणि हा वीराजला या क्षिती ।
त्याची साक्ष तयाप्रती च प्रभुजी सर्वत्र वाखाणिती ॥ ३ ॥
किल्ले आणिक जंजिरे गणुनियां केली नृपें माळिका ।
सिंधूदुर्ग समर्थ [ त्यांत ] मणि हा वीराजला हो निका ॥
इत्यादीक स्थळें जशीं उडुगणें चंद्रोपमा त्यां नसे ॥
जंजीरा विधु दूसरा च भुतळिं हें सत्य जाणा असे ॥ ४ ॥
सिंधूदुर्ग स्थळावरूनि चपळें लंका किजे सांडणें ।
जंजीरा अति आर्यता महितळीं मेरूसि केलें उणें ॥
काल्पी फुल्लचरी अयोग्य नयनें दासी च वीलोकितां ।
नाहीं या उपमा दुजी त्रिभुवनीं याची च या योग्यता ॥ ५ ॥
..गालदीप रमणीय हुनावराला । ओवाळणी करुनियां त्यजणें तयाला ॥
..लायता मसकता हिनताच आली । गोमांतकादिक स्थळें तृणतुल्य झाली॥६॥

तैसी चांच हि पूर्तकाल उपमा पावे च ना सर्वथा ।
सिंधूदुर्ग समर्थ जाण विलसे इत्यादि पाहो वृथा ॥
ऐसा हा नृपतीस [ दुर्ग ] सदयें श्रीसागरें अर्पिला ।
काळाची गति भिन्नता च घडली प्रत्यक्ष नीरिक्षिला ॥ ७ ॥
खांदेरी जयदुर्ग जाण विजया नाहीं कदा मान्यता ।
तैसी राजपुरी च खोकरि जगीं झाली च आयोग्यता ॥
जाणा मुंबइचे सदैव लवलें दृष्टी त्वरें काढिजे ।
सिंधूदुर्ग समर्थ एक विलसे त्यातें च वीलोकिजे ॥ ८ ॥
झाल्या कुंठित ऊपमा च अवघ्या अन्यत्र आणू नका ।
जंजीरा धणि आर्यता च विलसे आहे जगीं हा निका ॥
बोखाडा आणि शेडिया च चपळें झाडावया लाविजे ।
कूलाबा असे भालदार चतुरें मत्यक्ष वीलोकिजे ॥ ९ ॥
जाणा तो जळिं पद्म दुर्ग म्हणवी ताडेल आहे सदा ।
उंदेरी अति सान हीन चि असे दीनत्व भावी पदा ॥
सिंदूदुर्ग प्रिया अती रमणिका रत्नागिरी नेटकी ।
दूजी अंजनवेलि फार विलसे आहे स्वरूपें निकी ॥ १० ॥
नागांगना वसइ नृत्य करी सदैवा । तैसी च ते सुरत दाखवि सर्व भावा
घेलूर जाण नटवा मनरंजनाला । आपेक्षिला निशिदिनीं अति मान त्याला
असे दौलताबाद डौबारणी हे । उडी मारिली नीटकी ते न राहे ॥
शिलेमान पाहे [illegible] पापरूपी । यमूनाजळीं तो दडाला कुरूपी ॥
किल्ले कीट अगण्य जाण चि असे सेना सदा भुतळीं ।
सिंधूदुर्ग [ चि ] स्वामि [ हा हि ] सकळां आशोभ आहे जळीं ॥
त्याची नाटकिं वर्णिली च गरिमा चातुर्य वीलोकिजे ।
सन्मानें प्रतिपाळणासि करणें हें ईतुके अर्पिजे ॥ १२ ॥

सिंधुदुर्ग जंजिरा जगीं अस्मानीं तारा, जैसें मंदिराचें मंडण श्रीतु[illegible] वृंदावन तैसा महाराजांचें राज्याचें भूषणप्रद अलंकार अर्य मुक्ताफळ महाराजाचे संपूर्ण राज्यांत महीमोल्य किंबहुना अधिकोत्तर सप्रिय मुकुट शिवलंका जंजिरा शिवाजी महाराज छत्रपति सिंहासनाधीश्वर यांचा. मह[illegible] अवतारी सिद्ध पुरुष शापादपि शरादपि श्रीविष्णुअंश तेजोनिधि श्री[illegible] परम सखा जैसा श्रीविष्णु-शिव-भिन्नता अणुमात्र सर्षपमाय नच, याजव[illegible]

३४. अर्यमुक्ताफल—ग्रंथकाराच्या संस्कृत शब्दांचा प्रयोग करण्याच्या हौसेचें व त्यामुळें फशीं पडल्याचें हें आणखी एक उदा[illegible]

रानें सिंधुमंथनसमयीं श्रीसुरांस व असुरांस परम तोषें चतुर्दश महारत्नें
र्गी ते समयीं सिंधुदुर्ग पंधरावें रत्न अमोलिक अन्य उपमाच नाहीं.
ेश रत्नांपेक्षां अधिकोत्तर. कलिमाजी अनाचार प्रवर्तलेस येणार. ब्राह्मण-
ा व जगपालन व्हावयास्तव श्रीमहाविष्णु नृपावतारी मानवी रूपें धरणार.
निमित्य सागरें मित्रभाव स्मरोन हृदयगर्भी पंचप्राणवत् ठेवी ठेवून महा-
र्गी धर्मसंरक्षणाकरितां जंजिरा सागरानें महाराजांस अर्पिला. मोठा लाभ
ं. श्रीसुर किन्नर असुर इत्यादिक पवनभक्षकास[३६] भूचरखेचरास प्राप्त
स्तु जहाली नाहीं. चिंतामणि कल्पतरुवत् सिंधुदुर्ग निधिच महाराजां-
प्रयोगें लाधली. म्हणोन महाराजांचे आनंदोद्भव. भासास पारावार नाहीं.
रम दुंदिलता मानसीं महाराज कल्पादि दिवा डुलत आहेत. तदुत्तर महाराज
ावकें बोलिले जे, "आतां औरंगजेब ही कीर्ति जंजिरियाची श्रवणीं ऐक-
ारणागत येईल. वरकड या पादशाहाची कथा काय! मी शिवाजी
या महास्थळावरून पृथ्वीचा जय संपादून रघुराजप्रतिमेस पात्र होईन.
तेन्नाच सनेम केली. सिंधुदुर्गें अकस्मात् उदय पावला म्हणोन चौऱ्याय-
रोबंदरीं अठरा टोपीकरांचीं अवसानें खत्ता होऊन मृत्यु धाकें कंपित
सिंधुदुर्गांतून महाराजांनीं पृथ्वी आकाश भूमि विलोकून वामकरें स्मश्रू
किला. आणि परम आवेशें शरीरीं महाराजांचे संचार करून परम मो[३७] रो
महाराजांस जहालें. ते समयीं महाराजांसन्निध गोविंद विश्वनाथ प्रभू आर-
सुभेदार व अनाजीपंत व कोंडाजी फर्जंद व बाळाजी आवजी चिटणी-
रम विश्वासू निळोपंत याचे पुत्र रामचंद्रपंत व गंगाजी नाईक दीपधारी
ा महाल्या होते. तेसमयीं वाकनिसांनीं महाराज बोलिले प्रमाणें वाकाही लि-
जंजिरा महाराजांचें हृदयकमल जेणें संपूर्ण शत्रु पादाक्रांत होऊन जलधठ
ा ते स लागले. दिवसें दिवस महाराजांचे राज्याची अभिवृद्धि अधिकोत्तर होत
:. सागरोदकास ही महाराजांचे स्नानाचा आधार तोष होऊन दर्शनानं-
गर्जनेनें उन्माद जहाला आणि महाराजही सागरदर्शनें परमानंद
ऐशा गोष्टी श्रीअंबेनें घडविल्या." या कलियुगीं श्री ईश्वराच्या विभूती
दास स्वामी व महाराज औरंगजेब पादशाहास ज्ञानवंतच माणविले.
हा अर्थ अनाश्रुत संभाजी राजियास उघड करून मनोभावें महाराजां
ेतला. " या कलियुगीं क्षात्रधर्म संपादिला. पूर्वीचे सूर्य सोमवंशीं राजे

---

[३६] पवनभक्षक=सर्प.
[३७] ...राजा (सिराजह्)=सिंह.
मोरो-मोदित=मयूर-मोदित? मोर आनंदांत असतां पिसारा उभारितो त्याप्रमाणें आनंदरोमांच महाराजांच्या अंगीं उभे राहिले असा भाव?

सार्वभौम चक्रवर्ती या पंक्तीस श्रीभवानीशंकरवरदें वेदशास्त्रसंपन्न राज
गागाभट्ट काशीकर व्यास वाल्मिक यांसमान श्रीत्रिदशभुवनीं व मृत्युलोकीं
पवनभक्षकस्थानीं मान्य, ज्यांची स्तुति स्तोत्र सर्वत्र करीत आहेत, त्यांणी कृपा
रून श्री देवक सनाथ यांचे सिंहासनाधीश स्वयं महाराजांस करून क्षात्रधर्मकुर
तंस करून श्रीजनेश्वरपद प्राप्त केलें. ही अभिनवताच घडविली. औरंग
तांब्रापेक्षां दिगंतीं कीर्ति रूढविली. श्रीनिर्जराधिप चकित जहाला. व अनु
कृतात्रेताद्वापारींच पुण्यश्लोक राजे व राजकुमार परमसंतोषमानसें स्तुतिर
वर्णीत आहेत. ऐसें तुम्ही पाहून अविचार करून महाराजांचे आज्ञेविर
एकाकीं रुसून जाऊन दिलेलखानास भेटलां हे उत्तम गोष्ट केली नाहीं.
राजांस चिंतासागरीं रात्रदिवस पाडिलें. दिलेलखानासारिखे यांसि महाराज
सांगणार, औरंगजेबाचा तमा नाहीं, ऐसा महाराजांचा प्रताप समर्थ अ
तुह्मीं अनिष्ट गोष्ट केली. शत्रुजनांत लौकिक केला. तन्मुळे राज्यास अ
घडावा आणि तुम्ही पातशाहचे अंकेत रहावें हा औरंगजेबानीं निश्चय आरंभि
दिलेलखानानें पादशाहास अर्जी लिहून पाठविली जे, शिवाजी राजे यांचे
संभाजी राजे रुसून आपणाजवळ आले आहेत, ही बहुतच उत्तम गोष्ट
हाली. राजे यांचे घरांत कलह लागला, येणेंकडून बादशहाची सर्फराजी
आहे. शिवाजी राजे यांचे राज्यांत सहजच दुई लागोन सरदार व समस्त
ची फूट होऊन संभाजीराजे यांजकडे येतील, तेंव्हा शिवाजी राजे संपूर्ण
सुद्धां हस्तगत होतील. तरि अलंपनाहानीं हेंच करून संभाजी राजे यांसि
मान हत्ती घोडे तिर्रकष माहीमरातबें व वस्त्रें अलंकार पाठवून गौरव करा
केलियावरि महत्कार्य वरि पडतें. हें वृत्त पादशाहा यास श्रुत होतांच
केली जे, संभाजीराजे यांचा गौरव केलियानें पातशाही बुडते. घरांतच
निर्माण होतो. शिवाजी राजियाची हिम्मत कांहीं कळत नाहीं. हितशत्रु
यांत दिसतो. हा अर्थ चित्तांत आणून आंघात. कर्मास प्रवर्तावें. हे
कोणांस कळों न द्यावी. म्हणोन दिलेलखानास उत्तर लिहोन हरकारी य.
गमें रवाना केलें हें वृत्त दिलेलखानाचे वकिलांनीं अगोदर तावडतोब
पाठाविलें जे, तुम्हांस संभाजीराजे यांस घेऊन हुजूर दिल्लीस येणें विशीं
हिलें. त्यास कैदेत ठेवणार. ही बुद्धि पादशाहांनीं चित्तांत धरिली अ
ऐसें पत्र येतांच दिलेलखानांनीं क्रिया चित्तांत स्मरून बेइमानीचा प्रकार
करितां तुह्मांस एकांतीं नेऊन पादशहांनीं योजिला मजकूर सांगोन तक

---

१८. तिरकष्=बाणांचा भाता.
१९. माहीमरातब=मत्स्यादि राजचिन्हें.
१०. आघातकर्म=घातकर्म? अघोर·

दिधला. ही गोष्टी दिलेलखानानीं आम्हांवर मेहेरबानगी करून उत्तम श्रीअंबाच त्याचे अंतरीं प्रवेशली. तुम्हांस महासंकटांतून स्वराज्यांत गलें. पुन्हा तुमचा जन्म जहाला आणि तुमची भेटी जहाली. नाहीं तर जिवानिशीं जातां. तुम्ही वडील पुत्र राज्याधिकारी शहाणे योग्य सर्वज्ञ । दुराचरण कर्मास प्रवर्तलां. अतःपर कलह न करणें. महाराजांनीं एवढें श्रीवरदें मिळविलें. सारे पादशाहांस ठायीं ठेविलें. औरंगजेबास विचारीं ऽ. आतां आमचे कर्तृत्वाची सीमा जहाली. तुम्हीं व राजाराम दोघे पुत्र. नद्रेपासून कर्नाटकचें राज्य तुम्ही करणें. धाकटे राजाराम यांहीं नर्मदे- न या देशचें राज्य करावें. अशी वांटणी करून टाकिली. आम्हांमागें ांनीं एक विचारें राहून एकास एकानीं साह्य होऊन राज्य पराक्रमें संपा- संरक्षून यवनशत्रु पराभवातें पाववोन पुढें औरंगजेबाची तमा न दिवसेंदिवस कांवेशींत[४१] आणून दिल्ली तख्त घेणें. हा आमचा हेतु नेणें. तर तुम्ही विक्रमोपराक्रमी माझे पुत्र. ऐसें न करितां बंधु बंधु ां वर्तलिया औरंगजेब प्रबळ, तुम्ही लेंकरें, अनायक जहालियावर खासा ाजेब बावीस उमराव वजिरांसहित चढाई करील. तुम्हांस राज्यभ्रष्ट करून में बुडवील. हा त्याचा मनोभाव. महाराज चे दहशतीनें दिल्ली सोडून नेघत नाहीं. ऐसा प्रकार सर्व तुम्हांस राज्यभाराचा जाणविला. आमचे दिवसेंदिवस कीर्ति अभिवृद्धि पावे ऐशी करणें. ही महाराजांची आज्ञा आज्ञेप्रमाणें वर्तणूक केलिया स्वहित आहे. येणें जय पावाल. ह्या खचींत चित्तांत ठेवून राज्यभार चालवणें. राजारामाचा लळा मोह आ- न अधिकोत्तर चालवणें. लेंकरूं आहे यासि अंतराय दिधलिया, व महा- ी आज्ञा भंग केलिया, तुम्हांस कदाकाळीं जय होणार नाहीं हें प्रमाण. शय नाहीं. तुम्हांस सर्व गड कोट किल्ले व खजाना व लोक व राज्य हें गदींपत्रीं रुजू केलें याची तसनस न करणें. दिवसेंदिवस अधिकोत्तर जैशी श्रीरामदास स्वामींनीं महाराज सिंहासनाधीश्वर जहालियानंतर करून राज्यनीति स्वतां मजसाठीं शास्त्रसंमतें कृता त्रेता द्वापारीं जे जे ायण पुण्यश्लोक सोमसूर्यवंशींचे राजे वर्तत आले त्याप्रमाणें राज्याधिकार ळेयुगीं करणें, सिंहासन कलींत वर्ज श्रीनें केलें असतां श्रीभवानीशंकरवरदें हालें, सिंहासन म्हणजे श्रीईश्वराचें, अनाचरण वर्तलियानें वंशक्षयासि बहुत सावधपणें राहून दिगंतीं अपार कीर्तिपदास प्राप्त आहो पात्र गजे न [ व ] बुद्धिप्रदतेस व राज्यअचलतेस पुत्रपौत्रादि संरक्षणतेस

४१. कावेशी=आटोका, कबजा.

लिहून स्वहस्तकें पाठविली; समर्थआज्ञा मस्तकीं अभिवंदोन राजनीतीप्र
महाराजानीं समर्थांचे आज्ञेस अणुमात्र मक्षिकापक्षवत् अंतराई न करितां र
वर्तणूक आजपर्यंत केली; [ तैसी ] पुढां तुम्हीं व राजारामानीं करावो. सिं
सनारूढ व्हावें. राजनीतीस अंतराय केलिया राज्यभ्रष्टना प्राप्त होऊन ये
सिंहासन म्हणने सामान्य नव्हे. श्रीईश्वराचें आसन. जो ईश्वरी पुरुष अ
तोच आरूढेल. इतरास अलाभ वस्तु, प्राप्त होणेंच नाहीं. समर्थ राजनं
सर्वथा अंतर न करणें. यदर्थीं राजनीति येणेंप्रमाणें श्रीरामदासस्वामींनीं म
ज्ञांस सिंहासनाधीश्वर जहालियावर स्वात्मबोध आज्ञा निवेदन करून श्रीगुरु
सकृप होऊन पाठविली, ती महाराजांनीं मस्तकीं अभिवंदिली. राजनीति
रामदासस्वामींनीं श्रीमन्महाराज राजश्री शिवछत्रपति सिंहासनाधीश्वर सार्व
यांसि बुद्धिप्रदतेस कृपाळू होऊन स्वहस्तें पाठविली याप्रमाणें राजे लोकां
र्तणूक करून राज्यभार पृथ्वींत चालवावा. येणेंप्रमाणें:—

महाराजा नरशार्दुळा शिवनृपा प्रौढप्रतापा जनीं ।
राज्याची अभिवृद्धता च करणें संतुष्टवीं मेदिनी ॥
श्रीअंबावरदें जयासि वरुनी शत्रूंस निर्दाळिलें ।
धर्मीका गुणसागरा निशिदिनीं प्रत्यक्ष नीरिक्षिलें ॥ १ ॥
कौसल्याजननी तदूपरि दुजी श्रीरेणुका भूतळीं ।
कुंती पांडुप्रिया समर्थ प्रभुजी त्या सोमवंशाकुळीं ॥
तैसी हे तव मात जाण विलसे जीजावती सुंदरा ।
धन्यत्वाप्रति पावली त्रिभुवनीं पूजोनि श्रीईश्वरा ॥ २ ॥
भूभाराहरणाप्रती च चपलें मन्वाकृती पातला ।
वैकुंठाप्रति त्यागुनी च प्रभु हा अद्भूत वीराजला ॥
क्षत्रायान्तक होउनी शिवनृपा येशध्वजा लाविली ।
आहे श्रीतुळजा प्रसन्न तुजला सत्कीर्ति संपादिली ॥ ३ ॥
श्रीअंबावरदें रिपूसि वधुनी धर्मासि संरक्षिलें ।
दोर्दण्डें महि जिंकुनी च सकळां आचोज तें दाविलें ॥
होऊनी क्षितिइन्द्र जाण चपळें सिंहासना रूढला ।
राजा श्रीशिव तो हरी हि हृदयीं आमोघ संतुष्टला ॥ ४ ॥
भूपा धन्य तुझी अगाध गरिमा लोकत्रयीं वर्णिती ।
राजेन्द्रा नरकेसरी च प्रभुजी अन्यत्र नाहीं क्षितीं ॥
राया माण्डलिका परीच गणिलें गोमायु तीं पामरें ।
दास्यत्वा महि लावुनी च रिपुतें केलीं जगीं किंकरें ॥ ५ ॥

हस्तीं श्रीतुळजा फिरंग चमके वज्राहुनी तीव्रता।
चांचल्यें चमके अरीस हरिलें नाहीं च अन्यत्रता ॥
शत्रूंचीं शिरपंकजें अगणितें छेदोनि पाडीं रणीं।
पर्णप्राय गळीत [ त्यांस ] करुनी आणीं तयांतें क्षणीं ॥ ६ ॥
नष्टांचे रुधिरें च कुंकुम धराभाळीं सदा लेववीं।
दावूनी भिम हा प्रताप सकळां श्रीअंबिका तुष्टवीं ॥
शौर्यत्वाप्रति आगळा च अससी शाहूजीसुनो आगळा।
भूपा येवम दण्डुनी निजकरें अद्भूत कीजे बळा ॥ ७ ॥
निःक्षत्री करुनी धरा निजबळें दण्डीं च दुष्टांप्रती।
व्हावें भार्गव या कलींत प्रभुजी सत्कीर्तितें वर्णिती ॥
दावीं आक्रम आगळा निशिदिनीं सर्वां जनांतें सदा।
श्रीअंबावरदें जयासि वरणें अन्यत्र नाहीं कदा ॥ ८ ॥
चंडीयाग चि कोटि यज्ञ नृपती त्या वाजपीतें करीं।
पृथ्वी जिंकुनी अश्वमेध अगळा सत्कीर्ति दीगान्तरीं ॥
धर्मादी नहुषाप्रती च गरिमा आमोघता दाविजे।
ऐसा तूं जय पावशील प्रभुजी हा निश्चयो कल्पिजे ॥ ९ ॥
राया विक्रमशालिवाहनशकां आच्छादिजे एथुनी।
ऐसे हे नृपती विचित्र करणें तूं एक चिंतामणी ॥
व्हावें चक्रवती धरेवर प्रभो प्रौढप्रतापा सदा।
विष्णूची प्रतिमा समर्थ अससी अन्यत्र नाहीं कदा ॥ १० ॥
यावच्चन्द्ररवी सदैव नृपती कल्याण हो आगळें।
श्रीअंबावरदें जयासि वरणें प्रौढप्रतापा बळें ॥
जैसा बाळ विधू दिनेदिन असे वृद्धीस पैं पावला।
तैसा आक्रम रूढवीं च प्रभुजी आशीस माझी तुला ॥ ११ ॥
रदासयतिचे प्रभु घे अशीस। कल्याण हें तव सदा नृपती विशेष ॥
तापतवकें धरणी समर्था। कौतूक दाखवीं बळें अति जाण पार्था ॥१२॥
दि धर्म नृपती स्तवनासि लावीं। राम्रूदिलपास प्रभुजी गरिमा च दावीं ॥
षधा गुणनिधे अति तुष्टवावें। भोजादि विक्रमचुडामणि लाजवावें ॥१३॥
करूनि परता अणि त्या त्रिगाळा। तैसें च त्या दशरथा प्रभुजी नृपाळा ॥
जयासि हृदयीं अति तुष्टवावें। ऐसें चि कौतुक प्रभो जगिं दाखवावें ॥१४॥
ादि जाणा ऋतुपर्णराया। तूं योग्य व्हावें स्तवना कराया ॥
र्जी सुनो हें हृदयीं धरावें। कलीमाजि धर्माप्रति वीवरावें ॥ १५ ॥

घेघे आशीस राया अनुदिनिं यतिचे आन नाणीं नृपाळा ।
वैरी दण्डोनि साचे निज हित करणें पृथ्विच्या तूं नृपाळा ॥
माझा हा हेतु जाणा पुरवि च चपळे शाहूजीसूनो सुकाळीं ।
वेगीं शस्त्रा धरूनी गुणनिधि प्रभुनें दंडिला जेंवि वाळी ॥ १६ ॥
तैसें या अवरंगजेब अरितें दण्डीं सकोपें झणीं ।
वीलंबा न लवीं प्रतापतवकें कौतूक दावीं रणीं ॥
शीवाजीसरजा समर्थ अससी अन्यत्र नाहीं कदा ।
पृथ्वी जिंकुनि सार्वभौम पद हें संपादिजे एकदां ॥ १७ ॥
नित्यानित्य सनेम जाण वचना पाळीत जावें नृपा ।
तेणें हा जय पावशील अगळा होईल श्रीची कृपा ॥
जैसे धर्मदिलीप [ पूर्विं ] सकळी न्यायें प्रभू वर्तले ।
तैसें राज्य करूनि दाखविं जना ऐसें च आपेक्षिलें ॥ १८ ॥
जैसा विक्रम वर्तला अनुदिनीं तो भोज या हो क्षितीं ।
तैसा अर्थ करूनियां च त्वरवा संरक्षिजे रे निती ॥
परदुःखाप्रति जाण होऊनि त्वरें सांभाळिजे नीकटीं ।
आनायास हि नाथ तूं चि प्रभुजी पाळीत जा संकटीं ॥ १९ ॥
आर्यत्वाप्रति आगळा च अससी शाहजीसुनो या क्षिती ।
शौर्यत्वें रिपु दंण्डिले च निकरें सत्कीर्ति वाखाणिती ॥
शीवाजी सरजा विचित्र करणी तूं दाखवीं या जना ।
नाहीं आन विलोकितां च प्रभुजी सिद्धीस ने कामना ॥ २० ॥
शीवाजी सरजा समर्थ अससी भक्तोत्तमा भूतळीं ।
शौर्यत्वें अति आगळा विलससी या भोंसल्यांचे कुळीं ॥
अफूजल्ला वधुनी [ बहूत ] निकरें येशास संपादिलें ।
बीजापूरपतीस कौतुक नृपा अत्यंत तां दाविलें ॥ २१ ॥
शास्ताखान [ हि ] दण्डुनी करबळें सत्कीर्ति संपादिली ।
तानाशा सुलतान हीन करुनी त्वां शूरता दाविली ॥
फिर्गी शामल डिंगमार अग्वी त्या नायराला झणीं ।
इंग्रेजादिक पामरें च समरीं केलीं प्रतापें सुणीं ॥ २२ ॥
बल्खादी मरते भदावर त्वरें लाहूर तूं जिंकिलें ।
दिल्लीचा भ्रम फेडुनीं च निकरें कीर्तीस विस्तारिलें ॥
हुमणाबाद चितोड जाण चमली भीशी च बंगालिया ।
राठोडादिक द्वारका निजबळें शत्रूस नेशी लया ॥ २३ ॥

आयोध्यादिक मारवाड कलपी काश्मीर घेशी बळें ।
अजमेरीं जयपूर जाण नृपती खाणून शत्रूमुळें ॥
बिन्दू आणिक बेंगरूळनगराची जोड पैं लाधसी ।
हुम्माऊ मुलतान मानसपुरा वेगें प्रभो जिंकिसी ॥ २४ ॥
हेमाद्री आणि बद्रिकाश्रम रुमाशामादिकांतें क्षणीं ।
अट्का पट्टण पाबळादि चपळें जाणा प्रभो ये क्षणीं ॥
दण्डीं बावन पाच्छहांसि निकरें आशीस माझा तुला ।
श्रीअंबा वरदे जयासि वरणें हा निश्चयो कल्पिला ॥ २५ ॥
फरांसी रिपुपामरासि नृपती वेगें चि न्यावें लया ।
जिंकी सर्व हि बंदरें च प्रभुजी संपादिजे या जया ॥
सत्ता येक करूनि जाण अवघी राज्याधिकारा किजे ।
धर्मातें अति वाढवीं च नितिनें ब्राह्मण्य संरक्षिजे ॥ २६ ॥
वल्यांकीत धरा जिणोनि चपळें धर्मध्वजा लाविजे ।
शाहूजीचा तनयो समर्थ अवनी कीर्ती र विस्तारिजे ॥
पुर्वींच्या नृपतींहुनी च अगळी लीळा ज गीं दाखवीं ।
धर्मा रक्षणता करूनि प्रभूजी श्रीसांब हीं आठवीं ॥ २७ ॥
जिंकावें करनाटकास नृपती प्रौढ प्रतापें क्षणीं ।
ळेगार हि पामरांसि निकरें तूं एक चिंतामणी ॥
अंबावरदें अमोघ चि जया संपादिजे सर्वदा ।
ै श्रीविधिवाक्य जाण चि असे अन्यत्र नाहीं कदां ॥ २८ ॥
पट्टण बेदनूर निकरें घेऊनि लावीं ध्वजा ।
धें सावनुरा विलम्ब न लवीं पाळीं सनेमें प्रजा ।
ापूर कितूर जाण चि बळें पैं कोपळाला घडीं ।
शिर्टी डंबळ या स्थळासि चपळें कीजे प्रभू तांतडी ॥ २९ ॥
घेईं गुत्तिसि चित्रदुर्ग प्रभु रे घेईं क्षणीं एकदां ।
बाळापूर कनोर जाण पटणा अन्यत्र नाहीं कदा ॥
पिल्गोंडा गति हीं स्थळें शिवनृपा संपादिजे ये क्षणीं ।
दण्डीजे रिपुदुर्जनासि निकरें प्रत्यक्षता पैं रणीं ॥ ३० ॥
जागा उत्तम कुम्भकोण नृपती पुण्यस्थळें रक्षिजे ।
कडपें अर्काट या प्रती च प्रभुजी कीर्तीस संपादिजे ॥
चंजी दुर्घट आवध्यांत विलसे त्याणें च चंजावरा ।
कीजे आक्रम आगळा गुणनिधे लावीं जयाचा तुरा ॥ ३१ ॥

मच्छलीबंदर नीकरें च नृपती शिंगालद्वीपान्तरा ।
गोंतें घेउनियां जयासि वरणें श्रीशीवराजेश्वरा ॥
शाहूजीचा सुत [ तूं ] समर्थ [ बरवें ] शूरत्व कामा अती ।
कीर्तीची गरिमा भरोनि उरवीं हे क्षत्रियाची रिती ॥ ३२ ॥
ध्यावी रें गुजराथ जाण चि बळें पैं सूरतेतें क्षणीं ।
उज्जनीपासुनि माळवा हि अवघा भूपा बळें ये क्षणीं ॥
बालेघाट ही माहुरादिक स्थळें संरक्षणा रे किजे ।
तैसा बेदर जिंकुनी च निकरें सत्कीर्ति विस्तारिजे ॥ ३३ ॥
राया विंशति सप्त जाण बरवीं आलूर पैं पाळि या ।
दोर्दण्डें रिपु जिंकुनी च निकरें संपादिजे या जया ॥
त्या रे बेदरपामरासि सहसा ठेवूं नको भूवरी ।
ममआज्ञाप्रतिपालनासि करणें हा अर्थ चित्तीं धरीं ॥ ३४ ॥
घेईं जुन्नर खानदेश नृपती गोदातिरा सत्वरीं ।
पुण्यें-देश सुपे च जाण प्रभुजी हे हाव चित्तीं धरीं ॥
माणदेशादिकडे [ त्वरीत ] वळतां नीरीक्षणें तें किजे ।
तैसा बेदर जिंकुनी च निकरें सत्कीर्ति विस्तारिजे ॥ ३५ ॥
घेईं बाघन पैं गिरे तदुपरी त्या वीर गाठ्या क्षणीं ।
दण्डीं बेदर पातल्या गुणनिधे प्रत्यक्ष [ शत्रू ] रणीं ॥
जाणा देसक आवघे हि नमती निर्नाम कीजे तयां ।
विश्वासा न धरीं कदापि प्रभुजी मानीत जावें भया ॥ ३६ ।
हेमाद्री अणि मारवाड निकरें त्या बद्रिका हो श्रमा ।
सत्ता एक करोनि राज्य विवरीं मानूं नकोरे तमा ॥
तैसे क्षेत्र समर्थ काशिपुर तें संरक्षणें भूपती ।
पुण्या पार नसे अपार गरिमा हे धार्मिकाची निती ॥ ३७ ॥
घेईं फलटण जाण तें प्रभुवरा पैं बंगल्याला क्षणीं ।
वाईपासुनि खालसा च करणें तात्काळता ये क्षणीं ॥
आहे उत्तमता कराड नृपती तैसें च कोल्हापुरा ।
पुण्यक्षेत्र पवित्रता गुणनिधे पाळीं च राजेश्वरा ॥ ३८ ॥
बेळगांवादिक हीं स्थळें चि नृपती ध्यावीं क्षणीं नीकरें ।
सर्वज्ञा गुणसागरा हव धरीं लावीं जयाचे तुरे ॥
मिर्जेपासुनि देश जाण अवघे सत्ताबळें जिंकिजे ।
हुकेरी अणि रायबाग प्रभुजी दुष्टांसि निर्दाळिजे ॥ ३९ ॥

राया कोंकण सोडवीं च अवघें तेथें अपूर्वें स्थळें ।
कुडाळादिक बारदेश प्रभुजी सक्रोधतेने बळें ॥
तैसें ते चिपळूण राजपुरिला घेईं नृपा सत्वरीं ।
कुल्लाबा जयदुर्ग खोकरिप्रती पैं जंजिरा खोकरी ॥ ४० ॥
घे रे अंजनवेलि ते चि नृपती युक्तीबळें एकदां ।
सर्देपासुनि जंजिरे अणि गडा अन्यत्र नाणीं कदा ॥
मुंबैचा प्रभु यत्न हीं करुनियां हातातळीं घालिजे ।
दुष्टांतें समरीं च जाण चपळें कौतूक हें दाविजे ॥ ४१ ॥
बारा कुंब्बल माहुळें च नृपती तात्काळ तीं घेइजे ।
विश्वासू बरवे च लोक अति ते त्वन्नीकटीं पाळिजे ॥
जागे उत्तम पाहुनी च प्रभुजी संरक्षणातें करीं ।
किल्ले आणिक जंजिरे च वसवीं हे वासना रे धरीं ॥ ४२ ॥
माहुळे बरवे बहू नृपति ते सन्निद्ध ठेवीं सदां ।
दूजे दुर्जय प्रौढता च दिसती अन्यत्र नाहीं कदां ॥
त्यांचे तूं अनुमोदनें चि प्रभुजी घ्यावीं स्थळें आगळीं ।
जीवाचा न तयां तमा गुणनिधी ऐसे च जाणा बळी ॥ ४३ ॥
जैसे ते कृषिरक्षणासि कुळंबी माळे प्रभू घालिती ।
तैसे ते गड बांधणें चि चपळें संरक्षणातें क्षितीं ॥
होवे [illegible] अति सावधान हृदयीं राज्यासि वृद्धी किजे ।
पाय [illegible] क्रम हा चि होय नितिचा शोधूनि वीलोकिजे ॥ ४४ ॥
गुह्याचें निज गुह्य एक तुजला हें सांगतों भूपती ।
आपणाहूनि वरिष्ठ सेवक कदां ठेवूं नको संप्रता ॥
कावेसींत कदापि जाण नृपती येऊं नको सर्वदा ।
येणें घात असे कृपा गुणनिधी प्रौढान्तरीं रे वृथा ॥ ४५ ॥
राज्याचे नितिचा समर्थ तुजला हा बोध केला असे ।
ऐकें रे गुणसागरा नरपते अन्यत्रता पैं नसे ॥
सेना नीकटिं ठेविजे प्रभु अती येणें तुला मान्यता ।
शत्रूचें भय हें कदापि न घडे जाणा जगीं प्रौढता ॥ ४६ ॥
आविन्धाप्रति नीकरें च प्रभुजी शीक्षा किजे रे बरी ।
वेगें प्रौढ प्रताप दाखवि जना आभष्टि चित्तीं धरीं ॥
साधूनी रिपुचीं स्थळें निजबळें हे योग्यता रे असे ।
शत्रूचें भय वागवीं च हृदयीं अन्यत्र ते पैं नसे ॥ ४७ ॥

पूर्वींचे नृपती [ असे ] तदुपरी राज्याधिकारा किजे ।
ऐसें शासन चालवीं च नृपती सत्कीर्ति संपादिजे ॥
धर्माचा न लपो करीं च प्रभुजी वृद्धीस न्यावें सदा ।
नित्यानित्य हि आधिकोत्तर गती आपेक्षिजे संपदा ॥ ४८ ॥
पापाचा न करीं च संग्रह नृपा घेणें जयातें असें ।
वेदाज्ञावतु वर्तणें चि प्रभुजी हे योग्यता वीलसे ॥
सारासारविचार जाण करुनी प्रौढ प्रतापा वरीं ।
धैर्यत्वा धरुनी अमोघ चि सदा कारुण्यता वीवरीं ॥ ४९ ॥
येशस्वी विजयी समर्थ नृपती तूं पौर्णिमेचा विधू ।
आहे श्रीवरदा हि नित्य विदुषी श्रीशंकराची वधू ॥
सौख्यातें अति भोगणें च प्रभुजी यावद्रवीचंद्रमा ।
सर्वज्ञा कुलतीलका गुणनिधे प्रत्यक्ष कल्पद्रुमा ॥ ५० ॥
ऐश्वर्यें तुज सर्व जाण नृपती पैं लाधलीं एकदा ।
कीर्तीची गरिमा भरोनि उरवीं अन्यत्र नाणीं कदा ॥
श्रीसांबें तुज छत्रदासि दिधलें शाहूजीसुनो आगळें ।
कृतकर्मादि करुनि दाखवीं प्रभो धार्मीकतेचे बळें ॥ ५१ ॥
राया अष्ट दिशा जिणोनि अवघ्या लावीं जयाचा तुरा ।
ऐशी आशिस तूजला मम असे हो वन्द्य तूं श्रीवरा ॥
भक्तीभाव धरुनि पत्र लिहिलें पूजे प्रभो धाडि[illegible] ।
वस्त्रें मुक्त मणी च द्रव्य नृपती श्रीस्वामितें अ[illegible] ॥ ५२ ॥
पत्रीं जाणविलें नृपा मजप्रती सिंहासनीं रूढलों ।
कर्णीं ऐकुनिया प्रभो हरर्षें मी संतोष पैं पावलों ॥
राया चक्रवती समर्थ अगळा धार्मीक सिंधू दुजा ।
पूर्वीं तूं नवधा सुभक्ति धरुनी केली हराची पुजा ॥ ५३ ॥
त्याचें हें फळ पावलास नृपती आगाध तूझी लिळा ।
धर्मा रक्षणता करूनि प्रभु रे संरक्षणें भूतळा ॥
क्षीतीन्द्रा शिव भोंसल्या तुज प्रती हें मागणें हो असे ।
वेदाज्ञावतु राज्यराम करणें सत्कीर्ति येणें वसे ॥ ५४ ॥
पून्हा तूं नृपती नवीन दुसऱ्या सृष्टीप्रती निर्मिलें ।
गागाभट्ट अणूनियां च निकटीं क्षत्रत्व संपादिलें ॥
सांगोपांगविधी सुकर्म अवघे वृद्धीस नेवोनियां ।
केला यज्ञ समर्थ जाण नृपती आपेक्षिलें या जया ॥ ५५ ॥

वेदाज्ञावतु निश्चयासि अणुनी साहित्य संपादना ।
गागाभट्ट समर्थ जाण असतां केली प्रभो स्थापना ॥
दूजा व्यास हि वाल्मिकीच ऋषि हा सज्ञानता आगळी ।
काशीवास करोनि साधन अती या ब्राह्मणाचे कुळीं ॥ ५६ ॥
विद्यासूर्य समर्थ यास भुतळीं नाहीं कदापी दुजा ।
गागाभट्ट कृपानिधीस स्मरणें प्रत्यक्षता श्रीअजा ॥
सामर्थ्ये सदया करोनि नृपती क्षत्रत्व संपादिलें ।
केलें चक्रवती निरूपम प्रभो कीर्तीस संपादिलें ॥ ५७ ॥
क्षीर्तीन्द्रा शिव भोंसल्या गुणनिधे धन्यत्वता लाधली ।
पुण्या पार नसे च जाण प्रभु रे सत्कीर्ति संपादिली ॥
जाणा भूतळिं या नवीन शक हा वीरान्वतो सर्वदा ।
श्रीअंबावरदें रिपूंसि वधुनी आपेक्षिली संपदा ॥ ५८ ॥
राया एक विचार सार करणें सदृढ नेमें सदा ।
आहे राजनिती म॰ परि प्रभो सांभाळिजे म्हत्पदा ॥
धैर्यत्वा धरुनी च सत्व अपुलें संरक्षणातें करीं ।
सुत्रामाअसनावरी रुढुनियां धार्मीकता वीवरीं ॥ ५९ ॥
तूझें सूकृत आगळें म्हणुनियां सिंहासनीं रूढला ।
होवोनी जनईश्वरू नृपति तूं कीर्तिध्वजू लाविला ॥
शाहूजीच्या तनयो समर्थ गरिमा लोकत्रयीं फांकली ।
धन्यत्वा अति पावलास प्रभुजी लीळा जगीं द॰॰ली ॥ ६० ॥
मन्त्री लेखक बुद्धिमन्त अगळे धार्मीक ज्यां वासना ।
तैसे नित्य समागमें च बसवो अन्यत्र नाणीं मना ॥
कपटी पामर पातकी अकुळिंचे त्यागूनि देईं क्षणीं ।
राज्याचे अभिवृद्धितें च करणें ते रक्षिजे जे गुणी ॥ ६१ ॥
दीवायामिनी सावधान नृपती आखंडता आसणें ।
आमित्राप्रति लक्षुनीच प्रभुजी आणीं तयातें उणें ॥
राया पूर्ण हि चाळकांपरि सदा पैं चाळणा रे करीं ।
शाहूणं धूर्त चतूर हेर बरवे ते धाड देशांतरीं ॥ ६२ ॥
आमित्रांप्राति रोखुना च असणें बुद्धीबळें सर्वदा ।
विश्वासा न धरीं कदापि प्रभुजी अन्यत्र नाणीं कदा ॥
ठेवूनी च लया अगण्य प्रभुजी राज्यास सरक्षिजे ।
जातोवत विरांस प्रेम करुनी अध्यक्षता रे दिजे ॥ ६३ ॥

जाणा कर्बुर येवनासि नृपती ठायीं सदा ठेविजे ।
नित्यानित्य हि देश घेउनि बळें राज्यासि संरक्षिजे ॥
हे बुद्धी करूनी सकोट गड पैं पाहे सदा भूपती ।
बांके पर्वत देखुनी हि चपळें निर्मी स्थळें नीगुती ॥ ६४ ॥
जलदुर्गा अति दुर्घटा चि प्रभुजी पैं नेटक्यां निर्मिजे ।
दिवसें दिव्वस भूपती सबळता राज्याभिवृद्धी किजे ॥
सेनानायक धाडुनीच निकरें मर्दी त्वरें येवना ।
तैसे ते नृप मांडलीक अवघे जिंकोनि ध्यावें धना ॥ ६५ ॥
अपणांहूनि वरिष्ठता च असल्या सख्यत्व त्यां लाविजे ।
युक्तीचें बळ लावुनी च चपळें निर्नाम त्यांतें किजे ॥
गुह्यागुह्य कदापि जाण इतरां सांगूं नको भूपती ।
प्राणाचा जरि मित्रभाव असल्या हे राजचिन्हाकृती ॥ ६६ ॥
दोर्दंडें भिम हा प्रताप करिं त्या कर्कोटकां तुल्यता ।
साधावें प्रभु राज्य जाण सबळें येणें असे योग्यता ॥
नाना यत्न करोनियां रिपुजना पायातळीं घालिजे ।
येशाचीं भुवनें भरोनि उरवीं सत्कीर्ति संपादिजे ॥ ६७ ॥
जिंकोनी अवरंगजेब नृपती घेई च नागाल्या ।
ऐसा हा अभिमान पूर्ण धरणें संपादिजे या जया ॥
फेडीं भार धरेवरील अवघा धर्मासि संरक्षिजे ।
श्रीसूरां नराकिन्नरांसि भुधरां आचोजता दाविजे ॥ ६८ ॥
आचार्या गुरुआश्रितांसि प्रभु रे शास्त्रार्थ वीचारिजे ।
॥. यानित्य विवर्णता च करुनी सप्रीयता कल्पिजे ॥
निगमाज्ञा अभिवंदुनी च मुकुटीं वर्ते सदा भूपती ।
अन्यायावतु दंडिजे गुणनिधी ही धार्मिकाची निती ॥ ६९ ॥
श्रेष्ठापासुन अंतराय घडल्या कीजे क्षमा आगळी ।
धर्मन्यायविवर्णता च करणें सत्कीर्ति हे भूतळीं ॥
अष्टी जाण प्रधान बुद्धिउदधी सन्मानिजे सर्वदां ।
एकामेक हि ऐक्यरूप करणें वीभक्ति नाहीं कदां ॥ ७० ॥
मन्त्री यांत कदापि जाण न पडे भिन्नत्वता अन्तरीं ।
ऐशा त्या दरजांत रक्षण किजे हा अर्थ चित्तीं धरीं ॥
भूपा सावधता असोनि बरवी आलस्य नाणीं मना ।
भ्रांती त्यागुनियां जनीत विषया हे कल्पिजे साधना ॥ ७१ ॥

ठेवीं लेखक चित्रगुप्त दुसरे गुह्यार्थ पैं लेखना ।
विश्वासू चतुरज्ञ सावध अती अन्यत्र नाणीं मना ॥
नाणा हिंसक पातकी नृपसभे आलक्षिजे सर्वदां ।
त्यांचा संग करूं नये गुणनिधे हा निश्चयो एकदां ॥ ७२ ॥
तैसे पाकसुनिष्पतीस प्रभुजी सात्वीक हो ठेविजे ।
चातुर्या अति आगळे गुणनिधे त्यांच्या च हातीं किजे ॥
तेव्हां भोजन भूपती च करणें हा धर्म तूं चालवीं ।
ऐशी राजनिती विवीध परिची कीजे सदां पैरवी ॥ ७३ ॥
भांडाराप्रतिं रक्षणासि बरवे ठेवीं कुळींचे नृपा ।
त्यांचे गूण विलोकुनी निशिदिनीं आमोघ कीजे कृपा ॥
नाणा कूटिल तस्करासि प्रभुजी आलक्षिजे मानसीं ।
वेदाज्ञा प्रभु मानुनी च हृदयीं सज्ञान लावीं कसीं ॥ ७४ ॥
धैर्यत्वा धरुनी च शौर्य मिरवीं संरक्षुनीयां जिवां ।
सक्रोधें रिपु दंडिजे निजबळें संपादिजे वैभवा ॥
गुह्याचें [ जरि ] बोलणें च प्रभुजी तें युक्तिमार्गें किजे ।
ध्यानीं आणुनियां सनेम वचनीं गुह्यार्थ पैं ठेविजे ॥ ७५ ॥
कार्याकारण कल्पुनी निजहिता सामोपचारां करीं ।
दांभीकार्य हिं भाव जाणुनि बरा वीचित्रता वीवरीं ॥
मंत्री साधक आसल्यास निकटीं गुह्यार्थ सांगें तयां ।
ज्याची अल्पमती असेल प्रभुजी मानीत जा या भया ॥ ७६ ॥
राहूनी अति सावधान नृपती संरक्षणें आपणा ।
नित्यानित्य हिं अंतरीं च करणें अद्भूत पैं चाळणा ॥
ध्यानीं श्रीकुळदेवतेस स्मरणें हे धार्मिकाची निती ।
येणें तूं जय पावशील नृपती अन्यत्र नाहीं गती ॥ ७७॥
शाहूजीचा सुत तूं पवित्र नृपती धर्माधिपातुल्यता।
भूभारा हरणासि येउन प्रभो केली अती प्रौढता ॥
धन्यत्वें अति आगळा चि अससी नाणा दुजा केसरी ।
विष्णूची प्रतिमा च मानवरूपें सत्कीर्ति दीगांतरीं ॥ ७८ ॥
त्याची सार्थकता करूनि सकळां संतुष्टवावें सदा ।
निजधर्माप्रति अंतराय न करीं अन्यत्र नाणीं कदा ॥
षट्शास्त्रें प्रभुजी सनेम वचनें संरक्षिजे अंतरीं ।
येशाचीं सदनें भरूनि उरवीं मानाभिमाना धरीं ॥ ७९ ॥

ऐकें राजनिती समर्थवचनें दांभीकता त्यागिजे ।
गर्वाचा अभिमान अंतरीं कदापी अल्प ही नाणिजे ॥
ध्यानीं श्रीजगदंबिके स्मरुनियां पूजार्चनातें करीं ।
यजनादीक हि याजनें निशिदिनीं अत्यादरें वीवरीं ॥ ८० ॥
राया शाबरिमांत्रिकास निकटीं ठेवूं नको दुर्मदा ।
येणें घात अमूप [ जाण चि ] असे पैं पावसी आपदा ॥
तैसे जारणमारणादि कुमती कौटिल्य कामा न ये ।
वंशाचा क्षय निश्चये च प्रभुजी वर्ते सदा या भयें ॥ ८१ ॥
राया स्तंभनमोहनादि गुटिका हें हीत नव्हे कदा ।
नीचांचा न करीं च संग प्रभुजी आयोग्य येणें पदा ॥
संसर्गा न करीं च जाण नृपती केल्या अती आपदा ।
ठेवीं वंशज नीकटीं च विदुषां हे योग्यताहे सदा ॥ ८२ ॥
इत्यादी व्यसनां मधें मन कदां गोंवूं नको भूपती ।
भृंगा मद्य अफू कदापि न शिवें जे अज्ञता कूमती ॥
गांभीर्यें अति धैर्यता च धरुनी बोलैं सगर्भें सदां ।
राया हांसत हंसतां च न वदें सर्वज्ञता रे कदां ॥ ८३ ॥
वारंवार कदापि जाण हृदया पाहों नको भूपती ।
हर्षाचे समयीं प्रमीत वदणें चातुर्यता हे रिती ॥
बोलावीं वचनें सखोल प्रभुजी तीं नेटकीं युक्तिनें ।
सर्वांचीं सुदया करूनि अति हे संरक्षिजे तीं मनें ॥ ८३ ॥
डोंबारी अणि भोरपी हि इतरां नृत्यांगना वेश्मनीं ।
भूपा नाणिं तयां कदापि नयने दीवा च पैं यामिनी ॥
शास्त्रज्ञादिक पंडितां सुगणकां सन्मानिजे सर्वदा ।
अभ्युत्थान हि अर्पणासि करणें अन्यत्र नाणीं कदा ॥ ८५ ॥
भूपा मिथ्य क्रिया हि सेवकजना देऊं नको सर्वथा ।
तेणें संचित [ पुण्य ] जाण प्रभुजी होऊनि जाई वृथा ॥
बोलावीं वचमें कृपा गुणनिधी तीं सत्य कीजे जनीं ।
क्षणएक क्षणभंगुरत्व न वदें दीवा सदा यामिनी ॥ ८६ ॥
वेश्यासंग हि दासिचा प्रभु कदा दृष्टीपुढें नाणिजे ।
परद्वारा करितां जयो चि न घडे हा अर्थ वीलोकिजे ॥
जैसा विक्रम भोज जाण विवरें तैशा गती वर्ततां ।
तेणें कीर्ति सदैवता च प्रभु रे आहे सदां योग्यता ॥ ८७ ॥

राया मित्र कदापि जाण न वदे आयोग्यता तूजला ।
येणें राज्य लयासि जाइल प्रभो हा निश्चयो वर्तला ॥
गेला बोलुनि हें विधीच विदुषां आसत्य नाहीं कदा ।
कीर्तीची गरिमां भरोनि उरवीं संपादिजे म्हत्पदा ॥ ८८ ॥
टेहळ्या तस्कर नीकटीं हित नसे राज्यासि आयोग्यता ।
धार्मीकाप्रति सांगणें च नलगे संपादिजे आर्यता ॥
भूभारा हरुनी प्रजांप्रति सदां संतोषवृत्ती किजे ।
येणें हा जय पावशील नृपती सत्कीर्ति विस्तारिजे ॥ ८९ ॥
कीजे स्नान पवित्रता च अगळी संध्यादि आनुक्रमें ।
जपजाप्या गुरुशीं भजून पुढती सत्कर्मता उत्तमें ॥
सांगोपांग सनेम धर्म विषयीं अत्यादरें पैं करीं ।
गोदानादिक हेम अर्पण करीं हे नीतिरीति धरीं ॥ ९० ॥
राहूकेतु हि पर्वणीस नृपती आमोघ दानें किजे ।
ग्रामादीक [ हि ] जाण घोष भुमिका वाजींगजां अर्पिजे ॥
धान्यादी वसनें धनासि अगळें दे तुष्टवीं ब्राह्मणां ।
तेणें तूं जय पावशील प्रभुजी मेरू किजे ठेंगणा ॥ ९१ ॥
पाहूनी अतिशिष्ट ब्राह्मण तयां अग्राहरें अर्पिजे ।
यावच्चंद्ररवी सनेम वचनें तीं अक्षयी रे किजे ॥
मुद्रांकीत हिं राजपत्र करुनी वृद्धीस न्यावें सदा ।
ऐशी राजनिती प्रमूख मिरवे अन्यत्र नाणीं कदा ॥ ९२ ॥
तूझी कीर्ति विलोकुनी च प्रभुजी येतील जे दर्शना ।
त्यांतें आड हि काष्टका न करणें हे कल्पिजे वासना ॥
ज्ञाते पंडित ही गुणीजन तयां सन्मानिजे आदरें ।
वस्त्रादी धन अर्पुनी हि प्रभुजी संतुष्टवीं निर्भरें ॥ ९३ ॥
गूणागूण विलोकुनी च प्रभुजी नीवर्णता हो करीं ।
ज्ञाते पंडित शिष्ट जाण असतां हें लक्षिजे अंतरीं ॥
येणें हा जय पावशील प्रभुजी सत्यत्व मानीं सदा ।
धर्मन्याय-विचारणा च करणें तें अन्य नाणीं कदा ॥ ९४ ॥
सुत्रामाअसनावरी रुढुनियां धार्मीकता वीवरीं ।
आधर्मीरत झालिया गुणनिधे दुष्कीर्ति दीगान्तरीं ॥
व्हावें सावध रे नृपा अनुदिनी आज्ञा असे तूजला ।
चित्रीं चित्रगती विलोकुनि प्रभो तो धर्मता पावला ॥ ९५ ॥

कर्माकर्मगती निरूपम असे बा भोजनाचे परी ।
भ्रमभासादिक भावितां पुनरपी माया मदार्ते वरी ॥
क्रियमाणादिक संचितास तिसरें प्रारब्धता जाणिजे ।
चित्रीं चित्रगती प्रमोद अगळा त्यागोनियां ते दिजे ॥ ९६ ॥
कर्मी आसुनियां अलिप्त म्हणती ते हो पशू धार्मिका ।
जाते ही गति वीगती च नकळे तो केवि जाणा निका ॥
ब्रह्मीं ब्रह्मरूपें सगूण सदना वांछा धरीं भूपती ।
अभार्ते भिम कल्पना च करुणें अङ्गीकतेची रिती ॥ ९७ ॥
ज्ञाता तूं शिवभूपती म्हणुनियां संतुष्ट झालों मना ।
श्रीरामीं निजभक्तिभाव धरुनी कीजे अती साधना ॥
सप्रेमें रसना ललीत करणें आलोचना त्यागिजे ।
भावें भाविकता स्मरोनि हृदयीं सप्रेमता पाविजे ॥ ९८ ॥
कल्पा मायिकता त्यजोनि स्मरणें दीनेश वृद्धी किजे ।
प्रापंचीं परमार्थसाधन असे हें अंतरीं भाविजे ॥
जैसा त्या किरिटीस बोध समरीं केला अती नीगुती ।
ब्रह्माकारविराटरूप धरुनी पैं दाखवीली गती ॥ ९९ ॥
तैसा हा तुज भूपती निजमुखें संबोध केला अती ।
पर्यायें परिहारणासि विचरें हे धार्मिकाची निती ॥
धन्यत्वें अति आगळा चि प्रभु तूं अन्यत्रता नातुळे ।
चिन्हांकीत हि चिन्मयासि स्मरणें भावीक भक्तीबळें ॥ १०० ॥
आत्मा स्थीर नसेचि जाण प्रभुजी मायीक मिथ्या असे ।
प्रापंचीं परमार्थसाधन किजे हे योग्यता वीलसे ॥
अवतारादिक अन्तरीं निजहिता ध्यानस्त होऊनियां ।
अन्तीं हो मति स्वागतीं च वरिली पावोनि गेले लया ॥ १०१ ॥
भ्रान्तीचे प्रसरें च * * * * अप्रत्यक्ष वीलोकिलें ।
* * * * * *

ज्ञाता सांच कदापि जाण न मनीं या वैष्णवीं कौतुका ।
सारासार विचारणा च घडवी तो एक पाहो निका ॥ १०२ ॥
आर्या तूं शिवभूपती गुणनिधे हें सर्व ही जाणसी ।
ब्रह्माकार निरूपमा चि प्रभुजी अत्यादरें पावसी ॥
शान्ती चित्त समाधिता च वसवीं अन्यत्र नाणीं मना ।
सद्गुणाप्रति लाधसी च चपळें हे कल्पिजे भावना ॥ १०३ ॥

केला बोध वृतें स्वरूपरचना आगम्यता दाविली ।
आम्हीं स्वंत्व सुखासि योग्य चि अशी विश्रान्ति आपेक्षिली ॥
नीती ही विचरें अशाच गतिनें उन्मादता त्यागुनी ।
झाली नीगममौन्यता च प्रभुजी दीवा सदा यामिनी ॥ १०४ ॥
शिवभूपा हृदयीं सनेम वचनें संरक्षणें सर्वदा ।
प्रापंचीं परमार्थ आर्य चि प्रभो अन्यत्र नाहीं कदा ॥
कीजे राज्य यथाविधी च विदुषा सारांश जाणूनियां ।
येणें तूं अति पावशील अवनी आपेक्षिसी त्या नया ॥ १०५ ॥
जाणा विक्रम नैषधादि जनकें कीर्तीस संपादिलें ।
धर्मे कौतुक श्रीसुरांस सकळां अत्यन्त तें दाविलें ॥
पाहों त्या रघुदीलिपें त्रिभुवनीं शौर्यत्वता दाविली ।
आर्यत्वें स्वहितास ही घडवुनी धार्मीकता राखली ॥ १०६ ॥
तैसा अर्थ करूनियां शिवनृपा धर्मासि संरक्षणें ।
शूरत्वा अति आगळा च असती नाहीं कदापी उणें ॥
वेदाज्ञा मुकुटीं च वंदुनि प्रभो लावीं जयाचा तुरा ।
प्रापंचीं परमार्थ साधन किजे हे मान्यता श्रीवरा ॥ १०७ ॥
मन्माया तिमिराप जाण हरणा बांभोजनीची गती ।
लीलानाटक भावितां गुणनिधे धैर्यत्वता हो अती ॥
रीती कल्पुनि कौतुकासि वरणें अन्यत्र नाणीं मना ।
ब्रह्माकारनिरूपमेस प्रभुजी सज्ञान हें साधना ॥ १०८ ॥
त्या सावध सावधान हृदयीं व्हावें समर्था सदा ।
राज्याची अभिवृद्धिता व करणें युक्तीबळें एकदा ॥
जेंवी विक्रम शालिवान शक हा तैसा किजे भूतळीं ।
धार्मीका अति आगळा चि असशी या भोंसल्यांचे कुळीं ॥ १०९ ॥
ऐके राजनिती-कृपाहिमकरा शाहूजीसुनो भूपती ।
मिथ्या अल्प हि नाणिजे च हृदयीं हे ज्ञातियांची रिती ॥
पूर्वीचे नृपतीवतू च प्रभुजी राज्याधिकारा किजे ।
भावी भाविकता स्मरोनि हृदयीं ऐश्वर्य संपादिजे ॥ ११० ॥
कीजे स्वप्रियपालना अनुदिनीं त्या हो प्रजांचे प्रिती ।
घ्यावें आशिस भूपती हित असे शास्त्रार्थ आहे निती ॥
नेमाहून अधीक द्रव्य सहसा घेऊं नको पैं कदां ।
त्यांतें पीडणता कदापि न किजे संतुष्टवावें सदां ॥ १११ ॥

आल्या दाद हि घेउनी च निकटीं क्लेशा अती पैं प्रजा ।
तेव्हां सावध होउनी च स्मरणें जाणा प्रभू श्रीअजा ॥
आधर्माभित होउनी च विचरे हे मान्य सर्वांप्रती ।
त्यांचें संकट हारुनी गुणनिधे सत्कीर्तितें वर्णिती ॥ ११२ ॥
राजद्वारिं प्रजांसि आड सहसा कोणी नये तें किजे ।
आज्ञा वेतरपाणि यांसि करणें येवूं प्रजेतें दिजे ॥
आनार्थे अलिया कदापि प्रभुजी अत्यादरें दर्शना ।
त्यांचा हेतु किजे च पूर्ण नृपती जाणा प्रजापालना ॥ ११३ ॥
त्यांचे क्लेश हरूनियां नृपवरा सौख्याप्रती अर्पिजे ।
नित्यानित्य हि सेवकांस प्रभुजी आज्ञा सकोपें किजे ॥
नेमाहूनि धनासि आधिक [ उणें ] पैं अल्प ही घेतल्या ।
रसना छेदुनि ते क्षणीं च नृपती धाडीं च येमालया ॥ ११४ ॥
ऐसें निष्ठुर सांगणें निशिदिनीं या सेवक
पाळावी सदया प्रजा गुणनिधे अत्यंत का...
जातीवन्त सनेम जाण वचनें देशासि संरक्षिती ।
ऐसे योजुनि ठेविं सेवक प्रभू अत्यादरें या क्षिती ॥ ११५ ॥
त्याचे स्वाधिन केलिया च नृपती जाणा प्रजापाळणा ।
अब्दामाजि तयांप्रती च अणुनी कीजे च वीचारणा ॥
ठेवूनी प्रभु हेर गुप्त चपळें सांचोल पैं घेइजे ।
नाहीं जूलुम ज्याजती च कवणा हें नित्य वीलोकिजे ॥ ११६
तकटादी निमतान खण्ड बरवा पाहोनियां रे पिका ।
त्यातें सोड हि देउनी च प्रभुजी हीशेब कीजे निका ॥
पाहणी मोजणि रास जाण करुनी संतोषवावीं कुळें ।
घटक्कावण जाजती न करणें घेऊं नको हें बळें ॥ ११७ ॥
दिधला कौल खरा करूनि प्रभु रे नीभावणी पैं कुळा ।
ऐसा अंमल चालवीं च प्रभुजी संपूर्ण पृथ्वीतळा ॥
तेणें हा जय पावशील अगळा कल्याण येणें असे ।
परपीडापरिहारणासि अवनीं अन्यत्र कोणी नसे ॥ ११८ ॥
वाणी ऊदमि चाट यांसि प्रभु रे घेवोनियां लावणी ।
त्यांतें नेमुनियां जकात निकि पैं सामाजिका ठेवुनी ॥
कुळमोझा करुनी निकाल करणें हा कौल द्यावा तया ।
डागीं पैं पतकीं निगावण मुखें हें आणिजे निश्चया ॥ ११९ ॥

हकदारी च [ असेल ] ज्याजति प्रभो रास्ती दिजे नेमुनी ।
वतनी बाब खरी परंतु गढदू नाणा प्रजांलागुनी ॥
मार्गी ठेवुनि हेर गुप्त चपळें ध्यावा हि शोधो निका ।
केल्या ज्याजति नेमिल्याहुनि प्रभो शिक्षा किजे सेवका ॥ १२० ॥
राष्ट्रांमाजि स्वधर्म चालवि निका पाळूनियां ब्राह्मणां ।
हवनादी जपजाप्य जें हि करणें नाहीं तया तूळणा ॥
यजनायाजन वेदाध्यायन प्रभो घोषें अती गर्जती ।
अनछत्रें जगिं चालवीं च अगळीं हे धार्मिकाची निती ॥ १२१ ॥
राज्यामाजि कदापि तस्कर प्रभो नाहीं असें रे किजे ॥
हिंसादीक [ हि ] जार ज्यासि निकरें तात्काळ त्या दण्डिजे ॥
मातातात अलक्षता च करुनी क्लेशा सदां अर्पिती ।
ऐसे पुत्र कुटील पातकि तयां शिक्षा किजे नीगुती ॥ १२२ ॥
सासूतें छळती स्नुषा अनुदिनीं राष्ट्रीं च आयोग्यता ।
तैसे श्रीगुरुतें च शिष्य प्रभुजी येणें असे न्हीमता ॥
पाहा सेवक स्वामिचे अनहिता जो वर्तला पातकी ।
त्यातें दण्ड किजे विलंब न करीं हे गोष्टि आहे निकी ॥ १२३ ॥
इत्यादी यक बेरिजा करुनियां हीशेब घ्यावा बरा ।
नाणा गांवगना अकार गणुनी कूळारगाचा पुरा ॥
कानू कैद हि मानसीं अणुनियां पाळीं प्रजा नेटकी ।
सत्ता एक तुझी कदापि दुसरी सर्वज्ञता वाउगी ॥ १२४ ॥
हावाला मजमू सुभेस प्रभु रे नेमूनियां देइजे ।
हुजराती जवळील लोक बरवे म्हाल्मस पैं ठेविजे ॥
वतनाचा हक देशमूख अणि त्या पाटील इत्यादिकां ।
त्यांनें आडथळा कदापि न करीं संरक्षिजे लौकिका ॥ १२५ ॥
तैसा खासगिचा मुलूख अवघा जप्ती करावी बरी ।
घेऊनी प्रभु राज्यभाग नितिनें माया प्रजांची धरीं ॥
ऐशी राजनिती समर्थ नृपती हे जाणवीली असे ।
वेदाज्ञावनु वर्तणें निशिदिनीं अन्यत्रता हो नसे ॥ १२६ ॥
बाकी राहिलिया कुळास तसदी देऊं नको सर्वथा ।
दीजे सोड उरेल आण हिशबीं नाहीं तया अन्यथा ॥
त्यांचें जीवन पाहुनी च प्रभु रे संरक्षणें या रिती ।
रोगें पीक हि गेलियावरि कदा घालूं नको ज्याजती ॥ १२७ ॥

स्यतेचा जिव पाहुनी च प्रभुरे अन्नार्पिजे हो तयां ।
त्यांची रक्षणता करूनि बरवी येणें चि आहे जया ॥
ज्याला आउत बैल जाण नसल्या कैसी करावी रिती ।
ग्रामस्थांप्रति सांगुनी च प्रभु रे सांभाळिजे हे निती ॥ १२८ ॥
ठेवूनी हुजदार लेखक बरा काबील सर्वामतें ।
रतूया रक्षुनि राजभाग अपला जो नेमिला प्राप्तितें ॥
जाणा देश हि दण्डकावतु प्रभो पाळीं प्रजा सर्वदा ।
त्यातें भूपति अल्पता अनुदिनीं नाहीं कदा आपदा ॥ १२९ ॥
ऐसा अर्थ करूनियां शिवनृपा कीर्तीस विस्तारिजे ।
योग्यायोग्यविचारणा च हृदयीं हें अन्तरीं आणिजे ॥
गुह्याचें निजगुह्य जाण बरवें चित्तांत ठेवीं सदा ।
कार्याकारणता निरूपम गती अन्यंत्र नाहीं कदा ॥ १३० ॥
हुजराति पथकें बहूत रितिनें वीलोकुनी ठेविजे ।
जाणा वंशज जातिवन्त बरवे त्यांतें च नांवाजिजे ॥
जुमलेदार हि बारगीर निकटीं शौर्यत्वकर्मा अती ।
शीलेपोश करूनि नित्य प्रभुजी अत्यादरें रक्षिती ॥ १३१ ॥
वाडेयांतिल जीं मुलें चि सगुणें सौंदर्यता असती ।
बुद्धीमन्त विलोकुनी च प्रभुजी संरक्षणें नीगुती ॥
झालेझाल हवालदार नृपती नाईक पैं ठेविजे ।
जातीवन्त घरंददाज अगळे ऐसे च वीलोकिजे ॥ १३२ ॥
भूपृष्ठीं तुज [ ला ] सदैव असती जे शस्त्रधारी सदा ।
त्यांचें अन्तर पाहनी गुणनिधी अर्पीं प्रभो संपदा ॥
आतपत्रादिक बाल्व्येजन करीं पें चामें टाळती ।
विश्वासू कुळिंचे सदैव निकटीं दासत्व संपादिती ॥ १३३ ॥
ऐसें योजुनियां नृपा निशिदिनीं पैं पाळणातें करीं ।
धनधान्या वसनास अर्पुनि तयां दारिद्र्यता संहरीं ॥
निकटीं वेतरपाणि यांसि प्रभुजी योजोनियां ठेविजे ।
चातुर्यें बहुरूपवन्त विदुषां ऐसें च वीलोकिजे ॥ १३४ ॥
जाणा हो प्रमदागृहीं च प्रभु रे क्लीबांप्रती ठेविजे ।
राया त्या परिचारिकांसि चतुरां सांभाळणा योजिजे ॥
सप्ता ही वरुषांहुनी च पुरुषें जाऊं नये मन्दिरीं ।
ऐशी आट हि साक्षपें च करुनी हें नित्य चित्तीं धरीं ॥ १३५ ॥

बेकां भीतरीं जाण वृद्ध बरल्या विश्वासुका ठेविजे ।
त्यांचा शोध क्षणक्षणा च करणें ऐसें च आपेक्षिजे ॥
स्त्रीयाचे परिपाटिलाचि नृपती सन्मानिजे संप्रती ।
दारा एक रूपें समस्त करुनी आयोग्य नाहीं गती ॥ १३६ ॥
सुमतें भूपती विलोकुनि घटी जावें स्त्रियेमन्दिरीं ।
आधीं मुख्य हि श्रेष्ठ जाण ललना हे योग्यता वीवरीं ॥
स्त्रीयांच्या वचनास लुब्ध प्रभुजो होऊं नये रे कदा ।
वेदाज्ञाप्रतिपालनासि करणें चातुर्यचन्द्रा सदा ॥ १३७ ॥
राया गुह्य कदापि जाण अपुलें सांगो नये पैं स्त्रियां ।
तेणें घात असे कृपागुणनिधे पावे च नारे जया ॥
कार्याकारण बोलणें चि घडवीं लालित्य-संपादनीं ।
ऐसा हा नितिमार्ग श्रेष्ठ चि प्रभो वर्ते दिवायामिनी ॥ १३८ ॥
सर्वां रे ललनांवरी च प्रभुजी कीजे कृपा सारेखी ।
* * * * *
रोषें वर्तति त्यास जाण नितिनें संबोधनातें किजे ।
कलहातें सदनीं कदापि न करीं सर्वांसि सांभाळिजे ॥ १३९ ॥
ममता दाखवुनि स्त्रिया तुजप्रति अनिष्टता सांगती ।
स्वीयार्थू न घडे अशी च कळ या नानामतें भाविती ॥
प्रमदांचे वचनास लंपट कदा होऊं नये सर्वथा ।
याचा अर्थ हि शोधुनी च प्रभु रे मानूं नको पैं वृथा ॥ १४० ॥
परस्त्रीया अवलोकनासि न करीं शाहूजीमुनो प्राज्ञका ।
येणें येश कदापि जाण न घडे लागेल राया धका ॥
निद्रा अल्प करीं च जागृत असें श्रीरामध्यानीं सदा ।
धर्माची अभिवृद्धिता च करणें अन्यत्र नाणीं कदा ॥ १४१ ॥
नित्यानित्यविचारणा च करणें कीर्तीस विस्तारिजे ।
शत्रूचें बळ पाहुनी च प्रभु रे दुष्टास निर्दाळिजे ॥
गडकोटादिक रक्षणासि नृपती ठेवून सेना अती ।
राज्याचे सदरेवरी गुणनिधे हे मुख्य आहे रिती ॥ १४२ ॥
कपटी आधम शत्रुची निशिदिवा पैं बातमी आणिजे ।
त्याचें साधन युक्तिनें च करुनी मर्दोनिया टाकिजे ॥
कृत्रीमा रितिनें बहूत ममता लावी नृपा अन्तरीं ।
विषशस्त्रादिक हा प्रयोग करणें पैं यत्न नानापरी ॥ १४३ ॥

अन्तस्थ प्रभु हेर धाडुनि सदां कीजे अती चाळणा ।
राया मावध नित्य जाण असणें संपादिजे सद्‌गुणा ॥
मन्त्री मुख्य विलोकुनीच प्रभुजी गुह्यार्थ त्या बोलणें ।
शत्रूंचें बळ पैं कदापि न पडे ऐशा परी वर्तणें ॥ १४४ ॥
आमित्राप्रति तूं अपार ममता दावीं प्रभो मर्वदा ।
साधावी बहुधां रिती गुणनिधे काबू त्वरें एकदा ॥
अपणाहून वरिष्टताच असल्या तो दण्डिजे भूपती ।
कीर्तीची गरिमा भरोनि उर्वी आमोघता ये क्षिती ॥ १४५ ॥
व्यसनीं मानस अल्पता हि प्रभुजी गोवूं नको सर्वथा ।
* * * शिवसागरा च नृपती आज्ञीक जाणा वृथा ॥
माया एणजळावभास चतुरा मिथ्या च आहे जनीं ।
कर्माकर्मगती विचित्र गरिमा कल्पूं नको यामिनीं ॥ १४६ ॥
तूझी राजसभा सुधर्म गतीची या भूतळीं वीलसे ।
योग्यायोग्य निरूपमा च दिसती जाणा प्रभो संरसे ॥
मन्त्री लेखक नीकटीं सुशिलता ज्ञाते सदा आसती ।
वस्त्रें दिव्य हि भूपटें चि बरवीं गन्धाक्षता या गती ॥ १४७ ॥
ऐसे राजसभेसि जाण प्रभुजी येतात पैं सर्वदा ।
मर्यादा धरुनी चि वर्तति बहू अन्यत्र नाहीं कदा ॥
आज्ञासेतु तुझा चि एक नृपती श्रेष्ठत्व सर्वांजनीं ।
त्याची पाळणता करूनि असती एकात्मभावें मनीं ॥ १४८ ॥
जोडोनी करनीरजें निशिदिनीं जे वन्दिताती पदा ।
ऐसे सेवक आसती [ बहु बरे ] अन्यत्र नाहीं कदा ॥
वचनामाजि चतूर [ बैसति ] सभे सन्मान [ ते ] पावती ।
योग्यायोग्य विचारुनी गुणनिधे सुज्ञान ज्यांतें अती ॥ १४९ ॥
जाणा कैतवि जे विचार करुनी त्यांतें प्रभो दण्डिजे ।
ऐशी राजनीति समर्थ प्रभु रे अन्यत्रता नाणिजे ॥
वचनीं सादरता रसोत्पति बहू तें योग्य मानूनियां ।
नित्यानित्य तयांवरी च नृपती आमोघ कीजे दया ॥ १५० ॥
जाणा लेखक बुद्धिमन्त बरवे चातुर्य ज्ञाते असे ।
मुक्ताकीत सुवाच्य अक्षरकळा पै कल्पना वीलसे ॥
ऐसा हा गुणि नीकटीं च प्रभुजी संरक्षणें सर्वदा ।
सदया पात्र करूनियां च नृपती अर्पी अती संपदा ॥ १५१ ॥

अपणाहूनि वरिष्ठ सेवक कदा ठेवूं नको भूपती ।
येणें राज्य लयासि जाइल प्रभो अज्ञानता हे निती ॥
मर्यादा अणि तो गुमान न धरी पापिष्ठ जाणा असे ।
त्याचा त्याग किजे विवेकउदधी अन्यत्रता जी नसे ॥ १५२ ॥
क्षीतींद्रा नृपती सगूण चि विवेका सेवीं तूं सर्वदा ।
नित्यानित्य हि चाळणा च करणें दंडीं त्वरें दुर्मदां ॥
पागेचीं पथकें विलोकुनि प्रभो तीं नेटकीं ठेविजे ।
हुजरातींत हि मावळां गणुनियां अत्यादरें रक्षिजे ॥ १५३ ॥
जंजीरे गड कोट दुर्घट स्थळें देऊं नको ईतरां ।
येणें अप्रशिखा घडेल प्रभुजी वीचार कीजे बरा ॥
व्हावें सावध अंतरीं निशिदिवा राज्याभिवृद्धी किजे ।
शत्रू दंडुनि आवघे च नृपती येशासि संपादिजे ॥ १५४ ॥
भृत्यादीसदना कदापि नृपती जाऊं नको रे सदां ।
त्यांचा शोध करूनियां गुणानिधे लावीं तयां आपदा ॥
कार्याकारण बोलणें नृपवरा आभिज्ञता कल्पुनी ।
ऐशी राजनिती समर्थ प्रभुजी वीलोकणें शोधुनी ॥ १५५ ॥
ममआज्ञा प्रतिपाळणासि करणें शाहूजीसुनो सर्वदा ।
राज्याचा मद अंतरीं न धरितां संपादिजे संपदा ॥
अपणा रक्षुनि सावधान मतिनें शत्रू विभांडीं रणीं ।
शौर्याचे तवकें प्रताप मिरवीं आमित्र कीजे सुणी ॥ १५६ ॥
राज्याचे मदरेवरी बळकटी ठेवूनि सेना किजे ।
पाच्छाचा न धरीं तमः च प्रभु हें [ त्वां ] अंतरीं कल्पिजे ॥
तैसें मांडलिकादिकांस नृपती सत्त्वस्व पैं लाविजे ।
मंत्री धाडुनियां विचार विवरीं पाहूनियां योग्य जे ॥ १५७ ॥
गुह्यागुह्य हि रक्षुनी प्रकटतां दांभीक दावोनियां ।
राज्याचे स्वहितास जाण करणें येणें च आहे जया ॥
हेराची प्रभु बातमी अणवुनी वीवर्णता पैं किजे ।
शत्रूंचें बळ पाहुनी च नृपती तात्काळ त्यां दंडिजे ॥ १५८ ॥
इत्यादी वचनावरी च सहसा जाऊं नको भूपती ।
शोधूनी बरवे रिती च प्रभुजी वर्ते सदा सूमती ॥
माया दावुनियां अरीस निकरें वीलोकिजे सर्वदा ।
विश्वासा न धरीं सनेम वचनें अन्यत्र नाणीं कदा ॥ १५९ ॥

जे कोणी तुजला अमोघ ममता दावूनियां वर्तती ।
हृदयीं कैतबता धरूनि प्रभुजी आघात पैं कल्पिती ॥
त्यांला नष्टपणें च भाव धरिं हें [ त्वां ] गुप्त संरक्षिजे ।
कार्यो सादरता असोनि नृपती आनिष्ट वीलोकिजे ॥ १६० ॥
कार्याकारण राजनीति तुजला सांगीतली भूपती ।
सज्ञानें अति जाण होउनि त्वरें वर्तें सदां भूपती ॥
यामाजी जय आगळा निशिदिनीं चातुर्यचंद्रा सदां ।
कीर्तीचीं सदनें भरूनि उरवीं आमोघता रे सदा ॥ १६१ ॥
पूर्वीं जे नृपती विचार बरवा संपादुनि वर्तले ।
वेदाज्ञा प्रतिपाळुनी च प्रभुजी कीर्तिध्वजा लाविलें ॥
सांगोपांग विधी निरूपम गमे शाबासता भूतळीं ।
केलें राज्य अखीलता [ हि ] विदुषा या क्षत्रियांचे कुळीं ॥ १६२ ॥
शीवाजी नृपती अखंड विलसें जिंकोनियां रे मही ।
शाहूजीचे कुळिं तूं प्रतापनिधि हा आभिज्ञते सर्व ही ॥
स्वकरें [ ही ] तुळजा फिरंग धरूनी दंडीं रिपू एकदा ।
घ्यावें बावन पादशासि चपळें अन्यत्र नाणीं कदा ॥ १६३ ॥
सांगोपांग विधी सनेम करुनी राज्याभिवृद्धी किजे ।
जाणावीं शिरिं रामदासवचनें तूं मस्तकीं वंदिजे ॥
नित्यानित्य ही राजनीति विचरें शाहूजीसुनो अंतरीं ।
येणें भूपति आगळा जय असे आखंड दीगांतरीं ॥ १६४ ॥
केली हे अति संरसें सुमतिनें टीका प्रभो नेटकी ।
पद्यें उत्तम योग्यता च विदुषा अन्यत्र नाहीं च कीं ॥
जाणा श्रीरघुनाथ नायक प्रभू चातुर्य तो चंद्रमा ।
आहे दीन पतीत लेखनकला पाहवी अती उत्तमा ॥ १६५ ॥
पाहा हो चित्रगुप्त नाम चि मला श्रीस्वामीनें [ दीधलें ] ।
जाणा शंकर भारती च प्रभुनें आखंड नावांजिलें ॥
शंभूराज धनी समर्थ मजला जीजासतीचा पती ।
त्याचा दास चतूरता च अगळी वीराजताहे क्षिती ॥ १६६ ॥

याप्रमाणें राजनीति राजपुत्र संभाजी राजे यांसि महाराजांनीं दृश्य केली. श्रीरामदास स्वामींचे नीतिप्रमाणें वर्तणूक करून, पुण्यश्लोक म्हणवून, सिंहासनाधीश्वर पूर्वसुकृतें जहाले. समर्थांचा आज्ञासेतु अणुमात्र उल्लंघिला नाहीं. दान, धर्म, यश, कीर्ति, शौर्य, प्रताप व क्षात्रकुळीं कुलावतंस जहाले. तुम्हीं

वडील पुत्र सविजयी विक्रमोपराक्रम धराभुवनीं संपादून राज्याची संरक्षणता करणें. अविचारकर्मास प्रवर्तलिया संपादिलें राज्य शत्रु अपहार करितील. आमचे मागें तुम्ही व राजाराम धाकटे पुत्र ऐक्यरूपें राहून विभागाप्रमाणें राज्य अनभवनं औरंगजेब शत्रूचा पराजय करणें. आणि स्वर्गीं आम्हांस अमोघ संतोष पाववणें. जैसा पंडुपुत्रें दिगंतीं कीर्तिध्वज अंद्यापवत् लाविला तद्वनंतर सत्कीर्तीस पात्र होऊन सुपुत्रगरिमा स्वर्गीं आम्हास समस्त पितृगणांस गोचर करणें. हेची आज्ञा आमची. अतःपर सांगावयाची सीमा जहाली. आमचा तो अवतार पूर्ण व्हावयाचा समीप काळ आला आहे. हा दढतर चित्तांत निशा मानून रहाटी करणें. पूर्ण राज्यलक्ष्मी आम्ही आजिदारभ्यतां संपादिली ती तुम्हांस कळविली. बहुत सावधपणें जतन करणें. आमचा आतां भरंवसा न धरणें. व गडकोट जंजिरे अहद रायगिरीगड तहद चंद्राचंजावर नर्मदापर्यंत मिळोन तीनशें एकसष्ट व खजाना हत्तीघोडे पागा सुमार ऐशीं हजार व जवाहीर नवरत्नांकित कापड जरा बाजरा कागदींपत्रीं रुजू केलें. घरकलह वि ना भा व न धरितां एकरूपता राहून माझें भूतळीं नाम संरक्षणें. यांत जय आहे. ऐशा उदासवृत्तीच्या गोष्टी महाराजांनीं सांगितल्यावरि संभाजी राजे [यांणीं] श्रमी होऊन नेत्रास शेलियाचा पदर लावून परम सखेदित चित्तें अश्रुपात टाकिले. गहिंवरें कंठ दाटला. हें महाराजांनीं विलोकून संभाजी राजे यांसि पोटाशीं आलिंगून स्वकरें नेत्र पुसोन बहुतां प्रकारें समाधान केलें. श्रमी न होणें म्हणून बोलिले. आणि सुवर्णताटीं पंचामृत अन्न आणवून यथासांग भोजन केलें. परस्परें समाधान जहालें. तदनंतर संभाजी राजे यांस किल्ले पनाळियासि महाराजांनीं ठेविलें. त्याजवळ जनार्दनपंत सरकारकून व सोमाजी नाईक व बाबाजी नाईक खडा वगैरे जिव्हाळियाचे ठेविले आणि संभाजी राजे यांचें समाधान केलें कीं, "आपण रायगडास जातों. धाकटे पुत्र राजाराम यांचें लग्न करून पुनः येतों. तदनंतर राज्यभाराचा विचार कर्तव्यता स्थ करून वडील पुत्र तुम्ही आहां सर्व प्रकारें राज्य संरक्षण विषयाचे ठायीं भरंवसा तुमचा आहे."

ऐसें परम ममतार्थे बोलोन रायगडास महाराज टाकोटाक जलदीनें गेले. आणि राजाराम यांस शरीरसंबंध प्रतापराव सरनोबत पूर्वीं होते त्यांची कन्या परम सुंदर सुचिन्हांकित योग्य वधू शास्त्रसंमतें नेमस्त केली. घटित यथायुक्त ज्यांत वर्णावर्ण संपूर्णगुण ययाविभागें यथास्थित. तदुत्तर सुमुहूर्तें लग्नघटि निश्चयरूपता करोन

४२. तदनंतर—तद्वत् त्याप्रमाणें ?
४३. आजिदारभ्यता—संस्कृत शब्द दा- परूं जातां फशीं पडल्यांचें आणखी एक उदाहरण

उभयपक्षीं हरिद्रालेपन व नवविध विधिशास्त्र मर्यादेनुरूप वृद्धाचार समारंभ श्रीदैवतप्रतिष्ठा करून मग लग्नाभिषेक नव वधुवरांस घालून पाणिग्रहणाविशीं यास अध्यता करून मंत्रोच्चारें मंडपीं वर समारंभें आणून मधुपर्क विधान संपादून मंगलाष्टक-घोष-गर्जनें पीत अक्षताभिषेकें ब्राह्मणवृंदें लग्नसिद्धीतें पाववीलें. समस्तांस परमानंद जाहला. महावाद्यें मंगलदायक महाभेरी व नगारे तुतारे कर्णेबाके वाजंत्रे ढोल मृदंग झल्लरी वेणु विणे डफडिया [ यांची ] एक घाई लागली. तदनंतर तोफा बंदुकांची सरबत्ती जहाली. नादें अंबर कोंदलें. जयजयकाराची ध्वनी प्रवर्तली. मंडॅप सुवर्णवस्त्रें मंडित विद्युतप्राय आभि [ नव ] विराजली. मंडपाभीतरीं भरजरी बिछाईत गाद्या पडगाद्या टेंकणेस सफेद शाली बिछायतीवर मंडपा सुशोभित अंतरिक्ष कंदील प्रकारांतर व मुक्ताफळांचे घोंस अति रमणिक शोभा विराजली. तदुत्तर मंडपद्वारा भीतरीं श्रेष्ठ श्रेष्ठ आरसे श्रीसूर्यप्रकाश विचित्रागति जनमानसरंजनास अनेक लाविले. शिवाजी महाराज या कलियुगीं सप्तसमुद्र तेथें नवनिधी व अष्टमासिद्धि कर जोडून अहोरात्र तिष्ठत आहेत तेथें न्यून कवण पदार्थ मानावा ! संपूर्णताच सर्वही लग्नकालीं मंडपीं कशा हशा विनोद नृत्य विविध प्रकारांतर नृत्यांगना व नटवे व वेंताळीक बहुरूपी कळा कौतुकें जनमानससमुदाय मोहित करीत आहेत. तदुत्तर राजसभा. भुवनीं महाजन व अग्रगण्य षड्शास्त्री दशग्रंथीं महा पांडित्य भवति न भवति शास्त्रमर्यादेनुरूप वाद प्रतिवादास परतोन नृपमानसास संतुष्टता पाववितें जहाले. ब्राह्मणसमूह लक्षावधि किंबहुना अधिकोत्तर तदनंतर म ग र द जन इत्यादि अपार मिळाले. महाराज दयावंत धार्मिक समर्थांनीं द्रव्याचा जमा न धरितां दानदक्षणा स्वरूपानुरूप अमोघ अर्पिली. तैशींच वस्त्रें पात्र पाहून ब्राह्मणांस व अनुपदें गुणिजनांस दिधलीं. ब्राम्हणसंतर्पणें व षड्रसअन्नें विविधप्रकारांतर घृतपाचित व दुग्धपाचित संपादिलीं. मंगलघोष मंत्रोच्चारें ब्रह्मवृंदांनीं आशीस अर्पण महाराजांस करून मंत्राक्षता वधुवरांस मस्तकीं सिंचिल्या. संपूर्ण ब्राह्मणांस कर्पुरांकित तांबूल व दक्षणा अर्पून स्वधामास बोळाविलें. लग्नसमारंभ आनंदोत्कर्षें संपादिला. वधुवरें गजपृष्ठी अंबारींत आरूढवोन गृहप्रवेश महोत्साह संपादून महाराजांनीं सुनेचें नांव जानँकीबाई ऐसें परम उल्हासें ठेविलें. संपूर्ण जनास भोजनें घातलीं.

महाराज परमानंदें असतां जन्मपात्रिकेंतील आयुष्यअवधीचा समय समीपता पावला. तेसमयीं श्रीमन्महाराज क्षात्र कुलावतंस श्रीराजा शिवछत्रपति सार्वभौम

---

४४. मूळांत सर्वत्र 'मंटप' असें आहे.

४५. हें हिचे सासरचे नांव. पण पुढे इतिहासांत ही आपल्या माहेरच्या नांवानें प्रसिद्ध झाली. तें नांव ताराबाई हें होय.

नरचूडामणि चक्रवर्ती सिंहासनाधीश्वर पुण्यश्लोक स्वामींस अकस्मात् शीतज्वराचा प्रादुर्भाव शरीरीं जहाला. महाराज अतींद्रिय त्रिकालज्ञानी आत्मज्ञानें श्रीविष्णुअंशावतारी सज्ञानवंत सर्वजाण महाराजांनीं आत्मज्ञानें विचार पाहतां मममाया मिश्र शाश्वत क्कापि ‍ ‍[४६] नाहीं. अशाश्वत तनु मन धन आयुष्य विद्यमान विदेह जे स्वयं अवतारी दिवा कृतकर्मे समर्थ राजे व राजकुमार पुण्यश्लोक यांणीं त्रिभुवनाचे ठायीं कीर्तिध्वज लावून, इह परलोकीं साधना यथासांग संपादून आयुर्मर्यादेनुरूप जगीं प्रवर्त करून उत्तम लोकास साधन संपद। मही मंडळीं खंडित राज्यत्याग करून क्षर्मी एक रहावया सामर्थ्य जहालें नाहीं. एवढा श्रीकृष्ण परमात्मा त्रैलोक्यनाथ मममायास लुब्ध होऊन भक्तकार्य संपादून आयुष्यमर्यादेनुरूप मानवी शरीर त्यजून स्वस्थानास गेले. श्रीरामचंद्रादिक याचप्रमाणें. हा दृढनिश्चय महाराजांनीं हृदयीं कल्पिला. आपली आयुष्यमर्यादा पूर्ण जहाली ऐसा निश्चय करून, संनिध निकटवर्ती असणार बहुकार्य कर्ते, अंगेजाचे धुरीण जिव्हाळियाचे परम आप्त सरकारकून व हुजरे लोक होते त्यांमध्यें विश्वासू सज्ञान नामांकित सहिष्ण जाणते यांस महाराजांनीं बोलावून सन्निध आणिलें. सरकारकून व हुजरे येणेंप्रमाणें:—नांवनिशी बितपशील.

| सरकारकून व कारकून. | | हुजरे मराठे लोक. |
|---|---|---|
| १ मोरोपंत पेशवे. | १ रामचंद्रपंत अमात्य. | १ हिरोजी फर्जंद. |
| १ प्रल्हादपंत न्यायाधीश. | १ जोशीराव. | १ बाजी कदम. |
| १ बाळाजी आवजी प्रभू चिटणीस. | १ निळकंठ येसाजी प्रभू पारसनिवीस. | १ सुर्याजी कडेसर. |
| | | १ बाबाजी गाडगे. |
| १ गंगाधर जनार्दन नाईक. | १ रावजी सोमनाथ. | १ धाकाजी सरखवास. |
| | १ आबाजी महादेव. | १ महादाजी नाईक पानसंबळ. |
| ९ | | ६ |

येणेंप्रमाणें मातबर लोक जवळी बोलावून त्यांस महाराजांनीं सांगितलें कीं, आपल्या आयुष्याची अवधी जहाली. आपण कैलासभुवनास श्रीपार्वतीरमण सदाशिव यांचे दर्शनास जाणार. ऐशी शरीरअवस्था विलोकून किल्लेपनाळ्यावरि संभाजीराजे वडील पुत्र यांसि व राजाराम यांस राज्याचा विभाग करून उभयतां पुत्रांस देत होतों. तेसमयीं संभाजी राजे यांणीं ऐकिलें नाहीं. शेवट आपला निदान समयो दिसतो. अतःपर आपला देह राहत नाहीं. हें राज्य मीं शिवसर्जीनें चाळीस लक्ष होनांचें व पुणें महाल होता त्यावरि एक कोट

---

४६. क्कापि=कोठेंही ग्रंथकारास संस्कृत शब्दांचा प्रयोग करण्याची जी हौस तिचें हें आणखी एक उदाहरण.

होनांचें राज्य पैदा केलें. व गडकोट जंजिरे व लष्कर पागा अशी मिळविली. परंतु आमचे माघारे हें राज्यसंरक्षण मर्दुमीनें व हिमतीनें करणार ऐसा पुत्र विक्रमोपराक्रमी नाहीं. राजाराम वांचला तरि तो एक हें राज्य वृद्धीतें पारवील. संभाजी राजे वडील जाणते आहेत. परंतु बुद्धि अवनीतीची. त्यास अनोपाय[47]. आपण तो प्रयाण करितों. तुम्ही सरकारकून व हुजरे लोक मराठे कदीम[48] राज्यांतील आहां. तुम्हांस या गोष्टि पूर्ण कळल्या असाव्या. आपणा माघारें संभाजी राजे पराक्रमानें राज्य सर्व आटोपितील[49]. लष्कर भारी नामांकित मर्दाने लोक ज्यांणीं जिवाच्यां कष्ट मेहनत करून स्वामीकार्य केलें संभाजी राजा म्हणोन त्याकडे डौल देऊन त्याचें मनं रखून मिळतील[50]. राजाराम धाकटे यांजकडे लष्कर येणार नाहीं. सरकारकून राजाराम याचा पक्ष धरून उभयतांस राज्य वांटून दोनही राज्यें करून करा म्हणतील. शेवट लष्करचे मराठे व कारकून यांसी [ संभाजी राजे ] मारितील. तेव्हां ब्रम्हहत्या होईल. पुढें मराठे लष्करचे सरदार मारितील व धरितील. इजत घेईल. लहान छोटेखानी याचा पगडा पडेल. थोर लोक जाणते शहाणे नामांकित घरंदाज ज्यांणीं राज्यांत श्रमसाहस केलें, निदानीं महाराजांस कार्यास आले, त्यांचा संभानी अपमान करून चाल मोडितील. तेणें राज्य अ स्त र होईल. संभाजी राजे कैफ खाऊं लागेल. हमेशा लटकें भाषण करील. क्षण एक वचनाचा भरंवसा नाहीं. मति भ्रंशता होऊन येईल. मनुष्य म्हणजे दृष्टीपुढें तृणवत. बेनवा[51] होऊन मनुष्यांचा प्राण घेईल. मदांधपणें वर्तेल. आषकबाजी करील. गडकोट व देशामध्यें अनायक होईल. राजा पराक्रम करणार नाहीं. निर्दय अविचारी कृतघ्न जनास होईल. द्रव्य खजाना वस्त्रें अलंकार बेमुबलक खर्च करून संपत्तीचा अगदीं नाश करील. याची वर्तणूक अविचार कर्माची ऐकून औरंगजेब पादशाहा दिल्लीहून बावीस अमीरूलउमराव वजीर सहित वीस पंचवीस लक्ष फौजेनिशीं स्वतः चालोन येईल. विजापूर भागानगर बेदर तख्त दौलताबाद बलात्कारें शासन पोंहोंचवून घेईल. तदनंतर जोरा पोंहोंचवून राज्य घेऊन यश संपादील. शेवट संभाजी राजे यांस दगा

४७. अनोपाय=अनुपाय.

४८. कदीम जुने, पुराणें.

४९. 'आटोपितील' या शब्दापुढें "ऐसें नाहीं" असे दोन शब्द मूळांत आहेत पण ते हस्तदोषानें पडले असावे असें पुढील संदर्भावरून दिसून येईल.

५०. 'मिळतील' या शब्दापुढें "ऐसा प्रसंग दिसत नाहीं" असे चार शब्द मूळांत आहेत पण ते हस्तदोषानें पडले असावे असें पुढील संदर्भावरून स्पष्ट होईल.

५१. बेनवा–बेशुद्ध, भांबावलेला.

होईल. जेणें गैंति मलीक अंबरांनीं निजामशाही बुडविली त्याचा पुत्र फत्ते-खीक त्या माघारां जहाला त्यांणीं जैशी पादशाही बुडविली तो न्याय संभाजी राजा करील. तदनंतर राजाराम राज्य करूं लागेल. तेव्हां संभाजी राजे यांणीं गमाविलें राज्य साधील.. मजपेक्षां पराक्रम अधिक करील. हीं ज्येष्ठ पुत्राचीं लक्षणें आहेत. व कारकून यामध्यें माझे सरकारकून यांस संतोष संभाजी राजे देत नाहींत. अविचार कर्म करून मारून टाकील. एक प्रल्हाद निराजी व रामचंद्र निळकंट हे दोघे पराक्रमी होतील. निळोपंत प्रधान होईल. स्वरूपभाव रक्षून रहातील. या पुढें कोणी होणार होतील. मराठियामध्यें बहुतांस संभाजी मोडील. उरल्या बाबाजी घोरपडा व संताजी घोरपडा व धनाजी जाधव वांचतील, मोठे पराक्रम करितील. मोडलें राज्य हे मराठे व सरकारकून सांवरतील. येणेंप्रमाणें होईल. ऐसें महाराज बोलले.

तेसमयीं सर्वांचे कंठ दाटोन आले. नेत्रांतून जल स्रवों लागलें. परम दुःखित जहाले. मग महाराज बोलले कीं, "तुम्ही अणुमात्र श्रमी होऊं नका, हा मानवी शरीरास श्रीईश्वरें मृत्यु नेमिला आहे. मागें कृता त्रेता द्वापारयुगांत लक्षावधि दहासहस्र वर्षें आयुष्य, या कलियुगांत शत, याप्रमाणें श्रीविधीनें मानवांस आयुष्य युगपरत्वें निर्मिलें आहे. शाश्वत नाहीं. असें असतां मोहमज्जन अज्ञानमतीस मद हा प्रकार त्याचे सज्ञानसिंधुच जाणतात. धन सुत माया वीरश्री पराक्रम अहंता मिथ्या मोहास लुब्ध जहालिया हितावह नव्हे. जे काळीं जे घडणें तें प्रमाण मानून निरापेक्षित चित्तें बर्तावें हेंच प्रमाण. निगम वदतो. तपशील:—

अनश्वर हा देह जाणा । मिथ्यामाया अवलक्षणा ।
तेथें विचार ज्ञानार्क किरणा । स्पर्शों नये सर्वथा ॥ १ ॥
जनित कर्माची गहना गती । त्यातें वैष्णवी मायेचीं भ्रांती ।
जैशी बुद्बुदसमूहाची उत्पत्ती । कोठें कांहीं दिसेना ॥ २ ॥
अधर्में वर्तला तरी नर । त्यास कैंचा सुखोपचार ।
तये भ्रांतीतें उत्तर । नरक घोर वाहताती ॥ ३ ॥
करूनि अज्ञानाचा पसार । भ्रांतीमय करिती अनाचार ।
लक्ष्मीमदाचा सागर । पूर्ण पात्रें भरूनियां ॥ ४ ॥
येथें सारासार एक जाणें । सत्य सद्भावें वर्तणें ।
करूनियां जगपाळणें । कीर्ती कीजे भूलोकीं ॥ ५ ॥

---

५२. जेणेंगति=ज्याप्रमाणें.

५३. "मळीक अंबर" याणें तर निजामशाही कांहीं दिवस राखिली; पण त्याच्या मुलानें ती बुडविली.

मनोवृत्तिग्रामण्याचा अर्थ । भ्रमाचा चुकवावा अनर्थ ।
अविचार कर्माचा स्वार्थ । कल्पूं नये पां ॥ ६ ॥
अंतीं मती स्वागती भावितां । देह निमालिया कैंची ममता ।
आपणा आपण आणुनी चित्ता । विदेहित्वें वर्तावें ॥ ७ ॥
ऐसा वदला शिव नरेंद्र । जो शांतिक्षमेचा समुद्र ।
शौर्य कर्मी महारुद्र । सुबुद्धीचा चंद्रमा ॥ ८ ॥

मागें कित्येक उत्पन्न जहाले. मम मायेनें वेष्टिले. अंतकाळीं निमाले. मृत्युलोकी समस्त हाच चराचर मार्ग लागलाच आहे. जो जो यत्न करणें तो अष्टप्रधानांनीं निस्सीमता केला. महा वैद्य धन्वंतरियासमान संपूर्ण ज्यांस नाडी ज्ञानी चिन्हाचिन्ह जाणते यांणीं ज्वर उपशमनार्थ महामात्रा हेमगर्भादि त्रैलोक्यचिंतामणि इत्यादिक वनस्पति व काढे व तदनंतर अनुष्ठानें विविध प्रकारांतर व श्रीसूर्यास नमस्कार अर्घ्यप्रदानादि अश्वत्थप्रदक्षिणा व श्री तुलसी प्रदक्षिणा व श्रीशिवलिंगास अतिरुद्र व लघुरुद्र व दधिभात लेपन व तसेच जाणते मांत्रिक शतानुशत व देवधर्म बहुत भगीरथ प्रयत्न महाराजांकारणें केले. व श्री कुलदेवतेस-गोंधळ मानासिक नवसाचे घातले. याप्रमाणें महद्यत्न करावयास अंतराय मंत्री यांणीं व समस्तांनीं केला नाहीं. परंतु आयुष्यावधि पूर्ण जहाली. तेव्हां सहजच यत्न मानवी कुंठित जहाले. महाराज बोलिले कीं आतां यत्न करूं नका. आम्ही स्वर्गभुवनास जावयासि सिद्ध जहालों. सावध असणें. आमचे मागें क्रियापूर्वक राज्य संरक्षणें. आमचा हेतु राहून गेला जे संपूर्ण पृथ्वी जिंकिली, परंतु श्रीभागीरथी करमुक्त करून अटक नदी पार होऊन रूमशाम बद्रिकाश्रमपर्यंत शासन चालवावें, दिल्ली तख्त घ्यावें, ऐसा उत्कंठित हेतु असतां आयुष्यहरण जहालें. परंतु पुनः संभाजी राजे यांचे उदरीं जन्म घ्यावा किंवा राजाराम उदरीं घ्यावा ह्या गोष्टी मानसिक घडोन येतील. तुम्ही या जहाले गोष्टीचा वारंवार शोक न करितां विवेकमार्गें चित्ताचें समाधान असो देणें. आतां तुम्हीं समस्त बाहेर जाणें. महाराज स्वर्गधामास जातेसमयीं परम अनिष्ट दुष्ट चिन्हें जहालीं. गृध्र नगरावरि सहस्रावधि फिरों लागले. भालूशब्द व दिवाभीत उलूकांचे शब्द व श्वानरूप व अष्टोदिशा धुंद [ होऊन ] सूर्य अदृश्य जहाला. निबिड अंधःकार पडला. हीं चिन्हें सुज्ञ पांडित्यें व बुधजनांस गोचर जहालीं. इतक्यांत महाराज म्हणों लागले कीं घटिका पूर्ण भरली. या समयीं सावधता असोन श्रीरामनाम स्मरण करितों. म्हणून अवघियांस बाहिर बसविलें आणि महाराजांनीं भागीरथीचें उदक आणवून स्नान

५४. 'नाडीज्ञान' तर नव्हे ?

केलें. संपूर्ण सर्वांगास अग्निहोत्राचें भस्मलेपन करून योगाभ्यासास महाराज शिवराज सार्वभौम प्रवर्तले. आत्मा आकर्षण करून ब्रह्मस्थानीं नेऊन दशम-द्वारें प्रयाण सार्वभौम शिवनृपतींनें इहलोक त्यजोन उत्तम लोकास विमानीं श्री-विष्णु शिव दूत सहित रूढोन घंटानाद किंकणी शब्द गजरें प्रयाण केलें. मृत्युलोकींचें जड शरीर अचेतन राहिलें. महाराजांचें देहावसान किल्ला रायगड जतख्त येथें [ झालें. ]

तेसमयीं पृथ्वीप्रलय होऊन आला. संपूर्ण जनांनीं आकांत मांडिला. अष्ट प्रधान व वाडियांतील मुलें व हुजरे व माहालों माहालींचे हवालदार व निशिंदे[५५] मांडलिक लोक व सरदार शिपाई व बाजे लोक व कारकून व दास दासी दी-र्घस्वरें रुदन करूं लागले. व महाराजांची जननी व मुख्य स्त्री पट्टराणी सईबाई[५६] साहेब व धाकटे पुत्र राजाराम व उपाध्ये व जोशीराव चिटणीस फारसनिवीस महाराजांचें परम प्रीतीचें पात्र समस्त जनावरें रावे मैना मयोर व चित्ते व चितळे सांबरें वगैरे व हत्ती घोडे संपूर्ण सखेदित शोक करूं लागले. महाप्रलय समस्तांस जहाला. महाराज नरचूडामणि श्री-शिवराजेंद्र छत्रपति सार्वभौम अवनीपालक जनेश्वर समर्थांनीं अवतार पूर्ण केला. सप्तभागीं जाडीं इंद्रधनुष्यें सुरेख निघालीं व महातारांगणें पतन जहालीं. चंद्र-बिंबास भोंवतें खळें भ्रष्ठ पडलें. व सूर्यमंडल आच्छादिलें. श्रीशंभूमहादेवाचें तळें मालोजी राजे यांणीं बांधिलें तें आटलें. गैबीशब्दांची[५७] महाध्वनी जहाली. भूमिकंप होऊन धरा तळीं तरकली[५८]. श्रीतुळजापूर निवासिनी जगदंबाचें अक-स्मात नाकांतील मुक्ताफळ गळोन भूमीवरि पडलें. कल्होळ तीर्थ आटलें. श्री-पंढरीस पांडुरंगाचीं कपाटें लागलीं. श्रीकृष्णा दीर्घघोषें व × ×[५९] श्रीजेजोरीस महाशब्द जहाला. तैसेंच चाफळीं दुश्चिन्हें जहालीं. श्रीप्रताप दुर्गीं दीपक नसतां थोर उमाळा[६०] होऊन शांत जहाला. ऐशीं अरिष्टें होऊन आलीं.

तदुत्तर महाराज सार्वभौमाचें कलिवर चंदनकाष्टें बेलकाष्टें व कृष्णागर कुं-कुमागर व देवद्वार श्रीतुलसीकाष्टें यांचीं स्मशानीं भूमिकेस शय्या करून अग्नि-संस्कार केला. अंतःपुरांत सर्वांनीं खेद अतिशयेशीं मांडिला. हाहाकार भूत-ळीं प्रवर्तला. उत्तरकार्य सांगोपांग शास्त्रमर्यादेनुरूप कनिष्ठ पुत्र राजाराम यां-णीं संपादिलें. ब्राह्मणांस गजदानें व अश्वदान व गाई म्हैशी उष्ट्र व हेम रौप्य दानें व महावस्त्रें ऊर्णा व जरतारी दानें व दासदासी व शिबिका मंचक

---

५५. निशिंदा=निविशिंदा=लेखक, कारकून.

५६ सईबाई तर पूर्वीच मृत्यु पावली होती.

५७. गैबी=गुप्त.

५८. तरकली=तडकली.

५९. पुढील २ । ३ अक्षरें फाटून गेलीं.

६०. उमाळा=उन्हाळा, ज्वाला ?

समयादिक पात्रें व शस्त्रें व धनुष्यें व आतपत्रें व चामरें व व्यजनें व इक्षु वपुष्पें व पुस्तकें व कलश व ग्रामभूमि व अमोप द्रव्य व वापिका व गृहदानें देऊन संपर्ण ब्राम्हणांस व गोरगरीब फकीरांस अपरमित संतुष्टविले. अग्रहारें यावत् चंद्रसूर्य तावतत्काल ब्राम्हणांस धरा अर्पण केली.

ऐसे शिवाजी महाराज नरचूडामणी नरदेही उत्पन्न जहालियापासून देहावसान पावेतों अद्वितीय असाधारण अमानुषी कृतकर्मे पटुतर प्रौढ प्रताप महीमंडलांत अखिल युगयुगांतरांचे ठायीं पुण्यश्लोक गरिमा दिवादिकल्प गर्जना करीत आहे. शिवाजी महाराज साक्षात श्रीविष्णु अंशअवतारी, पुन्हा सृष्टिकर्ते, यांणीं जगविख्यात अभिनव विक्रमोपराक्रमाची अभिवृद्धता करून नवीन शक सिंहासनाधीश्वर जहालियांपासून परंपरा शिवनृपतिशक धराभुवनीं रूढला आहे. धन्यता शिवाजी महाराजांची ! या कलियुगीं अप्रतिम, उपमाच नाहीं. संपूर्ण नर्मदेपासून श्रीरामेश्वरपर्यंत एकछत्री एकाज्ञा रामराज्य करून कीर्ति संपादली. तदनंतर चौऱ्यायशीं बंदरें फिरंगी देश व अरबदेश व नायमोर देश व चंगदेश व वलंदेजाचा देश व हबसाण वगैरा टोपीकर करभार भिऊन देऊं लागले. मुलुख काबीज केला. अदलशाही व कुतुबशाही निजामशाही व समुद्रांतील बावीस पादशहा यांसि शिक्षास्पद करून जिंकिलें. नवेंच राज्य शिवाजी महाराजांनीं पैदा केलें. मराठे यांचे क्षत्री होऊन सार्वभौम छत्रपति हिंदुपति बादशहा सिंहासनाधीश्वर महाराज जहाले. अंतीं स्वइच्छा मरण संपादून कैलासभुवनास गेले. याप्रमाणें पूर्वीं जहाले नाहीं. हें समस्त महाराजांचें वंशकुलास व समस्त जनांस महाराजांचा महाप्रताप कळला असावा.

हें पुण्यश्लोक शिवाजी महाराज छत्रपति जनेश्वर यांचे चरित्र जो कोणी भक्तीनें नित्य श्रवण करील त्यास ऐश्वर्य पराक्रम व धर्म यश दान कीर्ति जय भक्ति चारण [ ! ] बुद्धि सत्कर्म धैर्य चातुर्य गांभीर्य शौर्य तूर्य माधुर्य अधीय अमोघ संपत्ति पुत्रपौत्रादि प्राप्त होऊन श्री भागीरथीस्नान व गयावर्जन व संपूर्ण तीर्थे व तीर्थराज स्नानाचे पुण्याचा फलादेश घडोन येईल. निपुत्रिका पुत्र होतील. निर्धनासि धन होईल. अपेशी यशवंत होतील. रोगिप्राणियाचे रोग परिहार होतील. शत्रु किंकर होतील. पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें सुखरूप असतील.

हें शिवआख्यान अनंतपुत्र कृष्णनाम याणें केलें. चंदीमध्यें ईश्वरनाम संवत्सर चैत्र शु॥ प्रतीपदा तद्दिनीं बखर महाराजांची समाप्त जहाली. गत शालिवाहन शके १६१६ सोळाशें सोळा. अनंत कृष्णाजींनीं निर्मिली. तदनंतर

६१. नायमार=नाईर लोक असावे.

या बखरीचा भाव गर्भ चित्तांत संपूर्ण मनन रघुनाथ यादव चित्रगुप्त दिमत राजमंदिर परंपरागत महाराजांचे कारकीर्दीचे सेवक. वडील वडिलांनीं सेवा करून महत्पदें संपादिलीं.व हल्लीं श्रीमन्महाराज राजश्री राजाराम छत्रपति व थोरले महाराजांचे पुत्र श्रीमन्हाराज राजश्री संभाजीराजे छत्रपाति यांसान्निद्ध साहेबकामावरि आमचे चुलत आजे काकाजी बावा प्रभु विनापराधें थोरले संभाजी महाराजांनीं स्वहस्तें मारिले. व आमचे बाप साहेबकामावरि पडले. सेवक बारा तेरा वर्षांपासून श्रीमन्महाराज राजाराम पुत्र धाकटे श्रीमन्महाराज राजश्री जिजाकांत शंभू छत्रपति स्वामींची त्रिकर्णे चित्तें चिटणिशी लेखनाची सेवा केली. ती चाळीस वर्षे. महाराज निजधामास गेले. तन्मुळें सेवकास आश्रय नाहीं. अन्नाकरितां दारोदार भणगगतीनें लागलों. देशांतरास गेलों. भ्रमत भ्रमत तोरगळास अ प्र शि खा घडली. म्हणोन चिकोडीस आलियावरि राजश्री यशवंतराव शिंदे सुभेदार श्रीमन्महाराज मातुश्री जिजाआईसाहेब साहेबांचे यख्तियारी परम सुज्ञ शौर्यकर्मे बुद्धिसागर यशस्वी प्रतापनिधी विद्यावंताचे जाण करुणा समुद्र साहिष्ण शांत श्रांत नितांत धुरीण महत्कार्य करते महाराज मातुश्री आईसाहेबांचे नांवाजीस एकवचनी अनृत स्वप्नींही जाणत नाहीं तेव्हां जागृतींत होणार कोठील एक महाराजांचे राज्यांत मोहरा. कृतकर्मे संपादिली. महाराजामागें राज्यसंरक्षणता केली. त्याणें आमचे बहुतां प्रकारें समाधान करून अन्नोदकाकैरितां

६२. ही चित्रगुप्त यांची हकीकत मूळांतच त्रुटित आहे. दुसरी प्रत या पुस्तकाची न मिळाल्यानें ती पुरी करतां आली नाहीं.

हें चरित्र श्री क्षेत्र करवीर येथून रा० रा० विष्णु खोंडदेव भागवत वीरमाडकर यांणीं पाठविलें होतें तें त्यांजकडे परत केलें. पुस्तकांतील कागद जुनरी खर्ची कागदासारखा चौकोनी असून त्याचें पुस्तक बांधिलेलें आहे. अक्षर सुरेख व एकाच वळणाचें आहे. पुस्तकास तांबडे कापडाचा पुठा आहे.